# रामदासांची काव्यसृष्टी एक अभ्यास



प्रबंधकार

प्रा. डॉ. रा. वा. चिटणीस

# रामदासांची काव्यसृष्टी
# एक अभ्यास

(शिवाजी विद्यापीठाने तीस वर्षांपूर्वी मान्य केलेला संशोधनपर प्रबंध)


प्रबंधकार

**प्राचार्य डॉ. रा. वा. चिटणीस**





संक्षेपक / संपादक

**डॉ. शोभा घोलप**





विवेचक प्रस्तावना

**डॉ. अशोक कामत**



गुरुकुल प्रतिष्ठान, पुणे.

**रामदासांची काव्यसृष्टी : एक अभ्यास**

■



■

**प्रकाशक**
गुरुकुल प्रतिष्ठान
'शिवश्री', २५८, सहजीवन, पर्वती,
पुणे ४११००९.
फोन (०२०) २४२२२४९५

■

**टाईपसेटिंग**
एच्. एम्. टाइपसेटर्स
११२०, सदाशिव पेठ,
पुणे ४११०३०.

■

**मुद्रक**
स्मिता प्रिंटर्स
प्रमोद वि. बापट
१०१९, सदाशिव पेठ,
पुणे ४११०३०.

■

**प्रकाशन दिनांक :** २१ मे २००४

■

**मूळ किंमत २५० रुपये**
**सवलत मूल्य १०० रुपये** (जुलै २००४ पर्यंत)

प्रस्तुत प्रबंध प्रकाशनासाठी डॉ. रा. वा. चिटणीस-परिवाराने गुरुकुलास गुरुदक्षिणा देऊन सर्वतोपरी सहाय्य केले आहे. त्यामुळे हा ग्रंथ निम्म्या किंमतीस देणे शक्य झाले आहे.
सौ. वसुंधरा भालचंद्र सातवळेकर स्मृतिप्रीत्यर्थ पाच हजार रुपयांची देणगी श्रीमती कमलाबाई वासुदेव सातवळेकर यांच्याकडून मिळाली आहे.

*डॉ. रा. वा. चिटणीस यांची ४४ वर्षांपूर्वीची एक कविता*

## देवा जाब दे

काय देवा आम्ही । केलासे अपराध । नाही पुरवी साथ । कसलीच ।।
पुण्याई कारणे । परोपकार केला । अंगावरी आला । तोचि काय?
उणे दुणे कोणा । बोललोचि नाही । निंदा मत्सर तोही । नाही केला ।।
काया वाचा मने । राहिलो मी शुद्ध । हृदय विशुद्ध । तुझ्यापायी ।
श्रद्धायुक्त भक्ती । तुझी देवा केली । नाही चुकविली । कधी पूजा ।
मातृ पितृ सेवा । यथाशक्ति केली । कधी न निंदिली । कटु शब्दे ।।
अडले जाकळले । काम आधी केले । आप पर मानले । नाही कधी ।।
कटु शब्द कोणा । कधी न बोललो । दुःखे ओलावलो । दुःखितांच्या ।।
प्रसंगी दिधली । नेसूची लंगोटी । बांधिली न गाठी । कपर्दिक ।।
स्पृश्यास्पृश्य भावा । दिला नाही थारा । तयासाठी कारा । सोशिली की ।।
इतुके केले तरी । शांति का सरे रे? काय चुकले रे । कळो द्यावे ।।
डोळ्यांनी पाहातो । जगातील लीला । आवडती तुला । कैशा देवा ।।
चोरी, चाडी लोडी- । लबाडी, डाव-पेच । करू नये तेच । करिताती ।।
त्यांचे उंच वाडे । वाजती चौघडे । लक्ष्मी त्यांच्या पडे । पायापाशी ।।
लाख लाख कोटी । करिती पातके । मस्तकी कवतुके । देवा त्यांच्या ।।
कसली कर्मगती । कसला पूर्व जन्म । काहीतरी वर्म । वेगळेच ।।
प्रयत्न पहाड । उभे केले परी । भिक्षा-पात्र करी । माझ्या का रे?
कैसा मी विसंबू । न्यायात तुझिया । मनी बंड माझ्या । उभे राही ।।
बरे! बंड तरी । उपयोगा येई? त्यांची खात्री नाहीं । काय करू?
चहूंवाटा बंद । कोंडमारा झाला । शरण यावे तुला । हाच मार्ग ।
येईन शरण । लाज न वाटेल । जबाब लागेल । द्यावा तुला ।।
"काय देवा आम्ही । गुन्हा काय केला? खुलासा हा केला । पाहिजेच" ।।

पुणे- १०/११/६१

# अनुक्रमणिका





# विषयानुक्रमणिका

# दोन शब्द

शिवाजी विद्यापीठ क्षेत्रात नोकरी करीत असताना समर्थांशी अव्यभिचारी निष्ठा ठेवायची, हे व्रत तसे अवघड आहे. डॉ. नरेन्द्र कुंटे, प्रा. प्रभाकर पुजारी, कै. डॉ. रा. वा. चिटणीस या मंडळींनी हे असिधारा व्रत व्यवस्थितपणे पार पाडले. त्यात शिवाजी विद्यापीठाने समर्थांवरील मान्य केलेला एकमेव प्रबंध डॉ. रा. वा. चिटणीस यांचा आहे. हा प्रबंध प्रसिद्ध व्हावा यासाठी त्यांच्या पत्नी श्रीमती रजनीताई गेली अनेक वर्षे प्रयत्न करीत आहेत. संपूर्ण प्रबंध शब्दश: छापणे अशक्य होते. तो संक्षिप्त करण्याचे आणि छापण्याचे दिव्य डॉ. अशोक कामतच पार पाडू शकतील, याची मला कल्पना होती. तसे मी रजनीताईंना सुचवले. डॉ. चिटणीस यांची पुण्याई आणि त्यांच्या पत्नीची चिकाटी याला अखेर फळ आले आणि हा प्रबंध संक्षेपाने छापला गेला.

समर्थ संप्रदायातील डॉ. चिटणीस यांचे योगदान वादातीत आहे. समर्थांवर वरचेवर होणारी टीका ऐकून ते समर्थ साहित्याकडे वळले. समर्थांचे ग्रंथ वाचता वाचता ही टीका निराधार आहे, हे चिटणिस यांच्या ध्यानी आले. यातून ते समर्थांचे अनन्यभक्त झाले. सेतु माधवराव पगडीदेखील शिव-समर्थ वादाच्या निमित्ताने समर्थांकडे वळले आणि जीवनाच्या सायंकाळी पूर्ण समर्थमय झाले. साठाव्या वर्षी प्राचार्य चिटणीस यांनी समर्थांवर पीएच्. डी. घेतली, हा त्यांचा खरा कर्मयोग ठरला.

डॉ. चिटणीस अत्यंत निगर्वी, मृदु वचनी. जणू ऋजुता आणि आर्जव यांचे घनीभूत रूप. त्यामुळे आपल्या प्रबंधात समर्थांच्या आक्षेपकांचा परामर्श त्यांनी अत्यंत सौजन्यशीलतेने घेतला आहे. समर्थांची काव्यसृष्टी हा त्यांच्या प्रबंधाचा विषय तसा अफाट आहे. कारण समर्थांनी असंख्य विषयांवर विपुल लेखन केलेले आहे. आपल्या प्रबंधात समर्थांच्या समग्र वाङ्मयाचा परामर्श घेणे, हे अत्यंत अवघड काम चिटणीस यांनी यशस्वीरीत्या करून दाखविले. हा प्रबंध संक्षिप्त रूपात छापला गेला असला तरी प्रबंध वाचताना समर्थांच्या सर्वज्ञतेचा आणि सर्वस्पर्शित्वाचा अनुभव येतो. त्यांच्या चिंतनाची व्याप्ती व खोली पाहून मती गुंग होते. डॉ. चिटणीस पूर्ण समर्थमय झाले होते. जणू समर्थांनीच हा प्रबंध त्यांच्याकडून लिहून घेतला. समर्थ रामदास यांची तुलना गुरु गोरखनाथ, संत कबीर, गोस्वामी तुलसीदास, संत एकनाथ, संत तुकाराम यांच्याशी करून सगळ्या

संतांची भाषा कशी एकच असते, ते डॉक्टरांनी मोठ्या कुशलतेने दाखविले आहे. विवेकसिंधु, भागवत आणि दासोपंत या ग्रंथांबरोबरच त्यांनी दासबोधाचा सुंदर समन्वय साधला. हा प्रबंध समर्थ-भक्तांच्या हाती देऊन गुरुकुल प्रतिष्ठानने गुरुकुल परंपरा राखली आहे. समर्थ-भक्तांनी आणि सांप्रदायिकांनी विस्तृत प्रमाणात या ग्रंथाचे वितरण करून गुरुकुल आणि रजनीताई यांना सहाय्य करावे, ही प्रेमाची विनंती.

**सुनील चिंचोलकर**

अजिंक्य नगर, सिंहगड रस्ता,
पुणे ५१.

# प्रबंधकाराचे निवेदन

**'रामदासांची काव्यसृष्टी : एक अभ्यास'** हा प्रबंध सादर करताना एक प्रकारचे सात्त्विक समाधान वाटत आहे. श्रीसमर्थांच्या वाग्देवतामूर्तीच्या सान्निध्यात जो काळ गेला तो सार्थकी लागल्याचे हे समाधान आहे. मराठी वाङ्मयाचा अभ्यास करीत असता रामदासांबद्दल विविध विधाने केलेली वाचण्यात आली आणि त्यातून रामदासांच्या कवित्वासंबंधाच्या विधानाकडे लक्ष वेधले. 'रामदास हे कवी नव्हेत' अशा अर्थाचे ते विधान होते. दासबोधाची काही पारायणे झाली असल्याने त्यातील सौंदर्याचा प्रभाव मनावर पडलेला होता आणि म्हणून या विधानात कितपत तथ्य आहे, हे पाहण्याची उत्कंठा लागून राहिली. याच सुमारास डॉ. रामचंद्र प्रल्हाद पारनेरकर यांनीही असाच आदेश दिला की, समर्थांच्या गाथेवर अजून काम झालेले नसल्याने मी ते काम घ्यावे. परंतु केवळ गाथेवर काम करणे हे अपुरे वाटले व त्यामुळे 'रामदासांची काव्यसृष्टी : एक अभ्यास' असा थोडा व्यापक विषय घेतला. प्रा. श्री. शं. खानवेलकर यांनी मार्गदर्शनाची तयारी दर्शविली व विद्यापीठानेही या विषयाला मान्यता दिली आणि हा प्रबंध तयार झाला.

रामदासांची काव्यसृष्टी : एक अभ्यास या ग्रंथातील प्रतिपाद्याविषयी मला असे म्हणावयाचे आहे :

रामदासांच्या काव्यसृष्टीचा अभ्यास करीत असताना खालील गोष्टींकडे विशेष लक्ष दिले पाहिजे : (१) रामदास हे कवीच नव्हेत असा त्यांच्याविषयी मोठा आक्षेप घेतला गेल्याने या गोष्टीचा कसून शोध घेऊन या आरोपात कितपत तथ्य आहे याचा शोध घ्यावयास हवा. (२) यासाठी समग्र काव्यांचा शक्य तितक्या सविस्तर अभ्यास करून त्यातून निघणारे निष्कर्ष त्या–त्या काव्यापुरते संग्रहित करावयास हवेत. (३) त्या आधारांवर ते सर्व निष्कर्ष एकत्रित करून साकल्याने रामदासांच्या कवित्वगुणाबद्दलचा निर्णय घेणे शक्य होईल. (४) यासाठी सर्व काव्यांचा अभ्यास आधार (data) म्हणून वापरता यावा व तो स्पष्ट व्हावा एवढ्यासाठी तो शक्य तितक्या सखोल करण्याचा प्रयत्न करावयास हवा. (५) काव्यपोषक गोष्टींव्यतिरिक्त तत्त्वज्ञान, अध्यात्म इ. गोष्टींचाही आवश्यक तेवढा विचार करून काव्य या दृष्टीने अध्यात्मपर काव्यांचे मूल्यमापन करणे आवश्यक आहे. (६) रामदासांचे काव्य त्यांच्या जीवनातून कसे निर्माण झाले याचा शोध घेणे आवश्यक आहे.

अशा दृष्टीने केलेल्या अभ्यासाचा निष्कर्ष असा : रामदास हे सर्वप्रथम उत्तम कवी होते.

अध्यात्म हा महान विषय त्यांनी आपल्या कवित्वशक्तीला थिटा पाडला. शब्दशक्ती, भाषाशैली, भावोत्कटना, वर्णनकौशल्य, रसवत्ता, आलंकारिकता, आवेग, आवेश, उदात्तता इ. सर्वांत रामदास हे उत्कृष्ट कलाकार असल्याचेच प्रत्ययाला आले आहे.

या प्रबंधाचा विषय यापूर्वी कोणाकडून कधीच विचारात घेतला नव्हता. संपूर्ण वाङ्मयाचा अभ्यास आणि तोही काव्य या नात्याने कोणी केला नाही. म्हणून हा अभ्यास मराठी वाङ्मयात नवीन आहे. रामदासांच्या वाङ्मयाचा अशा तऱ्हेचा अभ्यास मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांना अत्यंत उपयुक्त व्हावा. प्रकाशित वाङ्मयाबरोबरच काही अप्रकाशित वाङ्मयाचाही अभ्यास सादर करण्यात आल्यामुळे या प्रबंधाच्या मौलिकतेत भर पडली आहे. अप्रकाशित वाङ्मयाचा काही भाग या प्रबंधात प्रथमतःच प्रकाशित होत आहे. हस्तलिखिताचा फोटो, काही छापलेली चित्रे ही या प्रबंधात घातलेली असल्याने या प्रबंधाची उपयुक्तता वाढलेली आहे. रामदासांच्या हिंदी कवितेचा अभ्यास या प्रबंधात प्रथमच होत आहे. या प्रबंधाचा हा एक विशेष मानला जावा. प्रा. श्री. शं. खानवेलकर यांचे मार्गदर्शन बहुमोलाचे झाले आहे. केवळ उपचार म्हणून हे विधान केलेले नाही. प्रबंधाचे काळजीपूर्वक वाचन करून वेळोवेळी मूल्यवान मार्गदर्शन त्यांनी केलेले आहे. काही सूचना तर इतक्या महत्त्वाच्या होत्या की, त्यामुळेच प्रबंधाचे हे रूप धारण केले आहे, असे म्हटल्यास वावगे होणार नाही. मी त्यांचा अत्यंत कृतज्ञ आहे. शिवाजी विद्यापीठाने धुळ्यास जाण्यासाठी प्रवासाचे अनुदान दिले. त्यामुळे तेथे जाऊन हस्तलिखिते पाहता आली व अभ्यासात काही उपयुक्त हस्तलिखितांचा अभ्यास सादर करता आला. त्याचबरोबर वैयक्तिक ग्रंथालयासाठीही अनुदान दिल्याने रामदासांच्या वाङ्मयाचे काही दुर्मिळ ग्रंथ खरेदी करता आले. याबद्दल शिवाजी विद्यापीठाचा मी कृतज्ञ आहे. सांगली येथील स्थानिक वकील समर्थभक्त कै. एस. व्ही. करंदीकर यांनी आपला समर्थांच्या वाङ्मयाचा अमूल्य ग्रंथसंग्रह दिला, याबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहे. हा प्रबंध तयार झालेला पाहण्यास ते आज या जगात नाहीत, याबद्दल दुःख होणे स्वाभाविक आहे. याशिवाय विलिंग्डन महाविद्यालय, सांगली, श्रीमती कस्तुरबाई महाविद्यालय, सांगली, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर यांच्या ग्रंथालयांचा उपयोग करू दिल्यामुळे मी या संस्थांचा अत्यंत कृतज्ञ आहे. देवरूख येथील ब्र. वासुदेव महाराज कुवळेकर या समर्थ संप्रदायी तपस्वी महाराजांशी व श्री. महादेव वा. वैद्य या समर्थभक्तांशी दासबोधाच्या पुनर्रचनेच्या बाबतीत झालेली चर्चा उपयुक्त व मार्गदर्शक ठरली याबद्दल मी त्यांचा ऋणी आहे.

**रा. वा. चिटणीस**

सांगली
१० जानेवारी, १९७३

# श्रीमती रजनी चिटणीस यांचे मनोगत

प्रत्येक गोष्टीची वेळ यावी लागते. आपण कितीही प्रयत्न केले तरी योग्य वेळ आल्याशिवाय घटना घडत नाहीत.

माझे यजमान कै. डॉ. रामचंद्र वामन चिटणीस यांचा जन्म ११ नोव्हेंबर १९१३ (वैकुंठ चतुर्दशी), या दिवशी कोल्हापूर येथे झाला.

चिटणीसांचे जीवन म्हणजे एक अडथळ्यांची शर्यतच होती. ते लहान असतानाच त्यांचे वडील संसारातून विरक्ती आल्यामुळे की काय, परागंदा झाले. खूप प्रयत्न करूनही शोध लागला नाही. सौ. सासूबाईंनी अनेक ठिकाणी घरकाम करून मुलांचे पालन-पोषण आणि शिक्षण करण्याचा निर्धार केला. चार मुले आणि दोन मुली यांची अत्यंत काळजी त्या माऊलीला वाटे. मुलांनीही आईला जमेल तसा हातभार लावला. वर्तमानपत्रे टाकणे, कोणाची भाजी आणून देणे, डबे पोहोचवणे इत्यादी कामे हे करत होते. वार लावून जेवावे लागे. असे कष्ट करून त्यांनी मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. कालांतराने वयाच्या साठाव्या वर्षी ते पीएच्.डी. सुद्धा झाले.

हे कष्ट करतानाच त्यांनी समाजाप्रती आपले कर्तव्यही चोख बजावले. आपल्या आवडीच्या छंदांनाही जोपासले. कोल्हापूरला पारावर प्रवचने होत. त्यांची टिपणे काढून नंतर ती प्रवचने पुन्हा पूर्ण लिहून काढीत असत. तेव्हापासूनच अध्यात्माची आवड होती. जेव्हा कोल्हापूरला प्लेगची साथ आली त्या वेळी ते केवळ १७-१८ वर्षांचे होते. अशा कोवळ्या वयात असंख्य प्रेते वाहून नेण्याचे काम त्यांनी केले. भित्रेपणा स्वभावात नव्हताच. कोणत्याही परिस्थितीशी टक्कर देत आणि लोकांना मदत करण्यासाठी धडपडत असत.

ते कोल्हापूरच्या राजाराम हायस्कूलचे विद्यार्थी. पहिल्यापासूनच हुषार विद्यार्थी म्हणून गणले जात. कोणाचेही अंधानुकरण न करता स्वत:च्या बुद्धीने व विचाराने स्वत:चे आयुष्य घडवण्याचे त्यांचे ध्येय होते.

१९३२ साली निपाणी येथील ध्येयनिष्ठ राष्ट्रीय पाठशाळेत ते शिक्षक म्हणून वीस रुपये पगारावर रुजू झाले. या काळात शरीर कमावण्यासाठी ते रोज १२०० सूर्यनमस्कार घालीत असत. या व्यायामानंतर कडुनिंबाची १०-१२ पाने, भिजवलेले १०-१२ शेंगदाणे व २ चमचे भिजवलेली हरभरा डाळ एवढाच खुराक घेत असत. कोल्हापुरातील तालमीत कुस्त्याही करीत. हाताच्या बुक्कीने नारळ फोडणे, मिठाच्या तीन खड्यांवर शिरेकडून नारळ ठेवून तो फोडणे, असे शक्तीचे प्रयोग करीत. एकदा गोरक्षणातील पाडा विहिरीत पडलेला असताना विहिरीत उडी मारून त्यांनी त्याला वर काढले. आजच्या जमान्यात शरीर कमावण्यासाठी अशी मेहनत दुर्मिळच! शरीर व बुद्धी दोन्हीची ताकद तेथे एकवटली होती.

याच काळात महात्मा गांधीजींनी काही कारणांसाठी उपोषणाचा मार्ग अवलंबला. त्यांना पाठिंबा देण्यासाठी निपाणीतील सर्व शिक्षकांनीसुद्धा तीन दिवस उपोषण केले. तेव्हापासून म. गांधीचींचा प्रभाव त्यांच्यावर खोलपणे ठसला. त्या वेळचे राजकीय वातावरणही स्फूर्तिदायक होते. स्वातंत्र्यासाठी स्वत:ला झोकून देणे यात प्रत्येकजण धन्यता मानत होता. चिटणीसांच्या

मनातही राष्ट्रासाठी काम करण्याची तळमळ निर्माण झाली. निपाणीमध्येच याचे बीज रुजले व अंकुरले.

त्यानंतर थोडे दिवस त्यांचा मुक्काम कामानिमित्त मुंबईला होता. त्या वेळी त्यांनी एका घड्याळाच्या कारखान्यात नोकरी केली. याच वेळी त्यांना मुंबईतील प्रसिद्ध 'राजाबाई टॉवर' चे प्रचंड घड्याळ दुरुस्त करण्याची संधी मिळाली. याच सुमारास वंदनीय साने गुरुजींच्या चळवळीत त्यांनी भाग घेतला. त्यांचे 'बुलेटीन' गुप्तपणे इकडून तिकडे पोहोचवण्याचे कामही त्यांनी केले.

कालांतराने 'ॲडव्होकेट' चे शिक्षण पूर्ण करण्यासाठी ते पुन्हा कोल्हापूरला आले. नंतर 'खादीभांडारा'त काम करू लागले. 'खादीभांडारा'तर्फे ते वर्ध्याला गेले. वर्ध्याजवळ मूल-मरोडा येथे चरखासंघाचे कार्य चालू होते. तेथे त्यांनी पेळू घेऊन चरख्यावर सूत कातायला लोकांना शिकवले. विणकऱ्यांना सूत पोहोचवणे, खादीचे कापड तयार करून घेणे, विणकऱ्यांना पगार वाटप करणे अशी पडतील ती कामे ते करीत. उन्हा-तान्हात फिरताना ते 'हॅट' वापरत, त्यामुळे लोकांना भीती वाटे की, हा इंग्रजांचा माणूस आहे. त्यामुळे चोरी-मारीचा त्रास कधी झाला नाही.

कोल्हापूरला एका वैद्याकडे असताना औषधांची माहितीही झाली होती– त्याचा उपयोगही खेडूतांना व्हायचा. एकदा एका मित्राला खूप बरे नव्हते. डॉक्टरांचे घर नदीपलीकडे होते. नदीला पूर आला होता. नावाडी नदीत होडी घालण्यास तयार नव्हता. रात्री बारा वाजता ह्यांनी पाण्यात उडी घेतली. डॉक्टरांकडे जाऊन सर्व परिस्थिती सांगून कसेबसे डॉक्टरांना घेऊन आले– तेव्हा नावाड्याने साथ दिली. मित्रावर उपचार झाले. मित्रकर्तव्यासाठी केवढे हे धारिष्ट्य! कॉलऱ्याच्या साथीच्या वेळीही डॉक्टरांबरोबर खेड्या-खेड्यांत जाऊन औषधे देऊन रुग्णांची सेवा केली. हा निष्काम कर्मयोगच नव्हे का?

चरखासंघाचे काम आणि वकिलीचा अभ्यास दोन्ही चालू होते. चरखासंघाच्या इतर कार्यकर्त्यांचा विरोध असूनही, त्यांनी कामात सवलत न घेता रात्री जागून 'ॲडव्होकेट'चा अभ्यास केला व 'ॲडव्होकेट' झाले. त्या वेळी त्यांच्याबरोबर मा. श्री. राजाभाऊ पडळकर होते. श्री. पडळकर यांनी नुकतीच वयाची शंभर वर्षे पूर्ण केली आहेत. १९४० साली चिटणीस 'ॲडव्होकेट' झाले तेव्हापासून 'खादी'चा अंगीकार केला. आयुष्यभर खादीशिवाय दुसरे वस्त्र वापरले नाही.

वर्ध्याला 'राष्ट्रभाषा प्रचार समिती'चे काम त्या वेळी आचार्य काका कालेलकर पाहात होते. तेथील म. गांधीजींच्या आश्रमातील ग्रंथालयाची जबाबदारी चिटणीसांनी स्वीकारली. ग्रंथालयातील पुस्तकांचे व्यवस्थित वर्गीकरण करून ती लावल्याबद्दल आणि वक्तशीरपणाबद्दलही स्वत: म. गांधीजींनी त्यांचे कौतुक केले व स्वत:च्या हस्ताक्षरात प्रशस्तिपत्र दिले. मात्र तेथील एका नामांकित लेखक-कार्यकर्त्याने ते फाडून टाकले– हे दुर्दैवच! राष्ट्रभाषा प्रचार समितीचा स्टॉल घेऊन ते रायगड कॉंग्रेस अधिवेशनास गेले होते. त्या वेळी जमनालाल बजाज, वल्लभभाई पटेल, राजेंद्रप्रसाद इ. नेत्यांच्या भाषणांनी ते पुन्हा प्रभावित झाले.

प्रकृतिअस्वास्थ्यामुळे त्यांना वर्धा सोडावे लागले. ते पुन्हा कोल्हापूरला आले. १९४१ साली आमचा विवाह झाला. सकाळी हिंदीचे क्लासेस, दुपारी ११ ते ५ नोकरी व रात्री नाईट हायस्कूलमध्ये शिकविणे एवढे काम ते करीत. घरी भावंडांची जबाबदारी होतीच. मात्र हिंदीचा

प्रचार त्यांनी खऱ्या अर्थाने केला. त्या क्लासेसमधून पैसे घेतले नाहीत. त्यांनी स्वत: राष्ट्रभाषा प्रचाराच्या सर्व परीक्षा दिल्या– 'कोविद', 'पंडित', 'साहित्यरत्न'–अलाहाबाद. ग्रॅज्युएट होण्याच्या महत्त्वाकांक्षेने प्रेरित होऊन कोल्हापूरच्या राजाराम कॉलेजमध्ये त्यांनी प्रा. पंगु यांच्या मदतीने प्रवेश घेतला– १९४८ साली ते बी.ए. ला राजाराम कॉलेजमधून पहिले आले. पुणे विद्यापीठाकडून शिष्यवृत्तीही मिळाली.

३० जानेवारी १९४८ ला म. गांधीजींचा वध झाला. ब्राह्मण लोकांना जीवे मारण्याची धमकी दिली गेली. सगळीकडे दंगा पेटला. कोल्हापूरला स्टेशनवर सुऱ्यांचे पार्सल आल्याचे ह्यांना कळताच ती बातमी त्यांनी कलेक्टरला दिली. ताबडतोब पोलिसगाड्या सोडल्या गेल्या व सुरे मिळाले. ह्यांच्यामुळे पुढील मोठा अनर्थ टळला. आमच्या घरीही सामान जाळण्यासाठी लोक आले होते; पण महात्माजींचा फोटो घरात होता तो पाहून ते परत गेले. अशा कठीण काळात चिटणीसांनी दुभाष्याचे कामही केले. कोर्टातर्फेही त्यांनी दुभाषी म्हणून काम केले. न्यायमूर्ती कोयाजींनी त्यांना सर्टिफिकेट दिले होते.

त्या वेळी नुकतेच स्वातंत्र्य मिळाल्याने राष्ट्रभाषा हिंदीचे वर्चस्व वाढले होते. चिटणीस कोल्हापुरामधले पहिले राष्ट्रभाषा प्रचारक होते. सर्वांना हिंदी परीक्षा पास करण्याचा हुकूम होता. त्यामुळे त्यांना मोठमोठ्या अधिकाऱ्यांना हिंदी शिकविण्याची संधी मिळाली.

या कालावधीत घरातही वाद होऊन कुटुंब विभक्त झाले. मुलांची जबाबदारी वाढली. अशा परिस्थितीतही इंग्रजी, मराठी व हिंदी विषयात एम. ए. च्या ३ पदव्या त्यांनी मिळविल्या. रत्नागिरीच्या गोगटे कॉलेजमध्ये १९५३ साली त्यांना लेक्चररची जागा मिळाली. १० वर्षे तेथे राहून सांगलीला लठ्ठे एज्युकेशन सोसायटीच्या कॉलेजमध्ये ते प्रोफेसर झाले. येथे जवळजवळ वीस वर्षांचा काळ गेला. थोडे निवांत आयुष्य मिळाले. मुलांचे शिक्षण होऊन तीही मार्गी लागली. त्या वेळी मी फक्त इंग्रजी चौथी पास होते. माझ्या पाठीशी उभे राहून त्यांनी मला शिकायला प्रोत्साहन दिले. मोठ्या मुलीबरोबरच मीही मॅट्रिक झाले. मलाही पुढे शिकायची हौस होती. त्यामुळे माझे एम्. ए. पर्यंतचे शिक्षण पूर्ण झाले. शिक्षणाची गोडी आणि महत्त्व आमच्या घरातच असल्यामुळे चारी मुलांमध्येही ते पूर्णपणे उतरले. आज माझ्या तीन मुली आणि एक मुलगा उच्चविद्यविभूषित आहेत. सुशिक्षित आहेत. सुसंस्कृतही आहेत. चांगल्या पदावर काम करताहेत– याचा सार्थ अभिमान निश्चित आहे. दोन नाती इंजिनिअर आहेत. एक आर्किटेक्ट आहे. एक नात इलेक्ट्रॉनिक्स एम्. एस्सी. आहे. इतर नातवंडेही शिकत आहेत. 'शिक्षण हीच आमची संपत्ती. हेच आमचे वैभव!' माझ्या यजमानांचे ध्येय तर ज्ञानदान हेच होते. ते प्राचार्य म्हणून सांगलीला कन्या महाविद्यालयातही काम पाहात होते. याच पदावरून ते निवृत्त झाले.

विशेष म्हणजे निवृत्त झाल्यावर वयाच्या साठाव्या वर्षी त्यांनी पीएच.डी. केले. 'समर्थ रामदासांची काव्यसृष्टी : एक अभ्यास' असे यांच्या प्रबंधाचे शीर्षक होते. शिक्षणाला वयाचे बंधन नसते–हा आदर्श त्यांनी घालून दिला आहे. आजच्या पिढीने तो लक्षात ठेवावा असा आहे.

आतापर्यंतच्या अविरत कष्टांमुळे व धडपडीमुळे त्यांची प्रकृती ढासळत गेली. ॲलर्जीचा त्रास वाढला. त्यातच कोल्हापूरहून सांगलीला परतताना संध्याकाळी स्कूटरचा ॲक्सिडेंट झाला. जबर मार लागला. त्यांच्या एका विद्यार्थ्याने त्यांना ओळखले व मिरजेला मिशन

हॉस्पिटलमध्ये ॲडमिट केले आणि नंतर घरी हलवले. तो विद्यार्थी सांगलीहून येणाऱ्या बसचा विजय भोसले नावाचा कंडक्टर होता. तो त्या वेळी नसता तर....! कल्पनाच करवत नाही. या वेळी मुलगा व धाकटी मुलगी शिक्षणासाठी परगावी होती. मलाही नैराश्य यायचे. तेव्हा ते 'दासबोधा'चे एखादे पान उघडून मला वाचायला लावीत. त्याने निराशेला आशेचा सूर गवसायचा. त्यामुळे आम्हा दोघांनाही मन:शांती लाभे. जिवावरच्या दुखण्यातून उठल्यावरही किरकोळ तक्रारी सुरूच होत्या.

मोठी मुलगी व मुलगा डोंबिवलीला स्थायिक झाले. ह्यांचा निवृत्तीनंतर आम्हीही डोंबिवलीला मुलाकडे राहायला आलो. इथेही ते दासबोध वर्ग घेत असत. प्रवचने, व्याख्यानेही देत असत. डोंबिवलीतील गणेशमंदिरातील वाचनालयाला आकार देणाऱ्या पहिल्या काही सदस्यांमध्ये ते एक होते. हळूहळू वृद्धापकाळाने त्यांची गात्रे क्षीण होत गेली. प्रकृतीने साथ दिली नाही. शेवटी ३१ ऑक्टोबर १९९१ ला अनेक गुणरूपी सुगंधाने फुललेला हा 'महकता गुलदस्ता' निर्माल्यरूप झाला. पण देहाने निर्माल्यरूप झाला, तरी आसमंतात आपल्या जीवनातील सुगंधी क्षणांची उधळण करून गेला. आपण त्यांच्याकडून संपूर्ण जीवनाचाच धडा घ्यायचा आहे, त्यांच्या मार्गाचे निदान प्रामाणिकपणे अनुक्रमण करायचे आहे– याची सतत जाणीव आहे.

त्यांच्या सर्व गुणामुळे त्यांना कोणती उपमा द्यावी, ते उमजत नाही. आदर्श शिक्षक, उत्तम व्यायामपटू, सर्वस्व झोकून देणारे सामाजिक कार्यकर्ते तर ते होतेच. माझ्या स्वत:च्या दृष्टीने तर ते 'क्षणाचे पती आणि अनंतकाळचे मार्गदर्शक दीप' होते. जीवनाच्या या धकाधकीतही माझ्या जीवनाची नौका आपला प्रवास आज शांतपणे करत आहे. मी आश्वस्त आहे– या दीपस्तंभाच्या प्रकाशात!

माझ्या प्रकृतीच्या तक्रारीही वृद्धापकाळामुळे सुरू आहेत; पण आज वयाच्या ७८ व्या वर्षीही चिटणीसांचा प्रबंध पुस्तकरूपाने लोकांसमोर आणावा अशी जिद्द आहे. त्यांच्या प्रथम श्राद्धदिनी १९९२ ला 'मना सज्जना' हे त्यांच्या १९ निवडक लेखांचे पुस्तक त्यांचेच विद्यार्थी व सहकारी पुण्याचे डॉ. अशोक कामत यांच्या सहकार्याने प्रकाशित झाले. मध्यंतरी बराच काळ लोटला. आता त्यांचा प्रबंध पुस्तकरूपाने प्रकाशित होत आहे. हा प्रबंध त्यांनी कै. डॉ. पारनेरकर महाराजांच्या प्रेरणेने वयाच्या ६० व्या वर्षी लिहिला. त्यांचीही इच्छा होती की, हा प्रबंध प्रकाशित व्हावा, विशेषत: संतवाङ्मयाच्या अभ्यासकांना त्याचा उपयोग व्हावा. हे त्यांचे स्वप्न आज पूर्णत्वास आले आहे. त्यामागेही पुणे विद्यापीठातील नामदेव अध्यासनप्रमुख डॉ. अशोक कामत यांचे परिश्रम व मार्गदर्शन आहे. त्यांना मनापासून धन्यवाद.

पुस्तक प्रकाशनाच्या कामात ज्या ज्या लोकांचे साहाय्य लाभले त्या त्या सर्वांनाही मनापासून धन्यवाद.

**रजनी चिटणीस**

डोंबिवली
२० मार्च, २००४

# संक्षेपक– संपादकांचे दोन शब्द

समर्थ साहित्याचे उपासक, अभ्यासक आणि संशोधक डॉ. रा. वा. चिटणीस यांनी 'रामदासांची काव्यसृष्टी : एक अभ्यास' या शीर्षकाचा प्रबंध डॉक्टरेटसाठी सिद्ध केला. तो आता ग्रंथरूपाने प्रसिद्ध होत आहे. हा ग्रंथ म्हणजे रामदासांच्या काव्याचा अभ्यासपूर्वक करून दिलेला मार्मिक परिचय म्हणता येईल. तीस वर्षांपूर्वी हा प्रबंध विद्यापीठीय संशोधनाच्या स्वरूपात सादर केला गेला. शिवाजी विद्यापीठाने प्रथमच 'रामदासांची काव्यसृष्टी : एक अभ्यास' अशा विषयासाठी परवानगी द्यावी, हे या प्रबंधाचे वैशिष्ट्यच म्हणता येईल.

कवीच्या जीवनदर्शनाचे माहात्म्य व त्यांच्या काव्यातून प्रेरित होणारी आनंदाची प्रतीती या दोन्ही दृष्टींनी डॉ. रा. वा. चिटणीस यांनी परिश्रमपूर्वक संशोधन केले आणि हा प्रबंध सिद्ध केला, ही त्याची खरी विशेष उल्लेखनीय कामगिरी आहे. अशा ग्रंथवाचनाने ज्ञानाचा लाभ तर होतोच, पण त्याबरोबरच जीवनाचा अनुबंध कळावयास लागतो. म्हणून या ग्रंथाचे महत्त्व आहे. प्रबंधसिद्धीसाठी ठिकठिकाणी जाऊन हस्तलिखिते मिळविण्यापासून तो त्या काव्याची यथातथ्य साक्षेपी मीमांसा करण्यापर्यंतचे कार्य त्यांनी मोठ्या निष्ठेने केले. या ग्रंथातून रामदासांच्या व्यक्तिमत्त्वाची, विचारांची स्पंदने आढळणे स्वाभाविकच होते; पण त्याचे स्वरूप काय ते डॉ. चिटणीस यांनी येथे साधार विशद केले आहे. परमार्थविवेचन आणि कवित्वशक्ती अशी दोन्ही बाबतीत समर्थ रामदासांविषयींचे अध्ययन येथे करण्यात आले आहे.

समर्थ रामदासांच्या वाङ्मयाचे आणि जीवनकार्याचे मूल्यमापन आतापर्यंत भिन्न भिन्न दृष्टिकोनांतून झालेले आहे. रामदासांचा सर्व जीवनग्रंथच अभ्यासनीय आहे. त्यांचे पारमार्थिक तत्त्वज्ञान हे भागवतधर्मीय ज्ञानेश्वर-तुकारामादि संतांच्या विचारांशी बहुतांशी जुळते असले तरी व्यावहारिक तपशिलाबाबत रामदासांचा वेगळा बाणा आहे. रामदासांच्या ग्रंथाचा आजपर्यंत आध्यात्मिक आणि व्यावहारिक विचारापुरताच झालेला दिसतो. परंतु रामदासांच्या शैलीची वैशिष्ट्ये, कवी या नात्याने त्यांचे स्थान इत्यादी वाङ्मयीन दृष्टीने अध्ययन कमी झालेले आढळते. ही उणीव डॉ. चिटणीस यांच्या या ग्रंथामुळे भरून निघाली आहे.

'रामदासांची काव्यसृष्टी : एक अभ्यास' या प्रबंधग्रंथातील समग्र विवेचनातून हाती आलेले ठळक निष्कर्ष पुढीलप्रमाणे मांडता येतील :

पहिल्या आणि दुसऱ्या प्रकरणातून समर्थांचा जीवनपट मांडला असून पूर्वसूरींचा साक्षेपी आढावा घेतला आहे. अनेक विद्वानांनी समर्थांच्या प्रकाशित-अप्रकाशित वाङ्मयावर जे साक्षेपी लेखन केले, त्याचा सुजाणपणे परामर्श घेतला आहे. या प्रकरणांतून एकूणच त्यांच्या सर्व प्रकारच्या काव्याचा आढावा घेतला आहे. तिसऱ्या प्रकरणात समर्थांच्या आरत्या, स्तोत्रे, लोककाव्ये, भारुडे, यांचा प्रामुख्याने विचार केला आहे. 'समर्थांचे काव्य हे काव्यच नव्हे,

समर्थ हे कवी नव्हतेच', टीकाकारांच्या अशा टीकेला डॉ. चिटणीस यांनी सोदाहरण उत्तरे दिली आहेत. जीवनवादी आणि परतत्त्वस्पर्शी रचना हे त्यांच्या काव्याचे खरे वैशिष्ट्य आहे, हे ते आवर्जून सांगतात. चौथ्या प्रकरणात अध्यात्मावर काव्यलेखन असून साधकाने देहात्मभाव विसरून सगुण भगवंताची प्राप्ती करता करता निर्गुणात कसे उतरावे, याचे समर्थांनी पोटतिडकेने प्रतिपादन केले आहे. चार-पाच-सहा ही प्रकरणे अनेक स्फुट विषयांचा परामर्श घेणारी आहेत.

संत पंचायतनाची पूर्वप्रचलित कल्पना सांगून या ग्रंथात डॉ. चिटणीस यांनी दासपंचायतनाची वेगळी वैशिष्ट्ये सांगितली आहेत. हे संत एकाच देवाचे वा एकाच संप्रदायाचे अनुयायी नव्हते. ते नि:संग, विरक्त होते. त्या सर्वांनी लोकांना परिस्थितीशी टक्कर देत जगण्याची शिकवण दिली. सामान्यांना भक्तिमार्गी बनविले. स्वधर्माबद्दल त्यांच्यात अस्मिता, प्रेम, आस्था निर्माण केली. डॉ. चिटणीस यांनी दासपंचायतनाची थोरवी सांगून त्यांचे नेते समर्थ रामदास कसे लोकविलक्षण होते, हेही प्रभावी रीतीने दाखवून दिले आहे. जयरामस्वामी वडगावकर, रंगनाथस्वामी निगडीकर, आनंदमूर्ती ब्रह्मनाळकर आणि केशवस्वामी भागानगरकर या दासपंचायतनातील प्रत्येक संताचे कार्यवैशिष्ट्य त्यांनी विशद केले आहे.

समर्थ निस्सीम रामभक्त होते. स्वराज्य निर्मितीसाठी 'मराठा तितुका मेळवावा' असा मंत्र त्यांनी दिला. 'देव मस्तकी धरावा । अवघा हलकल्लोळ करावा ।।' असा संदेश देत त्यांनी जन-जागरण केले. समाजातील क्षात्रतेजाला नव्या उमेदीने, नव्या तडफेने जागृत होण्यासाठी त्यांनी आपल्या घनगंभीर वाणीने साद घातली. अस्मानी सुलतानीच्या विरुद्ध रान पेटविले. व्यक्तीपेक्षा देश-धर्माला प्राधान्य देऊन कार्यप्रवण होण्याचा मनोपदेश केला. चिटणीसांनी आपल्या ग्रंथात समर्थांच्या स्वराज्य-स्वप्नाचे नेमकेपणाने दर्शन घडविले आहे. सातव्या प्रकरणात समर्थांच्या मनाच्या श्लोकांचा अर्थपूर्ण परामर्श घेण्यात आला आहे. यात अचपळ मनाला अनेक रीतीने आळवून रामप्राप्ती कशी करून घ्यावी, स्वत:चा उद्धार कसा करावा, हे आग्रहाने प्रतिपादिले आहे. मनाच्या श्लोकांबरोबरच राममंत्राचे श्लोक, सुकृतयोग, कौल, आनंदवनभुवनी, स्फुट श्लोक, स्फुट प्रकरणे आदींचाही समावेश आहे. रामचरित्रे, रामरावण-युद्ध-वर्णन, लघुरामचरित्र, रामसीता विवाह, सुंदरकांड, युद्धकांड, तसेच श्रीकृष्णाची तीन चरित्रे, शिवराय व मंत्री यांना उपदेश, शिवरायांचा गौरव, राजधर्म, क्षात्रधर्म, सेवाधर्म, अफजलखान वध, राजास पत्र इत्यादी संबंधींचा अभ्यास आला आहे. समर्थांनी एक स्वतंत्र गुरुगीता रचलेली आहे. यात डॉ. चिटणीस यांनी पुराणातील गुरुगीतेपेक्षा समर्थांच्या गुरुगीतेची वेगळी वैशिष्ट्ये दर्शविलेली आहेत. ही गुरुगीता दासबोधाआधी भारतभ्रमण काळात लिहिली असावी, असे त्यांना वाटते. गुरुगीतेच्या नित्यपठणाने मन सगुणाकडून निर्गुणाकडे वळून स्थिर होऊ शकते. म्हणून नित्य उपासनेत साधनेच्या दृष्टीने हा ग्रंथ विशेष महत्त्वाचा आहे, असे लेखकाचे मत आहे. नववे प्रकरण संपूर्णपणे नव्या दासबोधाला दिले असून जुन्या दासबोधातील २१ वा दशक वगळून २० दशकी दासबोधरचनेचे वैशिष्ट्य सांगितले आहे.

दासबोध हा समर्थांचा सर्वांत महत्त्वाचा ग्रंथ. त्यामुळे दासबोधाची भाषाशैली, वक्तृत्वप्रधानता, सुभाषितांचे वजन, भाषेची जडणघडण, विवेकसिंधू आणि दासबोध, एकनाथी भागवत आणि दासबोध, ग्रंथराज दासोपंत आणि ग्रंथराज रामदास अशी तुलना येथे केली आहे. दहाव्या प्रकरणात रामदासांच्या अप्रकाशित काव्याचा सविस्तर आढावा घेतला आहे. (अर्थात हे संशोधन तीस वर्षांपूर्वीचे असल्याने आता बरेच अप्रकाशित काव्य प्रकाशित झाले असल्याची शक्यता नाकारता येत नाही.) विस्तारभयास्तव ते काव्यग्रंथामध्ये संपूर्ण दिले नसले तरी

चिकित्सकांनी त्यात दिलेले बाड क्रमांक मुळातून पाहावेत.

रामदासांची शब्दसंपत्ती, शब्दांचे व्याकरण, शब्दद्वारा व्यक्तिदर्शन, शब्दसृष्टीतील बहामनीकालीन आणि शिवकालीन खुणा, समर्थांची समर्थ भाषाशैली, सुभाषिते, अलंकार यांचा सुंदर आढावा, असे अकराव्या प्रकरणाचे स्वरूप असून त्याव्यतिरिक्त रामदासांच्या काव्यावर जे काही यशवंत आक्षेप रामचंद्र दाते, रा. श्री. जोग, वि. का. राजवाडे यांनी घेतलेले आहेत, त्यांचा परामर्श येथे घेतला आहे. बारावे प्रकरण प्रामुख्याने कवित्वशक्ती आणि समर्थांचे विभूतिमत्व प्रतिपादित करणारे आहे. प्रसाद, माधुर्य, ओज हे काव्यगुण रामदासांच्या काव्यात आहेतच; पण समर्थांची शब्दकळा कशी सामर्थ्यसंपन्न आहे, हे अनेक उदाहरणांनी आणि अवतरणे देऊन सिद्ध केले आहे. समर्थांचे विभूतिमत्व विशद करताना प्रामुख्याने गोरखनाथ, एकनाथ, तुकाराम, कबीर, तुलसीदास, जोसेफ मॅझिनी या महान विभूतींशी रामदासांची तुलना केली आहे. रामदासांच्या व्यक्तिमत्त्वाचा, विभूतिमत्त्वाचा विचार स्वतंत्रपणे केला आहे. तसेच रामदासांचे दास पंचायतनातील स्थान किती उच्च होते, हेही सांगितले आहे. तेराव्या प्रकरणात रामदासांचे टीकाकार आणि त्यांच्या टीकांचा परामर्श घेतला आहे. त्यात डेमिंग, प्रा. न. र. फाटक, पं. बाळाचार्य खुपरेकर शास्त्री, इतिहासकार देशमुख यांचे आक्षेप आणि त्याचे खंडण-मंडण केले आहे. प्रा. गं. बा. सरदार, कविवर्य य. दि. पेंढारकर व शं. के. कानिटकर गिरीश यांच्या विवेचनाधारे समर्थ हे श्रेष्ठ कवी, समाजसुधारक, थोर तत्त्वज्ञ असल्याचे प्रतिपादन केले आहे. चौदाव्या प्रकरणात रामदासांचे पारमार्थिक, सामाजिक आणि कवित्वविषयक विचार यांचा सविस्तर आढावा घेऊन प्रबंधाचा समारोप केला आहे.

महाराष्ट्रातील जनमानसात संत ज्ञानेश्वर, संत नामदेव, संत एकनाथ, संत तुकाराम आणि समर्थ रामदास हे संतपंचक घर करून बसले आहे. संत वाङ्मयाचे गाढे अभ्यासक डॉ. शं. दा. पेंडसे यांनी या पाचही महामानवांना 'महाराष्ट्रातील भागवतधर्माचे प्रणेते' म्हटले आहे. ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, नामदेवगाथा, तुकाराम गाथा आणि दासबोध या पाचही ग्रंथांना 'मराठी भाषेचे पाच वेद' म्हटले जाते. या पाचही ग्रंथांत फार मोठे वैचारिक साम्य आहे.

***साधु दिसती वेगळाले । परि ते स्वरूपीं मिळाले ।***
***अवघे मिळोनी एकचि जाले । देहातीत वस्तु ।।***

डॉ. चिटणीस यांनी अनेक संदर्भ आणि उतारे देऊन आपला प्रबंध परिपूर्ण केला आहे. मुद्रित साधनसामग्रीच्या आधारे, संशोधनाभ्यास (ती दुर्मिळ असली तर ग्रंथालये धुंडाळून) करणे सुलभ असते. पण जुन्या हस्तलिखितांची उपलब्धी, त्या संतांविषयी व त्यांच्या लेखनाविषयींची माहिती मिळविणे ही मोठी जिकिरीची बाब असते. अशा माहितीतून, सांप्रदायिक संदर्भातून मिळणारे काही तथ्यांश देखील प्राचीन कवी आणि त्यांचे लेखन यांच्या अभ्यासातील आधारक्षेत्रं प्रकाशात आणतात. तर कधी रूढ गोष्टींचे वेगळे आकलन घडवितात. या दृष्टीने मूळ हस्तलिखिते डॉ. चिटणीस यांनी प्रयत्नपूर्वक मिळवून अभ्यासली. अभ्यासाची मूळ अस्सल साधनसामग्री गोळा करण्याचा हा प्रयत्नही तितकाच प्रशंसनीय आहे. प्रबंधातील तर्कसंगत विवेचनासोबत त्यांनी केलेले उपरोक्त प्रयत्नही संशोधनदृष्ट्या महत्त्वाचे वाटतात. अनेक वर्षांच्या आपल्या अभ्यासाचे सार या ग्रंथाच्या रूपाने डॉ. रा. वा. चिटणीस यांनी वाचकांच्या हाती दिले आहे. त्यांचे परिश्रम जागोजागी जाणवतात. अभ्यासाबरोबरच त्यांची संतवाङ्मयावरील निष्ठाही प्रकर्षाने जाणवणारी आहे.

संत नामदेव अध्यासन, पुणे विद्यापीठ **डॉ. सौ. शोभा घोलप**
१५/३/०४

# प्रस्तावना

समर्थ रामदास ब्राह्मण्याचे रक्षक असून औरंगजेबाचे हेर होते, इथंपासून तर ते शिवराज्याभिषेकावेळी गैरहजर राहिले आणि त्यांचा आणि शिवाजीराजांचा संबंधच फारसा नव्हता, इथंपर्यंत नानाप्रकारे आक्षेप आणि आरोप पुढे केले गेले आणि आज तर संत तुकोबाराय हेच खरे शिव-गुरू असेही म्हटले जात आहे.

हे सारे म्हणणे कितपत यथार्थ ठरते, याचा विचार करण्यासारखा आहे. नव्हे, तो करायलाच हवा. कारण असा जर विचार केला नाही, तर महाराष्ट्राचा एकूण इतिहासच अन्य प्रांतीयांना अविश्वसनीय वाटेल. अलीकडेच सुनील चिंचोलकर यांनी लिहिलेली 'श्रीसमर्थचरित्र : आक्षेप आणि खंडन' ही पुस्तिका या संदर्भात वाचनीय आहे.

## पूर्वचर्चा– विसंवाद

१८१८ साली मराठी सत्तेचा अस्त झाल्यानंतर पुण्यात फिरंगी इंग्रजांचे निशाण पेशव्यांच्या शनिवारवाड्यावर फडकू लागले. कंपनी सरकारचे प्रतिनिधी करवीर-सातारच्या शिवगादीकडे वा अन्यत्र महाराष्ट्रात न वळता पुण्या-मुंबईवर कब्जा करून राहिले. त्यांना येथील मूठभर मराठी शिक्षित मध्यमवर्गाची भीती होती. कारण, परकीय सजवटीपाठोपाठ 'इंग्रजी वाघिणीचे दूध' पचवून पुन्हा एकदा भारतीय अस्मिता जागविण्याची शक्ती जी थोडीफार शिल्लक होती, ती याच तथाकथित सोवळ्या कर्मठ बुद्धिमंतांच्या मनगटात वा लेखणीत होती. गोरगरीब बहुजनांची आर्थिक-सामाजिक पिळवणूक करण्यात, आपापसांतील हेवेदावे सांभाळण्यात, परकीयांची सेवा-चाकरी करण्यात आपल्या कुळांचे कौतुक मानणारी वा पैशासाठी हवे ते करू शकणारी मंडळी ही केव्हाही आपल्या पदरी राहू शकतील हे ब्रिटिशांनी पुरेपूर ओळखले होते. यासाठी हिंदूंना आपापसांत आणि जमेल तसे अन्य धर्मपंथीयांना देखील हिंदूंशी लढविण्यासाठी 'फोडा आणि राज्य करा' हा राजनीतीचा मूलमंत्रही त्यांना चांगलाच अवगत होता.

इंग्रजांनी हेतुपुरस्सर मेकॉले पद्धतीचे शिक्षण देशात सुरू केले. इंग्रजांचे साथी-सहयोगी मिशनरी ख्रिस्ती धर्मप्रसार करू लागले. इंग्रज प्रशासनाशी संबंधित सैन्याधिकारी अभ्यासक येथील परंपरांचा आपल्या परीने अन्वयार्थ लावीत सत्यशोधन करू लागले. बहुजनांचे जागरण करणाऱ्या काही अर्धशिक्षित मंडळींना या साऱ्यांची हेतुपुरस्सर साथ मिळत राहिली. एतद्देशीयांचे विघटन होणे अधिक सुलभ होऊन गेले. या विशिष्ट वातावरणात संतसाहित्याच्या ऊहापोहावरही जातीय अभिनिवेशांचे सावट पडल्याशिवाय राहिले नाही. न्यायमूर्ती महादेव गोविंद रानडे यांनी केलेली संतकाव्ये आणि कार्याची समतोल मीमांसा मागे पडली. इतिहासाचार्य राजवाड्यांनी

केलेले रामदासी काव्यकार्याचे मंथन आणि संत तुकाराममहाराजांच्या सीमा-मर्यादांचे अवलोकन इतके गाजले की, त्यातून 'वारकरी' विरुद्ध 'धारकरी' असा एक सवतासुभाच उभा राहिला. पुढील ब्राह्मणेतर चळवळीसाठी तो पोषक ठरला.

## महाराष्ट्रधर्म आणि संतमंडळ

महाराष्ट्रात प्राधान्याने नाथ, महानुभाव, वारकरी, रामदासी हे चार संप्रदाय विशेष प्रचलित दिसतात. याबरोबरच वीरशैव, दत्त, गणेश, आनंद, नागेश, देवी अशा अन्य काही संतसंप्रदायांचाही आजच्या महाराष्ट्राच्या जडणघडणीतील वाटा लक्षणीय आहे.

गुरू गोरक्षनाथ आणि त्यांच्या परंपरेशी निगडित नाथसिद्धांचा महाराष्ट्र प्रदेशाशी असलेला अनुबंध अनेक प्रमाणांनी स्पष्ट करता येतो. निवृत्ति-ज्ञानदेवादी भावंडे, महात्मा चक्रधर, संत नामदेव, संत जनाबाई, संत एकनाथ, संत तुकाराम, समर्थ रामदास, संत बहिणाबाई असे अनेक महत्त्वाचे संतभक्त महाराष्ट्रात होऊन गेले. मराठी संस्कृतीचा इतिहास त्यांनी मुख्यत: घडविला. यांचा नाथपंथाशी काही ना काही संबंध दिसतो. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास या पाच थोर भक्त पुरुषांना डॉ. शं. दा. पेंडसे यांच्यासारखे ज्येष्ठ अभ्यासक **'भागवतधर्माचे प्रणेते'** मानतात. या संतपंचकाबरोबर महात्मा चक्रधर यांना **'महाराष्ट्रधर्माचे प्रणेते'** असे पूर्वीच म्हटले गेले आहे.

गोरखबानी, गीता-टीका भावार्थदीपिका अथवा ज्ञानेश्वरी, नामदेवगाथा, एकनाथगाथा, नाथभागवत, तुकारामगाथा आणि दासबोध या ग्रंथांतून खरा महाराष्ट्रधर्म जागविला गेला. या सर्व ग्रंथांत अनेक प्रकारे साम्य दिसते. जगाची नश्वरता, मनाची वासनिकता, मानवी शरीराचे मर्त्य स्वरूप, प्रपंचाची सुखदु:खमयता, गुरुकृपेने दौर्बल्यावर मात, ईश्वराची सगुण-निर्गुण अन् सर्वव्याप्तता, साधनेचे महत्त्व, अशा कितीतरी बाबतीत वरील संतग्रंथांतून एकवाक्यता आढळते. वर्णव्यवस्थेविषयी विचार करतानाही या संतांनी कुठे आक्रोश केलेला नाही. एकूण समाजव्यवस्थेतील गुणदोषांचा ऊहापोह त्यांनी व्यवहार्य दृष्टी ठेवून केलेला दिसतो.

समर्थांच्या शब्दांत सांगायचे झाले तर, साधू वरवर पाहता 'वेगळाले' दिसत असले, तरी ते 'स्वरूपी' मात्र मिळालेले असतात. 'अवघे मिळोनि येकचि जाले । देहातीत वस्तू' अशा निर्मळ दृष्टीने आपण त्यांच्याकडे पाहावयास मात्र हवे.

## संत तुकाराम आणि रामदास

इंग्रजांच्या जुलमी राजवटीविरुद्ध विविध पातळ्यांवरून आपण लढा दिला. इतिहासाचार्य वि. का. राजवाडे यांच्यासारखे अत्यंत आग्रही आणि केवळ समर्थ रामदासांनाच संत समजणारे काही अभ्यासक त्या काळात बहुधा स्वराज्यलढ्याच्या उद्दिष्टाने 'वारकरी' आणि 'धारकरी' असा भेद करू लागले असे दिसते. राजवाड्यांनी तर सरळ सरळ अशी भूमिकाच स्वीकारली की, वारकरी संतमंडळ केवळ टाळकुटे होते. त्याने स्वकीयांना परकियांविरुद्ध लढायला प्रवृत्त न करता दैववादी आणि क्रियाहीन बनविले आणि समर्थांनी बलोपासनेवर भर देत, प्रपंचाचे आणि राजकारणाचे महत्त्व जाणले. समाजाला परकियांच्या प्रतिकारासाठी सिद्ध केले. शिवाजीराजांच्या भोवती 'मावळा' आणि 'सोवळा' सामर्थ्याने एकत्र यावा म्हणून काही भरीव कार्य केले.

इतिहासाचार्य राजवाड्यांपूर्वी महाराष्ट्रातील संतपरंपरेचा विचार बहुश: एकत्रितपणे झाल्यामुळे

संतसाहित्यातील समन्वयशीलता दुर्लक्षिली गेली नाही. 'वारकरी' संप्रदाय हा निवृत्तिपर आहे आणि रामदासी पंथ हा 'धारकरी' वा प्रवृत्तिपरच आहे असे कुणी मानले नाही. महानुभावांमध्ये संत नसून महंतच आहेत आणि रामदासी मठ-महंत हे विशिष्ट वर्गाचेच आहेत याबद्दल चर्चा झाली नाही, उलट मराठी संतपरंपरेबरोबरच इथे संत कबीर, कृष्णलीलागायक सूरदास, रामोपासक गोस्वामी तुलसीदास, गिरिधरगोपालमय मीराबाई यांचाही स्वीकार होत राहिला. किंबहुना संतपरंपरा केवळ विशिष्ट प्रदेशाची, वा भाषेपुरती नाही तर ती भारतीय आहे, अशी जाणीव जपली गेली.

संत तुकाराम आणि समर्थ रामदास हे जरी एक विठ्ठलभक्त आणि दुसरे रामभक्त होते, तरी त्यांचे समकालीनत्व आणि काळाविषयींची त्यांची समज नाकारता येत नाही. एकाने भक्ती ही सामाजिक नीतिशक्ती मानली तर दुसऱ्याने उपासनेच्या मार्गाने जात राहून आणि हरिभजन न सोडता अवतीभवतीच्या बदलत्या परिस्थितीचे भान ठेवावे, चुकतील त्यांना फजित करावे, नाठाळांचा उघडपणे प्रतिकार करावा हेच कथन केले. सज्जन समर्थ व्हावेत आणि सामर्थ्य प्रकट करणारे देखील सज्जनत्वाला पारखे होऊ नयेत हेच दोहोंनी पाहिले. रामदास जरी अविवाहित राहिले तरी त्यांनी प्रथम प्रपंच करावा, मगच परमार्थ साधावा, हा विवेक सांगितला. तुकोबारायांचा प्रपंच अडीअडचणींचा झाला, तरी त्यांनी तो न सोडता पारमार्थिक आनंद मिळविला आणि तो 'वाटितो अनेका' अशा तृप्तीने अभंगांच्या मेघवृष्टीने त्यांनी सर्वांना भिजवून टाकले.

संत तुकारामांच्या नावावर असणारे 'ब्रह्मज्ञ ब्राह्मण वैराग्य पुतळा । रामभजनी लीळा अनुपम्य' असे रामदास स्तवन किंवा 'धन्य तुकाराम धन्य तुझी वाणी । ऐकता उन्मनी दीप लागे । नवविधा भक्ति रुढविली जगीं । तारु कलियुगी दास म्हणे ।' असे रामदासांच्या नावावर असणारे तुकोबास्तवन अभ्यासकही विसरले, उपासकही विसरले. रामदासांनी रचलेली समस्त संतमंडळाची आरती किंवा 'कलियुगी त्रासुनि गेले सज्जन भवउष्णे । ते समयी अवतारा घेऊनि श्रीकृष्णे ।' ही ज्ञानेश्वरांची आरतीही लोक विसरले. पंढरपूरच्या श्रीविठ्ठल मंदिरात असणारा समर्थस्थापित मारुती आणि त्याच्याखाली कोरलेला 'शरण शरण हनुमंता । तुज आलो रामदूता ।' हा तुकाराम महाराजांचा अभंग दृष्टिआड झाला. श्रीविठ्ठलाच्या दर्शनासाठी पंढरीत येऊन विटेवरल्या श्रीविठ्ठलाला 'येथे उभा का श्रीरामा । मनमोहन मेघश्यामा ।' अशी आर्त आळवणी करणारे रामदासही विस्मरणाचा विषय झाले.

हे द्वैत केवळ सांप्रदायिक दुराग्रह आणि अभ्यासकांचे हट्टाग्रह यांतून उद्भवले असे म्हणावे लागते.

## अभ्यासक– सुधारकांचे कसब

इतिहासाचार्य वि. का. राजवाडे आणि त्यांच्या प्रभावळीतील संशोधक– इतिहासाभ्यासकांनी जसे संतांच्या सामाजिक कार्याचे ऐतिहासिक दृष्टीने मूल्यमापन नि:पक्षपातीपणाने केले नाही; तसेच समाजपरिवर्तन आणि त्यासाठी प्रबोधन यांना स्वातंत्र्याच्या चळवळीपेक्षा अधिक महत्त्व देणाऱ्या सुधारक समाजनेत्यांनीसुद्धा संतांच्या चळवळीचा पुरेसा शोध आणि बोध घेतला असे म्हणता येत नाही. संतांनी केवळ आत्मज्ञानाच्या अर्थात जीव-जगत्-जगदीश या संबंधाच्या गोष्टी सांगितल्या असे मानून संतसत्पुरुषांच्या मांदियाळीने उभ्या भारतात वेळोवेळी जे प्रत्यक्ष

कार्य केले आणि त्यायोगे जनांचे आत्मभान घडविले त्याकडे त्यांनी द्यायला हवे होते तितके लक्ष दिले नाही. इस्लामच्या सर्वंकष आक्रमणाच्या काळात जो भारतीय संस्कृतीवर घाला पडला, त्याचा प्रतिकार संतांनी शांतपणे करीत एतद्देशीयांची सांस्कृतिक मूल्ये जपली. स्वार्थपरायण शासन आणि त्यांच्या साथीदारांची उपेक्षा करून लोकभाषा, लोकछंद, लोककला, लोकमाध्यमे यांचा पुरस्कार करीत लोकाश्रयानेच आचारवंत राहून 'लोक' जागविला हे विचारवंत विसरले. जातिप्रणाली अथवा वर्णाश्रम ही एक प्रकारची सामाजिक संघटना त्या-त्या काळाच्या आवश्यकतेप्रमाणे आणि मानवी वकूब-कुवतीनुसार होती. ती धर्माज्ञा नव्हे, म्हणून त्या व्यवस्थेच्या संदर्भात कारण-अकारण आपल्या धर्माला वेठीला धरीत, येथे धर्मप्रसारासाठी येऊन सक्ती, जबरदस्तीने आपला धर्म भारतीयांवर लादणाऱ्या आणि निखळ धार्मिक दृष्टीने पाहताही अमानुष वर्तन करणाऱ्यांच्या ओंजळीने पाणी पिणाऱ्या समाजपरिवर्तनवादी मंडळींना म्हणावे तेवढे यश आले नाही, तेव्हा त्यांच्या धटिंगणवृत्तीच्या अनुयायांनी जातीयवादाचा अंगीकार पद्धतशीरपणे करीत धर्मसाधनेची आणि संतकार्याची अवहेलना केली. सर्वसामान्यांचा हरप्रकारे बुद्धिभेद केला. आज स्वातंत्र्यानंतरच्या काळात स्वकीय राज्यकर्त्यांमध्ये फोफावलेली मूल्यहीनता, भ्रष्टाचारसंपन्नता, परकियांची खुशामत, अतिरेक्यांशी जवळीक, ज्ञानवंतांची उपेक्षा, प्रत्येक बाबतीत जातीय राजकारणाचा आधार अशी घसरण पाहिली की, ही अधोगती तथाकथित परिवर्तनवादी मंडळींनी इथे पूर्वी रोविलेल्या आपापसांतील दुही-द्वेष-मत्सराची स्वाभाविक परिणती आहे, असे म्हणता येते.

## वर्णव्यवस्था आणि संत

संतांचे आणि त्यातही समर्थ रामदासांचे आजचे आक्षेपक त्यांना ते वर्णाश्रमव्यवस्थेचे पाठीराखे आहेत, म्हणून दूषणे देत असतात. इथेच खरे वास्तवाचे भान सुटते. सनातन वैदिक धर्मामध्ये ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य-शूद्र अशी मानवी गुणकर्माच्या आधारे आखलेली व्यवस्था किमान पाच हजार वर्षांपासून अस्तित्वात होती. हळूहळू गुणकर्मापेक्षा जन्मानुसार वर्ण ठरू लागला आणि मग ज्याच्या हाती सत्ता त्याने 'बळी तो कान पिळी' या व्यावहारिक न्यायाने आपापला स्वार्थ साधायला सुरुवात केली. पुरोहितवर्गाने बहुजनांच्या श्रद्धाभावनेचा अप्पलपोटेपणाने स्वहितासाठी उपयोग करून घेतला. त्याचवेळी व्यापारी वृत्तीच्या मंडळींनी आपला फायदा पाहत इतरांचे शोषण केले. त्यासाठी परकियांशी हातमिळवणी केली. या दोन वर्गांपेक्षा अधिक सद्दी गाजविली ती 'जिसकी गद्दी उसको सलाम' अशा वृत्तीच्या क्षत्रियांनी । त्यांनीच कधी पाटील, सरंजामदार-इनामदार-वतनदार-संस्थानिक बनून बहुजनांची पिळवणूक केली. मुगलकाळात वा इंग्रजकाळात स्वाभिमान सोडून घरदारांसह ते परक्याना शरण गेले. आजही लोकशाहीचे लाभ पदरात पाडून घेणाऱ्या घराणेशाह्या याच मंडळींनी निर्माण केलेल्या दिसतात.

'वेद तिहीं वर्णाचे कानीं लागला' म्हणून भगवद्गीतेची योजनापूर्वक निवड करून सात शतकांपूर्वी पारमार्थिक लोकशाही निर्माण करणारे आणि वैयक्तिक जीवनात समाजाच्या साऱ्या वर्गांकडून खस्ता खाव्या लागूनही विश्वधर्माची उपासना करीत सर्वांच्या कल्याणासाठी 'पसायदान' मागणारे योगीराज ज्ञानेश्वर हे खरे समाजसुधारक. त्यांच्यानंतर संत नामदेव, संत एकनाथ, संत तुकाराम आणि अठरापगड ज्ञातींतून आलेली कितीतरी ईश्वरनिष्ठांची मांदियाळी 'भक्ती ही खरी मानव समाजाची उद्धारक शक्ती होय' अशा श्रद्धेने वाटचाल करीत राहिली. 'जे पृथ्वीतळींचे

देव जे तपोवतार सावयव ।।' (ज्ञा.); 'वेदां निंदी तो चांडाळ । भ्रष्ट सुतकीया खळ ।' (तुकाराम); 'राहिले वर्णाश्रम धर्म । अनोन्य विचरती कर्म ।' (तुकाराम) असे वर्णव्यवस्थेचे समर्थन करणारे अनेक उद्‌गार वारकरी संतांच्या रचनेत आहेत. तसेच ते रामदासांच्याही काव्यात आहेत. कदाचित ते स्वत: व्युत्पन्न ब्राह्मण म्हणून अधिकही असतील.

संतसत्पुरुषांनी वर्णव्यवस्था त्यांना फार भावली म्हणून स्वीकारली असे नाही. त्यांनी ती आजच्या लोकनेत्यांप्रमाणे सोयीने तर मुळीच आपली म्हटली नाही. त्यांनी व्यवस्था न मोडता, समाजात मानसिक गोंधळ न माजविता, समाजातील सर्व स्तर एकत्र आणीत ज्ञान, भक्ती, कर्म यांच्याबरोबर नैतिक मूल्यांचे महत्त्व विशद केले. जातिद्वेष वा मत्सर न येऊ देता जितकी क्रांती करता येईल आणि सर्वांना हितकर ठरेल इतके समाजपरिवर्तन कसे केले जाईल याची काळजी वाहिली. संतांचा मार्ग आक्रोश आणि आततायीपणाचा नव्हता. त्यांना व्यापक समाजकल्याण आणि त्यासाठी सारासार विवेक प्रिय होता.

ज्ञान, ईश्वरी शक्ती, लोकमान्यता आणि लोकप्रियता सारे असूनही संतांनी कधी महाराजगिरी वा बुवाबाजी केली नाही. आज मात्र काही मंडळी राजकारण्यांच्या प्रभावाने संतवाणीचा व्यापार करीत अनेकांना आपले गंडे बांधीत असतात.

## रामदासांचे ब्राह्मण्य

महाराष्ट्रातील प्रमुख संतसत्पुरुषांपैकी महात्मा चक्रधरांना ब्राह्मण मानता येत नाही. ते वर्णव्यवस्थेच्या विरुद्ध होते; पण अनेक ब्राह्मणपंडित त्यांचे शिष्य झाले. ज्ञानेश्वर आणि भावंडे जरी ब्राह्मण म्हणून जन्मली तरी त्यांचा छळ ब्राह्मणांनीच केला. नामदेवराय आणि त्यांच्या प्रभावळीतील संतमंडळ यांनी ज्ञानदेवादींची पाठराखण केली. दुसरे ज्ञानेश्वर म्हणून ज्यांनी वारकरी संप्रदायाची पुनरुभारणी केली, भक्तभागवतांच्या हाती आपल्या भागवतगाथेबरोबर ज्ञानेश्वरी दिली, समाजातील सर्व स्तरांना एकवटले, दत्तभक्ती-कृष्णभक्ती आणि विठ्ठलभक्ती यांचाही समन्वय साधला, ते एकनाथमहाराज ब्राह्मण होते. तुकोबारायांच्या काळापर्यंत म्हणजे सतराव्या शतकापर्यंत वारकरी संप्रदाय हा अभिजन आणि बहुजन यांनीच एकत्र येऊन वाढविला.

तुकोबाराय तळागाळाचे खरे प्रतिनिधी होते. त्यांना देहूत ज्यांनी सतत त्रास दिला ते एका विशिष्ट वर्गाचे लोक नव्हते. या संदर्भात त्यांची गुरु-शिष्य परंपरा अभ्यासण्यासारखी आहे. 'जरि का ब्राह्मण झाला भ्रष्ट । तुका म्हणे श्रेष्ठ तीनी लोकी ।' असा तुकोबांचा उद्‌गार आणि 'जरी ब्राह्मण मूढमती । तरी तो जगद्वंद्य ।' हा समर्थांचा उद्‌गार आज खटकावा असाच आहे.

वेदज्ञ आणि विद्वान ब्राह्मणांचे पांडित्य वा श्रेष्ठत्व प्रतिपादन करण्याबरोबरच ब्राह्मणांच्या तत्कालीन स्थितीबद्दल समर्थांनी 'ब्राह्मण बुद्धीपासून चेवले । आचारापासून भ्रष्ट जाले । गुरुत्व सांडून जाले । शिष्य शिष्यांचे ।।' किंवा 'आताचीये ब्राह्मणे काय केले । अन्न मिळेना ऐसे जाले । तुम्हा लोकांच्या प्रचीतीस आले । किंवा नाही ।।' असे कानउघाडणीचे उद्‌गारही काढले आहेत. त्यांच्या अतिरिक्त कर्मकांडाची– सोवळ्याचीही 'सोंवळे कोणते रे । ब्राह्मणा ओंवळे कोणते रे ।। विटाळें उपजला । विटाळें वाढला । विटाळेचि मेला सावकाश । हाडामांसाच्या सगट मोळ्या । पाणिये सोवळ्या होती कैशा ।।' अशी मनसोक्त टिंगलदेखील केलेली आहे.

'उंच ब्रह्म रायासी । नीच ब्रह्म परिवारासी । ऐसा भेद तया पासी । मुळीच नाही ।।' किंवा

'ब्राह्मणाचे ब्रह्म ते सोवळे । शूद्राचे ब्रह्म ते ओवळे । ऐसे आगळे वेगळे । तेथे असेचि ना ॥' असाही व्यापक भाव समर्थ–काव्यात कितीतरी ठिकाणी येतो. 'नारायण असे विश्वी । त्याची पूजा करीत जावी । या कारणे तोषवावी । कोणितरी काया ॥' किंवा 'पृथ्वीमध्ये जितुकी शरीरे । तितुकी भगवंताची घरे । जितकी शरीरे तितुकी मंदिरे । कळली पाहिजे ॥' अशी समर्थांची उदार सांगीही बरीच आहे. भगवद् भजनाची त्यांच्याइतकी विशाल व्याख्या अन्य कोणी क्वचितच केली असेल : 'भेटो कोणी एक नर । धेड महार चांभार । त्याचे जाणावे अंतर । या नाव भजन ॥'

समर्थांचे दुर्दैव मात्र असे, त्यांची वचने मूळ संदर्भासह न पाहता आणि काही तर विकृत करूनच सादर केली जातात. 'समूळ ग्रंथ पाहिल्याविण । उगाच ठेवी जो दूषण । गुण सांगता अवगुण । पाहे तो येक पढतमूर्ख ॥' अशा समर्थ शब्दांतच अशा टीकाकारांचे वर्णन करता येईल.

समर्थांनी केलेली 'ब्राह्मण प्रशंसा' ही पोटभरू ब्राह्मण ज्ञातीची नसून, आत्मज्ञानी आणि व्यासंगी पंडितांची आहे. पूजाविधान सांभाळणारे आणि विशुद्ध धर्मज्ञान असणारे समाजोपयोगी पुरोहित त्यांच्यापुढे आहेत. ब्राह्मणांनी भिक्षुकीचा व्यवसाय नेकीने करावा पण अध्यात्मक्षेत्रात आत्मज्ञानी व्यक्तीलाच 'ब्राह्मण' मानता येईल. ज्याच्यापाशी विद्येचा, शास्त्रज्ञानाचा आणि ईश्वरी अनुभूतीचा अधिकार असेल अशाच उच्चवर्णीयाला 'सद्गुरू' करावे असे समर्थ सांगतात. भिक्षुक ब्राह्मण, ज्ञानसंपन्न ब्रह्मज्ञानी पंडित, विविध व्यावसायिक गुरू आणि अधिकारी सद्गुरू अशा रीतीने समर्थ नाना प्रकारे आपले विवेचन सादर करतात.

समर्थांच्या निकट शिष्यपरिवारातील व्यक्ती केवळ ब्राह्मण नव्हत्या. धोंडिबा धनगर, दत्ता न्हावी, वली महंमद, फाजलखान अशी काही नावे याची ग्वाही देतात. वली महंमद मराठवाड्यातील मठांवर देखरेख करी. बाजी गोसावी शिरवळचा मठ पाही. 'दासविश्राम धाम' हा प्रचंड समर्थचरित्र-ग्रंथ तयार करणारे इक्केहळ्ळीचे आत्मारामहाराज हे बहुजनप्रिय रचनाकार आहेत.

'समर्थप्रताप'कार गिरिधर स्वामी हे अखेरची दहा वर्षे समर्थांसमवेत राहत. त्यांनी १६७४ ची एक हकीगत अशी दिली आहे : चाफळच्या रामनवमी उत्सवात एकदा हजार हरिजन दांपत्यांस ब्राह्मण भोजन देण्यात आले. हे सारे तीनशे वर्षांपूर्वी लिहिले गेले आहे. हे आज एखाद्याला विश्वसनीय वाटो न वाटो पण समर्थांना सरसकट 'ब्राह्मण्यवादी' म्हणणे आणि त्यांचा त्यासाठी अव्हेर करणे हे फारच धाष्ट्र्याचे ठरते.

संत तुकाराम आणि समर्थ रामदास हे समकालीन. त्यांच्यात फार संवाद नसेल पण फार विसंवाद आहे, असे दिसत नाही.

## संत तुकाराम, समर्थ व शिवशाही

संत तुकारामांचा जन्म इ.स. १६०८ मध्ये आळंदीनजीक इंद्रायणीकाठी देहू येथे झाला. ते मुख्यतः देहू येथेच राहिले. त्यांचा प्रवास पुणे परिसरात लोहोगाव ते आळंदी-देहू या भागात विशेषत्वाने झाला. त्यांच्या घराण्यात वारीची प्रथा असल्याने ते पंढरपूरपर्यंत प्रतिवर्षी येत-जात राहिले; पण त्यांच्या प्रभावखुणा आज देहूखेरीज पुण्यातील पासोड्या विठोबा, चाकणनजीकचे चक्रेश्वर मंदिर, ओतूर जवळचे मंदिर इत्यादी ठिकाणीच खात्रीपूर्वक दाखविल्या जातात.

तुकारामांच्या घरी महाजनकी होती. वडिलांचा मोठा व्यापारही होता; पण आसमानी-

सुलतानी संकटकाळात त्यांचा व्यवसाय बुडाला. होत्याचे नव्हते झाले. सारी परिस्थितीच पालटली. वडीलभाऊ परागंदा झाला. पहिली पत्नी गेली. मूल गेले. दुसरा विवाह केला. मुलेबाळे झाली. पण घरची हालाखीची परिस्थिती तशीच राहिली. तुकोबाराय गावाजवळच्या डोंगरावर जाऊन देवाचा धावा करीत राहिले. पुढे त्यांना भगवंताचा साक्षात्कार झाला. ते देवसान्निध्य नित्य अनुभवीत भजन-कीर्तनात रमले. मेघवृष्टीने त्यांनी उपदेश केला. आत्मसाक्षात्काराची प्रचीतीही त्यांनी प्रभावी शब्दांत अभंगबद्ध केली. त्यांच्या सुमारे पाच हजार अभंगांची गाथा वारकऱ्यांच्या प्रस्थानत्रयीपैकी एक तर आहेच, पण आधुनिक मराठी भाषेच्या जडणघडणीस तिने फार मोठा हातभार लावला असून त्यांच्या काव्यातील सामाजिक भान अनेकांना पुढे समाजपरिवर्तन आणि सुधारणा-कार्यासाठी प्रेरणादायक ठरले आहे. तुकाराममहाराजांना फारच थोडे आयुष्य लाभले. त्यांची आरंभीची वर्षे जीवनातील सुखदु:खे आणि संघर्षात गेली. पुढे जेमतेम वीस वर्षे त्यांना मिळाली. इ.स. १६४९ च्या सुमारास ते सदेह वैकुंठाला गेले अशी सांप्रदायिक श्रद्धा आहे.

आज तुकाराममहाराजांची अभंगगाथा हेच त्यांचे खरे चिरंतन स्मारक आहे. त्यांचे गाव, तिथले सुखदु:ख, त्यांच्यावर ओढवलेले प्रसंग, त्यांचा जीवनसंघर्ष आणि ईश्वरी अनुभूती, त्यांची अनुपम विठ्ठलभक्ती आणि वारकरी भक्तभागवतांविषयी त्यांना वाटणारे ममत्व आणि अकृत्रिम प्रेम, त्याकाळचे धार्मिक आणि सामाजिक वातावरण, माणसांचे आग्रह-दुराग्रह आणि स्वभावगुणदोष... हे सारे काही त्यांच्या गाथेत आले आहे.

शिवाजीराजांचे बालपण पुण्यातील कसब्यातील लालमहालात गेले. जिजामाता आणि कारभारी दादोजी कोंडदेव यांनी त्यांच्यावर सुसंस्कार केले. स्वराज्याचे तोरणही त्यांनी पुण्यानजीक रोहिडेश्वराच्या मंदिरात बांधले आणि हिंदवी स्वराज्याची पहिली राजधानी राजगड सुद्धा पुण्याच्या पंचक्रोशीत आहे. १६३० ते १६४९ या काळात राजांनी तुकाराममहाराजांची कीर्ती निश्चितच ऐकलेली आहे. काही कीर्तनेही श्रवण केली असतील. राजांनी त्यांना नजराणा पाठविल्याचा आणि त्यांनी तो नम्रतापूर्वक नाकारल्याचा प्रसंग शिवचरित्रात येतो. तुकोबारायांच्या गाथेतही याविषयीचे अभंग वाचायला मिळतात. त्यांपैकी सारे अभंग वारकरी संप्रदायमान्य नसले तरी जे आहेत, त्यावरूनही तुकाराममहाराजांची निरिच्छ वृत्ती आणि राजांविषयी सद्भाव समजतो. राजांचीही तुकोबारायांविषयींची विनम्र श्रद्धा आणि आस्था समजू शकते. गाथेत असलेले पाईकाचे अभंग हे शिवरायांच्या युद्धप्रयत्नांना उद्देशून आहेत आणि त्यात गनिमी काव्याबद्दलची सूत्रे शोधता येतात, असे काही नवसंशोधन करण्यात आले असून शिवाजीराजांची खरी जडणघडण महाराजांनीच केली, असे अलीकडे म्हटले जाऊ लागले आहे.

तुकाराममहाराजांच्या काळातच समर्थ रामदास वावरले. दोहोंचे जन्मवर्षही एक असले तरी महाराष्ट्रातील दोहोंच्या प्रत्यक्ष कार्यकाळात फरक आहे. एकाचे निर्वाण झाले आणि त्यानंतर दुसरा कार्यरत झाला अशी वस्तुस्थिती आहे.

## समर्थांची जीवनयात्रा

रामदास मराठवाड्यातील जांबचे रहिवासी. घरी विद्येचे वातावरण. परिवारही मोठा पण आर्थिकदृष्ट्या सामान्य स्थिती. रामदास १६०८ मध्ये जन्मले. १६२० साली विवाहावेळी ते बोहल्यावरून काही निर्धार करून निघाले आणि नाशिकनजीक गोदावरीच्या काठी टाकळी येथे

राहून त्यांनी उग्र तपस्या केली. ज्ञानसंपादन केले. पुढे १६३२ ते १६४४ या काळात त्यांनी देशात परिभ्रमण करून लोकव्यवहार आणि राजकीय-सामाजिक वास्तव ध्यानी घेतले. आपल्या प्रवासाच्या अखेरच्या वर्षात श्रीनगर येथे सहावे शीख गुरू हरगोविंद यांच्याशी त्यांचा काही काळ संवाद घडला. त्यानंतर महाराष्ट्रात ते परतले आणि प्रथम त्यांनी कृष्णा खोऱ्यात बारा वर्षे गावोगांव फिरून मोगलाई मुलखात बलोपासनेचा योजनाबद्ध प्रचार केला. हनुमान मंदिरे स्थापित केली. चाफळ येथे राममंदिरही उभारले. मोठा शिष्यपरिवारही गोळा केला. महाराष्ट्रात आणि बृहन्महाराष्ट्रात समर्थांनी अनेक मठ स्थापन केले. १६५६ ते १६८१ या काळात त्यांनी आपल्या रामभक्त समर्थ संप्रदायाचे संघटन बलवान करण्याबरोबरच उदंड मराठी रचना केली. संत एकनाथांचा काहीसा अपवाद सोडला तर रामदासांइतकी विविध स्वरूपाची, विपुल अशी स्फुट आणि प्रबंधरचना अन्य कुण्या मराठी सत्पुरुषाने केलेली नाही.

समर्थांच्या काव्यरचनेची अनेक वैशिष्ट्ये सुस्पष्ट आहेत. करुणाष्टकासारखी उत्कट भावभक्तीची रसपूर्ण रचना त्यांनी केली. लोकसंस्कृतीच्या विविध उपासकांच्या भूमिकेतून आणि नाना प्रकारच्या लोकछंदांचा अवलंब करून त्यांनी एक लोककाव्याची विशाल अभंगपद-गाथाही तयार केली. 'आत्माराम'सारखे पांडित्यपूर्ण प्रकरणग्रंथ लिहिले. मनाच्या श्लोकांसारखी अद्‌भुत मनोबोधात्मक कविता लिहिली. देशाची स्थिती विदारक रीतीने स्पष्ट करणारी अगणित प्रसंगवर्णने आणि त्यावर उपाय सांगणारी उपदेशात्मक स्फुटे लिहिली. व्यवहारज्ञानाचा विश्वकोश म्हणावा असा गुरुशिष्य संवादाचा आद्य मराठी स्वतंत्र वैचारिक ग्रंथ 'दासबोध' तयार केला. समकालीन राजकारणावर झोत टाकणारी आणि छत्रपती शिवाजीराजांचे अचूक शब्दांत महत्त्व कथन करणारी पत्रे आणि काव्येही त्यांनी लिहिली.

सतराव्या शतकात मराठी भाषेला अनेक प्रकारचे शब्दवैभव प्राप्त करून देण्यात तुकाराममहाराजांप्रमाणेच समर्थ रामदासही अग्रभागी होते.

## हनुमानोपासनेतून सामर्थ्य

रामदास वा त्यांचे अनुयायी महंत आहेत. ते स्वत:ला 'संत' म्हणवून घेत नाहीत. वारकरीही स्वत:ला 'समर्थ' समजत नाहीत. पण दोहोंत आपापल्या आराध्याविषयीचा उत्कट भक्तिभाव आहे. विष्णुदास वारकरी माळकरी आहेत. सामर्थ्यवादी धारकरीही आचारसंपन्न आहेत. गुणपूजा हेच खरे धर्मरक्षण हा सद्‌विचार दोहोंनी केला आहे. दोहोंपाशी समाजाला पुढे नेण्याची शक्ती आजही आहे; पण काही धूर्त सांप्रदायिकांच्या आग्रही भूमिकांमुळे या दोन्ही सामाजिक शक्ती आजवर एकमेकांपासून दुरावल्या असे दिसते. इतिहासाचा प्रवाह डोळसपणे पाहिला की, या दुराव्याचे दुष्परिणाम जाणवल्याशिवाय राहत नाहीत. दुबळेपणाने सज्जनांवर दुर्जन सहज मात करू शकतात. असे दुर्जन जर परकीय असतील तरीही मात सहजी सत्तांतर घडवू शकते आणि एतद्देशीयांना दीर्घकालीन गुलामगिरी पत्करावी लागते. जसे सज्जन समर्थ असायला हवेत, तसेच जे समर्थ आहेत, त्यांनाही संतजनांचे वा सुजनांचे महत्त्व कळायला हवे. यासाठी संत-महंत दोहोंची आवश्यकता असते. आज प्रजाराज्य आहे. अशा वेळी ही आवश्यकता प्रकर्षाने ध्यानी येते, आणि समर्थ रामदास आपल्या पूर्वकालीन सत्पुरुषांपेक्षा वेगळी वाट का मळू लागले याचे आकलन होऊ शकते.

या वेगळ्या वाटेचे एक मोठे गमक आहे— हनुमानोपासना. समर्थ रामदास हे सामर्थ्याची

देवता म्हणून मर्यादापुरुषोत्तम प्रभू रामचंद्रांकडे पाहत. पण त्यापेक्षाही अधिक उत्कट श्रद्धाभावनेने त्यानी रामभक्त हनुमंताची अर्चना केलेली आहे. ते स्वत:ला हनुमानाच्या प्रतिमेत पाहतात. त्यांच्या संप्रदायात हनुमानोपासनेला मोठी प्रतिष्ठा प्राप्त झालेली आहे. पूर्वी लोकजीवनात हनुमान बहुधा गावच्या वेशीवर असायचा. समर्थांनी हा 'लोकदेव' गावाच्या मध्यभागी म्हणजे जीवनव्यवहाराच्या केंद्रात आणला आणि त्याच्या योगाने समाजजीवनात वीररसाला उधाण यावे अशी कामना केली.

आपल्या संतकाव्यात समर्थांसारखा दुसरा हनुमानोपासक यशस्वी सत्पुरुष दाखविता येत नाही.

## आद्य 'रामदास' हनुमंत

समर्थांचा सद्‌गुरू पुरुषोत्तम प्रभू रामचंद्र. त्यानेच समर्थांना प्रत्यक्ष दर्शन दिले आणि उपदेश दिला, अशी सांप्रदायितांची दृढ श्रद्धा आहे. समर्थांनी मात्र आपली परंपरा सांगताना आदिनारायण– विष्णु-ब्रह्मा-वसिष्ठ-राम यांच्यानंतर हनुमंताचा उल्लेख केला आणि मग आपले नाव घातले आहे. परमार्थसाधनेत श्रीरामभक्त हनुमानाचे त्यांना सहाय्य लाभले असावे. म्हणूनच त्यांनी म्हणून ठेवले आहे :

***हनुमंत आमुची कुळवल्ली । राममंडपी वेली गेली ।।***
***श्रीरामभक्तीने फुलली । रामदास बोले या नावे ।।***

पुढे त्यांनी स्पष्टच सांगून ठेवले आहे की, 'सद्‌गुरू श्रीराम समर्थ' असल्यामुळे 'काय उणें दासासी' असा आत्मविश्वास आपल्याला गवसला आहे आणि 'आमुचे कुळीं हनुमंत', 'हनुमंत आमुचें मुख्य दैवत' असल्यानेच आमचा परमार्थ सिद्धीलाही गेला आहे. वस्तुत: समर्थांच्या दृष्टीने प्रभू राम आणि त्यांचा निस्सीम भक्त हनुमान, यांत अद्वैतच आहे.

आद्य 'रामदास' म्हणूनच हनुमंताला ते आपल्या मूळ पुरुषाच्या रूपात प्रतिष्ठित करतात, हे विशेष म्हटले पाहिजे. भारतीय संतपरंपरेत विविध अवतारांची अर्चना दिसते; पण रामसेवक हनुमानाची हिरिरीने उपासना करणारे आणि ती इतरांनीही करावी म्हणून आग्रह धरणारे अपवादात्मक आहेत. समर्थ रामदास हे अशा अपवादात सर्वश्रेष्ठ ठरतात. त्यांच्या लेखी हनुमानाच्या माध्यमाशिवाय श्रीरामापर्यंत पोहोचण्याचा अट्टाहास करणे म्हणजे पैलू पाडलेला आणि न पाडलेला हिरा एकच असे मानणे आहे.

हनुमत्प्रतापवर्णनात समर्थ हनुमंतत हा 'संगीत ज्ञान महंत' आहे असे गौरवाने सांगतात. स्वत: समर्थही असे संगीत गायनप्रेमी होते. 'सफळ तोचि तो दिन । संगीत कथाकीर्तन । तेणे रिझे माझें मन । आनंदरूप ऐकता ।।' असा त्यांचा संतोष असे. 'धन्य ते जाणते गुणी ।' आणि धन्य ते गायनीकळा ।' या दोन स्फुट प्रकरणांमधून त्यांनी गायनादी कलांचेही उत्तम विवेचन केलेले आहे.

समर्थ रामदासांच्या आधी महाराष्ट्रात लोकनाथ एकनाथ झाले आणि त्याच काळात उत्तर भारतात गोस्वामी तुलसीदास वावरले. त्यांनी आपल्या रामचरितमानसाच्या रूपाने समकालीन भारतीयांना जीवनादर्श दिला. एक मान्यवर इंग्रज अभ्यासक सर जॉर्ज ग्रियर्सन यांनी तर इथवर म्हटलंय, "गोस्वामी तुलसीदासांच्या रामकथेमुळे उत्तर भारतात मुघलयुगात हिंदू धर्म आणि

तीर्थस्थाने टिकू शकली.''

तुलसीदासांपूर्वी उत्तरेत भुशुंडीरामायण अवतरले. गोपाळकृष्णाच्या लीलागायनाला आणि रासक्रीडेलाही अमाप लोकप्रेम लाभले. मुसलमानी राजवट जेव्हा सर्वत्र पसरली, तेव्हा नवाबी राहण्यावागण्याच्या सवयी वाढल्या. परकियांच्या गुलामगिरीबद्दलची चीडही फारशी कुठे व्यक्त झाली नाही. अशा वेळी भुशुंडीरामायणाचा प्रभाव कमी करण्यासाठी आणि जनमानसावरील विकृत संस्कार धुऊन-पुसून काढण्यासाठी तुलसीदासांनी आपली लेखणी सरसावली. समर्थ रामदासांपुढे अशा प्रकारचे आव्हान नव्हते. त्यांच्यापुढे तुलसीरामायणही होते, भावार्थरामायणही होते आणि मोगल आक्रमणाच्या आव्हानाला सामोरे गेलेले मावळेही होते. त्यांचे क्षात्रतेज ज्या शिवछत्रपतींनी अधिक बलदंड केले तेही त्यांच्यापुढे होते. त्यांनी जनजागरणासाठीच रामहनुमानोपासना केली– काव्यलेखन केले.

तुलसीदास विवाहित होते, पण त्यांनी प्रपंच केला नाही. आजीवन ते रामचरित्रात मग्न राहिले. त्यांनी बलोपासनेचा प्रचार असा केला नाही, पण ते स्वतःला हनुमानाचे अवतार समजत. तुलसीरामायणाची रचना अयोध्येत पूर्ण झाली. त्यानंतर गोस्वामी तुलसीदास वाराणसीच्या क्षेत्री येऊन राहिले. ते तिथे प्रवचने करीत. अखेरपर्यंत त्यांनी काशीनिवास केला. १५७४ च्या सुमारास तीन वर्षे महाराष्ट्राचे एकनाथ काशीनगरीत होते. 'रुक्मिणीस्वयंवर' तिथेच त्यांनी रचले. महाराष्ट्रात परतलेले नाथ भावार्थरामायणात रमले ते अखेरपर्यंत. तुलसीदासांच्या रचनेचा प्रभाव नाथांच्या कृतीवर पाहता येतो.

नाथ आणि समर्थ यांचेही अनेक प्रकारचे नाते आहे. नाथांना उत्तरेत प्रथम सद्‌गुरूंनी पाठविले होते. समर्थही देशावलोकन करावे म्हणून बारा वर्षे उत्तर भारतात परिभ्रमण करून आले. समर्थांनी 'रामकथा ब्रह्मांड भेदून पैलाड न्यावी' असा शुभसंकल्प सोडला. मराठीत नाथांचे 'भावार्थरामायण' समर्थांच्या समोर होते. म्हणून त्यांनी दुकाण्डी रामायण लिहिले असावे. शिवाय त्यांनी युद्धकांडावर भर दिला. तुलसींना अथवा नाथांना 'राम' प्रत्यक्ष देवरूपात भेटला; पण समर्थांना तो शिवरायांच्या रूपाने 'नरनारायण' म्हणूनही भेटला. काशीला समर्थांनी आनंदवनभुवनाचे स्वप्न पाहिले. नाथांप्रमाणे त्यांनीही इथेच रामकथेची महती ध्यानी घेतली. हनुमानउपासनेचे महत्त्वही अनुभवले. समर्थ वायव्य भारतात गेले. तिथे सहावे शीख गुरू हरिगोविंद यांचे 'पीरी आणि मीरी' अर्थात धर्मरक्षणासाठी शस्त्र बाळगण्याचे दर्शन त्यांना प्रभावित करून गेले.

महाराष्ट्रात परतलेले समर्थ मर्यादापुरुषोत्तम प्रभू रामाबरोबर बलोपासक संकटमोचन हनुमानाचेही भक्त होते.

## शक्तियुक्तिमान बुद्धिवंत

हनुमान हा मुख्यतः रामायण कथेतूनच आपल्यापुढे त्याच्या पूर्ण रूपात उभा राहतो. रामायणात रामचंद्रानंतर महत्त्वाचे कार्य हनुमंताचेच आहे. वाल्मीकीच्या रामकथेत श्रीराम, सीता, लक्ष्मण, भरत आणि हनुमान ही ठळक चरित्रे आहेत. त्यांपैकी श्रीरामापाठोपाठ हनुमानालाच भारतात आणि अन्य देशातही देवतारूप प्राप्त झालेले दिसते. श्रीराममंदिरापेक्षाही हनुमंतमंदिरांची संख्या अधिक असल्याचे जाणवते.

भक्ती, ज्ञान, योग, तंत्र अशा अनेक मार्गांनी हनुमान दैवताची उपासना करणारे साधकभक्त

आढळून येतात.

हनुमान हा स्वत: एक अद्‌भुत भक्तसाधक आहे. त्याचे भाग्य असे की, त्याचे आराध्य वा स्वामीच त्याची प्रशंसा करतो. भक्ती, शक्ती, चापल्य, युद्धकौशल्य, सेवाशीलता, वाक्‌पटुत्व असे अनेक गुण हनुमंतामध्ये असले तरी तो अतिशय विनीत आहे. किंचितही आत्मप्रौढी त्याच्या ठिकाणी नाही. ब्रह्मचर्याचा तो आदर्श ठरतो.

हे सारे ध्यानी घेऊन शक्तिदेव म्हणूनच समर्थांनी हनुमानाला अनुसरले. त्यायोगे मराठी मुलखातील भक्तीला शक्तीची जोड लाभली. 'शक्तियुक्ती जयें ठायीं । तेथें श्रीमंत धांवती ।' असे हनुमानाच्या आरतीत लिहिणारे समर्थ, तो 'बुद्धिमतां वरिष्ठं' असल्याचाही निर्वाळा देतात.

समर्थ रामदास हे आद्य 'रामदास' असणाऱ्या हनुमंताला आपली 'कुळवल्ली' म्हणतात. सांप्रदायिकांच्या दृष्टीने समर्थ हे साक्षात् हनुमानावतारच आहेत.

हनुमंत व समर्थ या दोहोंत विलक्षण साधर्म्यही दिसते. दोघे बालब्रह्मचारी. रामभक्ती हे दोहोंचे जीवितध्येय. युक्ती आणि शक्ती यांच्या बळावर त्यांनी भक्तीचा चमत्कार केला. 'देव मस्तकीं मिरवीत अवघा हलकल्लोळ' केला. हनुमंताने रावण आणि त्याच्या पाठीराख्यांना अद्दल घडविली. समर्थांनी शिवरायांच्या शत्रूंची रावणीरीत वेशीवर टांगली. 'मुलुखबुडवा बडवावा । धर्मसंस्थापनेसाठीं' हा दोहोंचा ध्येयमंत्र दिसतो.

समर्थांना मारुतिरायाचा आधार वाटतो. कारण, त्याचे ठायी दुष्टांचे निर्दालन करण्याची अद्‌भुत शक्ती आहे. सज्जनांचे संरक्षण करण्याचे अपार सामर्थ्य आहे. रामराज्य यायचे असेल तर 'सामर्थ्याचा गाभा' असणारा 'भीमभयानक उभा' हवा. आपल्या तथाकथित रांगड्या शैलीत समर्थांनी हनुमानाचा 'पवाडा' असा गायिला आहे.

***पाहता सुंदर शोभा । लाचावलें मन लोभा ।।***
***हुंकारे भुभुःकारे । काळ म्हणे बा रे बा रे ।।***
***विघ्न तगेना थारे । धन्य हनुमंता रे ।।***
***दास म्हणे वीर गाढा । रगडित धनसर दाढा ।।***
***अभिनव हाचि पवाडा । पाहती न दिसे जोडा ।।***

ही शब्दावली ओबडधोबड आहे खरी; पण तिचे सामर्थ्य हनुमंताची सारी 'समर्थता' सजीव करणारे आहे. असे वर्णन केवळ समर्थच करू शकतात.

## समर्थ-शिवाजी अनुबंध

समर्थ रामदासांना सुदीर्घ जीवन मिळाले. तुकोबारायांचे निर्वाण १६४९ ला झाले, त्याच सुमाराला समर्थ देशयात्रा करून महाराष्ट्रात परतले आणि पुढे सुमारे बत्तीस वर्षे त्यांनी आपले कार्य केले.

१६५६ ते १६८० हाच काळ शिवशाहीतील अनेक मुख्य घडामोडींचा आहे. समर्थ शिवाजीराजे यांच्या अनुबंधावर लखख प्रकाश टाकणारी चार महत्त्वाची पत्रे उपलब्ध आहेत. पहिले पत्र १६४९ चे मिळते. यात 'निश्चयाचा महामेरू । बहुत जनासी आधारू । अखंड स्थितीचा निर्धारू । श्रीमंत योगी ।।' असे शिवरायांच्या तेजस्वी व्यक्तिमत्त्वाचे चपखल वर्णन आरंभीच केले आहे.

शिवरायांच्या उदंड परोपकारी कृत्यांची आणि गुणसंपदेची कुणाशी 'तुळणा कैची?' असे म्हणून नरपति, हयपति, गजपति, गडपति, अशा त्या भूपतीची यशवंत, कीर्तिवंत, नीतिवंत, सामर्थ्यवंत जाणती राजशक्ती विशद केली आहे. त्याने आपल्या अखंड सावध वृत्तीने आणि सर्वत्र, आचारशील, विचारशील, धर्मशील धीर-उदार क्रियातत्परतेने 'अन्य नृपवर कसे तुच्छ केले' ते दिले आहे. ज्यावेळी देवधर्म, ज्ञानी पंडित, सामान्य माणसं आणि गोधनावरही आफत आली तेव्हा 'या भूमंडळाचे ठायी । धर्मरक्षी ऐसा नाही । महाराष्ट्रधर्म राहिला काही । तुम्हाकरिता ।।' अशी मर्दुमकी शिवराजाने गाजविली. 'कितेक दुष्ट संव्हारिला । कितेकांसी धाक सुटला । कितेकांसी आश्रयो जाला । शिवकल्याण राजा ।।' असा शिवविशेष केवळ समर्थच नोंदवू शकले आहेत. पुन्हा हे सारे शिवगुणवर्णन करताना त्यांची विनम्रताही प्रकटलेली दिसते ती अशी–

***तुमचे देसी वास्तव्य केले । परंतु वर्तमान नाही घेतले ।***
***रुणानुबंधे विस्मरण जाले । काये नेणओ ।।***

असे कुणी म्हणू नये. कारण,

***सर्वज्ञ मंडळी धर्ममूर्ती । सांगणे काय तयांप्रती ।***
***धर्मस्थापनेची कीर्ती । सांभाळली पाहिजे ।।***

हे खरे शिवध्येय होय. याची पुरेपूर जाणीव झाली आणि उत्कट प्रेमाचे भरते आले. सहज पत्रच लिहिले गेले. समर्थ विनीत शब्दांत तेही सांगून जातात...

***राजकारण उदंड दाटले । तेणे चित्त विभागले ।***
***प्रसंग नसता लिहिले । क्षमा केली पाहिजे ।।***

समर्थ रामदासांची आणि शिवाजी राजांची भेट नेमकी केव्हा झाली यावर पुष्कळ लिहिले गेले आहे. प्रा. न. र. फाटकांनी म्हटले आहे : ''शिवसमर्थांच्या जीवनकाळातील व नंतरची कागदपत्रे शके १५९४ मध्ये श्रावणानंतर केव्हातरी त्यांची भेट झाली असली पाहिजे असे निश्चितपणे दर्शविणारी आहेत. या कागदपत्रांखेरीज जे कागद किंवा तर्क इ. स. १६४९ (शके १५५१) मध्ये किंवा तत्पूर्वी भेट झाली असे जिज्ञासूंच्या गळी बांधण्याकरिता प्रसिद्ध करण्यात आले आहेत. त्यांची परीक्षा करू लागल्यास त्यांच्याविषयी संदेह निर्माण होतो.'' या संदर्भात ज्येष्ठ इतिहासाभ्यासक आणि शिवाजीविद्यापीठाचे पहिले कुलगुरू डॉ. आण्णासाहेब पवार यांचे म्हणणे विचार करण्यासारखे आहे.

हे सर्व विचारात घेऊन डॉ. ल. रा.नसिराबादकर यांनी आपल्या 'प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास'(सहावी सुधारित आवृत्ती १९९७/पृ. १३७) ग्रंथात असा निष्कर्ष नोंदविला आहे. ''शिवसमर्थ भेटीला योग इ. स. १६५८ नंतर आला असे म्हणावयास हरकत नाही.''

शिवाजीराजांच्या कार्यकर्तृत्वाविषयी, युद्धनेतृत्वाबद्दल अथवा ऐतिहासिक कामगिरीचे वर्णन म्हणून अनेक सारस्वतांनी, शाहीर कवींनी, कलावंतांनी आजवर कितीतरी शब्दप्रपंच केलेला आहे; पण समर्थांच्या उत्स्फूर्त कवनांचे सर्वश्रेष्ठत्व निर्विवाद असल्याबद्दल अजून तरी दुमत नाही. काही मतभेद आहेत ते शिवराज्याभिषेकावेळी समर्थ रामदासांच्या अनुपस्थितीबद्दल आणि सांप्रदायिक समर्थचरित्रकारांनी जी अवास्तव गुरुवर्णने केली आहेत, त्याबद्दल संभवतात.

राज्याभिषेक समारंभात काही काळ येऊन गेल्याचे आणि हेतुपूर्वक प्रकटपणे न वावरल्याचे

काही स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न अभ्यासकांनी केला आहे. पण शिवसमर्थ अनुबंधाचे अधिक उत्कट दाखले काव्य-पत्रांतून आणि पुढील काही प्रसंगांतून मिळू शकतात.

## चाफळ-सनद

१५ ऑक्टोबर १६७८ रोजी छत्रपती शिवाजीमहाराजांनी समर्थ रामदास यांना उद्देशून लिहिलेले एक अस्सल पत्र उपलब्ध आहे. त्याला 'चाफळची सनद' म्हणतात. या पत्राचा आरंभ 'श्रीसद्गुरूवर्य श्रीसकलतीर्थरूप श्रीकैवल्यधाम श्रीमहाराज श्रीस्वामी, श्रीस्वामींचे सेवेसी' असा आहे. 'चरणरज शिवाजीराजे यांनी चरणावर मस्तक ठेवून विज्ञापना' अशा शब्दांत पुढची सुरुवात असून 'कृपा करून सनाथ केले', 'तुम्ही जे मनी धराल ते सिद्धीस पाववील त्याजवरून जो जो उद्योग केला व दुष्ट तुरुक लोकांचा नाश करावा विपुल द्रव्य करून राज्यपरंपरा अक्षयी चालेल ऐशी स्थळे दुर्घट करावी. ऐसे जे जे मनीं धरिलें ते तें स्वामींनी आशीर्वाद प्रतापे मनोरथ पूर्ण केले.' अशी अनेक वाक्ये शिवसमर्थ संबंध आणि साहचर्यावर स्वच्छ प्रकाश टाकणारी आहेत.

'चाफळी' श्रीची स्थापना करूनु, सांप्रदाय शिष्य दिगंत विस्तीर्णता घडली त्यास चाफळी श्रीची पूजा मोहोछाव ब्राह्मण भोजन अतिथी इमारत सर्व यथासांग घडावे.' इतकेच नव्हे तर 'जेथे जेथे श्रीची मूर्तिस्थापना जाहली तेथे तेथे उछाव पूजा घडावी, यास राज्य संपादिले. यातील ग्रामभूमी कोठे काय नेमावी ते आज्ञा व्हावी' असेही नमूद केले आहे आणि नंतर तेहतीस गावे, चारशे एकोणीस बिघे जमीन, एक कुरण, एकशेएकवीस खंडी धान्य यांचा सर्व तपशील आहे.

इ.स. १६४५ म्हणजे देशाटन करून महाराष्ट्रात परतल्यापासून समर्थांचा चाफळशी संबंध आहे. त्यापूर्वी टाकळी येथे तपस्याकाळात दीड वर्षाच्या शिवरायांसह शहाजीराजे यांच्याबरोबर समर्थांची भेट घडल्याचा एक कागद तंजावरच्या 'भोसले रूमाला'मध्ये मिळतो.

चाफळच्या राममंदिराच्या उभारणीसाठी बाजी घोरपडे, दियानतराव देशपांडे या शहाजीराजांच्या खास सहकाऱ्यांनी शहाऐंशी एकर जमीन दान केली. मंदिर उभारणीचे काम सुरू असताना समर्थ नजीकच्या शिंगणवाडीत राहत. तिथे १२ एप्रिल १६४९ रोजी शिवसमर्थ भेट झाली, याचे काही सांप्रदायिक पुरावे दाखविले जातात. अलीकडे तर शिवसमर्थ भेटीचे भव्य स्मारकच चाफळला उभे राहिले. त्याचे उद्घाटन महाराष्ट्राच्या तत्कालीन मुख्यमंत्र्यांनी केले, हे देखील आज नमूद करण्यासारखे आहे.

## संभाजीराजास पत्रे

शिवाजीमहाराजांच्या निर्वाणानंतर १६८१ साली संभाजीराजास उद्देशून एक गद्यपत्र समर्थांनी पाठविले. त्यानंतर पुन्हा एक उपदेशपर पत्र राजांच्या राज्याभिषेकानंतर लिहिले. ही दोन्ही पत्रे बरीच बोलकी ठरतात.

आपण 'पूर्वी राजश्रीस (शिवाजी) राजधर्म व क्षात्रधर्म व अखंड सावधान ऐसी पत्रे पाठविली होती' अशी नोंद पत्रारंभी करून 'सिंगणवाडीचे मठी राजश्रींनी श्रीच्या सर्व कार्याचा आईकार केला. त्याप्रमाणे त्यांनी नित्य उत्सव व यात्रासमारंभ उत्तम चालविला. पुढे इमारतीचेही स्मरण द्यावे हे त्यांनी मान्य केल्यावरि आपण सज्जनगडी सुखे वास्तव्य केले' अशीही आठवण

त्यांनी संभाजीराजांना करून दिलेली दिसते.

'धर्मवृद्धीने राज्यवृद्धी आहे' हे परोपरीने सांगत समर्थ इथे राजधर्म-क्षात्रधर्म– अखंड सावधानतेचा उपदेश करतात.

समर्थांनी संभाजीराजांना पाठविलेले दुसरे आणि अखेरचे पत्र अत्यंत हृदयद्रावक आहे. त्याची पोहोच मिळू नये आणि पुढे त्या पत्रातील अक्षर अन् अक्षर सर्वांसाठी नित्यस्मरणीय राहावे असा काही योग होता.

शिवाजीराजे यांचे निधन अवचित घडले. त्यावेळी संभाजीराजे कैदेत होते. राजगादीवरून संभाजी-राजाराम यांच्यांत आणि त्यांच्याहूनही सोयराबाई आणि ताराबाई यांच्यांत सत्तासंघर्ष झडला. सोयराबाईंनी आत्महत्या केली. संभाजीला मारण्याचा प्रयत्न झाला. शिवाजीराजांचे विश्वासू आणि राज्याचे निष्ठावान रक्षक हिरोजी फर्जंद आणि बाळाजी अवाजी चिटणवीस यांना हत्तीच्या पायदळी देऊन मारण्यात आले. या सत्तासंघर्षानंतर राजारामाने माघार घेतली. १५ जानेवारी १८८२ रोजी संभाजीचा राज्याभिषेक झाला. यावेळी समर्थांनी आपले प्रतिनिधी दिवाकर गोसावी यांच्यामार्फत संभाजीस पत्र देऊन 'अखंड सावधान असावे । दुश्चित कदापि नसावे ।।... काही उपस्थिती सांडावी । काही सौम्यता धरावी ।।... मागील अपराध क्षमावे । कारभारी हाती धरावे ।।... पाटवणी तुंब निघेना । तरी मग पाणी चालेना । तैसे सज्जनांच्या मना । कळले पाहिजे ।। जनांचा प्रवाहो चालिला । म्हणजे कार्यभार आटोपला । जन ठायीं ठायीं तुंबला । म्हणिजे खोटे ।। श्रेष्ठी जे जे मेळविले । त्यासाठी भांडत बैसले । मग जाणावे फावले । गलिमांसी ।। ऐसे सहसा करु नये । दोघे भांडता तिसऱ्यासि जये । धीर धरुन महत्कार्य । समजून करावे ।।'

संभाजीराजांनी आपल्या 'दुश्चित' अर्थात तापट अविवेकी वर्तनाने शिवाजीराजांना पुष्कळ दुखावले आणि अडचणीतही आणले होते. म्हणूनच महाराजांनी त्यांना सुधारण्यासाठी वारंवार संधी दिली. काही काळ सज्जनगडावर समर्थांपाशी ठेवले. पुढे तर पन्हाळ्याला तुरुंगातच ठेवले. राजारामाचे दौर्बल्य आणि एकूण घराण्याचे दुर्दैव आडवे आले. राजेही अचानक स्वर्गवासी झाले. राज्यच बुडावे अशी अवस्था आली. अशावेळी समर्थांनी परखड भाषेत लेखी सूचना देऊन संभाजीला सुयोग्य मार्ग दाखविला आहे. बादशाह औरंगजेबाला सामूहिक प्रयत्नाने शह देत राहून 'सकळ लोक येक करावे । गलीम निपटून काढावे । ऐसे करिता कीर्ति धावे । दिगंतरी ।। आधी गाजवावे तडाके । मग भूमंडळ धाके । ऐसे न होता धक्के । राज्यासी होती । समय प्रसंग ओळखावा । राग निपटून काढावा । आला तरी कळो नेदावा । जनांमध्ये ।।'

इतक्या स्पष्ट शब्दांमध्ये राज्याच्या छत्रपतीस 'राजकारण' समजावून देण्याची हिंमत आणि त्यामागे मूळचा असलेला स्नेहसद्भाव हा शुद्ध दृष्टीने पाहायला हवा. आजचे आपले ब्राह्मण-ब्राह्मणेतर वादाचे काळे चष्मे लावून वाचण्याच्या या ओळी नव्हेत. 'राज्यामध्ये सकळ लोक । सलगी देऊन करावे सेवक । लोकांमध्ये धाक । उपजोचि नये ।। बहुत लोक मेळवावे । येक विचारें भरावे । कष्टे करोनि घसरावे । म्लेंछावरी ।।' हे सारे 'महाराष्ट्र राज्य करावे । जिकडे तिकडे' यासाठीच होते आणि असे जर संभाजी करू शकला तर त्याचे पूर्वचरित्र विस्मृतीत जाऊन 'लोकी हिंमत धरावी । शर्तीची तरवार करावी । चढती वाढती पदवी । पावाल येणे ।।' असे घडू शकेल. समर्थांचे हे राजकीय स्वप्न खरे झाले. पत्रातील पुढच्या ओळी संभाजी पुढे प्रत्यक्ष जगून धर्मवीरत्वाप्रत पोहोचू शकला.

*शिवरायास आठवावे । जीवित्व तृणवत् मानावे ।*
*इहलोकी परलोकी राहावे । कीर्तीरुपे ।*
*शिवरायाचे आठरावे स्वरुप । शिवरायाचा आठरावा साक्षेप ।*
*शिवरायाचा आठवावा प्रताप । भूमंडळी ।।*
*शिवरायाचे कैसे चालणे । शिवरायाचे कैसे बोलणे ।*
*शिवरायाचे सलगी देणे । कैसे असे ।।*
*सकळ सुखांचा त्याग । करुनि साधीजे तो योग ।*
*राज्यसाधनाची लगबग । ऐसी असे ।।*
*त्याहूनि करावे विशेष । तरीच म्हणावे पुरुष ।*
*याउपरि आता विशेष । काय लिहावे ।।*

संभाजीराजांना जेमतेम पाच-सहा वर्षेच मिळाली. त्यातही त्यांचे अखेरचे पर्व त्यांना अमरत्व प्रदान करणारे ठरले. तो पुरुषार्थ वरील ओळीतून स्फुरला असल्याची शक्यता नाकारता येत नाही.

## सज्जनगड

प्रस्तुत पत्रानंतर १५ जानेवारी, १६८२ रोजी संभाजीराजांचा राज्याभिषेक ठरल्याप्रमाणे झाला. समर्थांचे प्रतिनिधी दिवाकर गोसावी जानेवारीपर्यंतच्या सर्व सोहळ्यात सहभागी होऊन परतले आणि २२ जानेवारी, १६८२ या दिवशी समर्थांनी देह ठेवला. लगोलग संभाजीराजे सज्जनगडावर आले. त्यांनी समर्थांच्या समाधीचे दर्शन घेऊन पृच्छा केली : "समर्थांची अखेरची इच्छा काय होती?" उत्तर मिळाले : "चितास्थानी आपले देव्हारे माजवू नयेत. मर्यादापुरुषोत्तमाचे मंदिर बांधून रघुवीराचे महत्त्व वाढवावे." ही समर्थांची मनीषा कळल्यावर संभाजीराजांनी समर्थसमाधी आणि राममंदिराचे बांधकाम करून दिले. या संदर्भातील सर्व ऐतिहासिक कागदपत्रे सेतुमाधवराव पगडी यांच्यासारख्या साक्षेपी इतिहाससंशोधकाने पूर्वीच प्रसिद्ध केली आहेत.

सज्जनगडावर समर्थ १६७६ साली राहावयास आले. किल्लेदार जिजोजी काटकर यास शिवछत्रपतींनी पत्र लिहून समर्थांची व्यवस्था करण्यासंबंधी कळविल्याचे पुरावे आहेत :

'गोसावी सांप्रत शिवथर प्रांती राहत्याति । सज्जनगडावर यावयाचे म्हणत्याती । त्यांस येतील तेवा येऊ देणे । जातील तवा जाऊ देणे । स्वामींच्या सोबत काही सेवक गण असेल । त्या समस्तांस गडावर ठेवून घेणे । स्वामींचा बंदोबस्त उत्तम ठेवणे ।।'

## आणखी काही पत्रे

शिवसमर्थ अनुबंधाचे संदर्भात अफजलखान वधाचा प्रसंगही बराच बोलका ठरतो. आदिलशाहीतील अत्यंत मातब्बर सरदार योद्धा अफजूल याने १६४८ मध्ये शहाजीराजांना कपटाने अटक करून बादशहापुढे आणले. पुढे १६५६ मध्ये शहाजीराजांचा थोरला मुलगा आणि मोगलांचाच चाकर संभाजी याला कनकगिरीच्या लढ्यात कपटाने ठार केले. शिवाजी हा तर आपल्यापुढे उंदीर ठरेल अशी फुशारकी मारीत मोठ्या तयारीनिशी तो हिंदवी स्वराज्यावर

चालून आला. प्रत्यक्ष शिवाजीशी दोन हात करण्याआधी त्याने तुळजापूरच्या क्षात्रदेवतेवर तलवार चालविली. अनेक हिंदू मठमंदिरांचा विध्वंस करून दहशत निर्माण केली. अशावेळी 'विवेके करावे कार्यसाधन । जाणार नरतनू हे जाणोन । पुढील भविष्यार्थी मन । रहाटोचि नये ।... आदिमाया मूळ भवानी । हे सकळ ब्रह्माण्डाची स्वामिनी । येकांती विवेक करोनी । इष्ट योजना करीत जावी ।' असे एक चातुर्यपूर्ण पत्र समर्थांनी पाठविले आणि पत्रांच्या प्रत्येक ओवीचरणाच्या आद्याक्षरांतून 'विजापूरचा सरदार निघाला आहे' अशी सूचना देत 'इष्ट योजना करावी' असाही संदेश दिला.

मावळ्यांना उद्देशून लिहिलेले क्षात्रधर्म प्रकरणही 'मारिता मारिता मरावे ।... मर्दे तकवा सोडू नये । म्हणजे प्राप्त होतो जये । कार्यप्रसंग समये । वोळखावा । मराठा तितुका मेळवावा । आपुला महाराष्ट्रधर्म वाढवावा ।... देवद्रोही तितुके कुत्ते । मारुनि घालावे परते । देवदास पावती फत्ते । यदर्थी संशयो नाहीं । देव मस्तकीं धरावा । अवघा हलकल्लोळ करावा । मुलुख बुडवा की बडवावा । धर्मसंस्थापनेसाठी ।' अशा जळजळीत शब्दशस्त्रांनी वीरांचा पुरुषार्थ पेटविणारे आहे.

## राजधर्माचा उपदेश

क्षात्रधर्मासारखेच राजधर्माचे प्रकरण आहे. ते शिवाजीराजांना उद्देशून असल्याचे सांप्रदायिक सांगतात. 'संकटी कंटाळो नये । करावे अत्यंत उपाये । तरी मग पाहता काये । उणे ओ ।... धुरेने युद्धासी जाणे । अशी नव्हेत की राजकारणे । धुराच करोनि सोडणे । कित्येक लोक ।... मोहोरा पेटला अभिमाना । मग तो जीवास पाहेना । मोहोरे मेळवूनि नाना । वरी चपेटे करी ।। देखोनि व्याघ्राचा चपेटा । मेंढरे पळती बारा वाटा । मस्त जो तो रेडामाठा । काय करावा ।।' असे अनेक युक्तिशक्तीचे संकेत अशा प्रकरणांतून/पत्रांतून मिळतात.

'नाना वस्त्रे नाना भूषणे' येणेकरून शरीर शृंगारणे परंतु त्याचबरोबर 'विवेके विचारे राजकारणे । अंत श्रृंघारिजे' किंवा 'शरीर सुंदर सतेजी वस्त्रभूषणे केले सज्ज' परंतु 'अंतरी नस्ता चातुर्यबीज । कदापि शोभा न पवे' या ठिकाणी अफजलभेटीवेळी शिवाजीराजांनी चिलखत घालण्याची काळजी घेण्याच्या सूचना आहेत, असे सांप्रदायिकांचे म्हणणे आहे.

'अखंड सावधानता' या शीर्षकाचे समर्थांचे पत्र 'येकांती चाळना करावी । धारणा उदंड धरावी । नाना विचारणा करावी । अरिमित्रांची ।।' किंवा 'कार्यकर्ते दुरी करावे । प्रसंगी सवेचि हाती धरावे । परंतु शोधूनि पाहावे । कपटाविषयी ।।' अशा अतिशय बारकाईच्या सूचना देऊन राजकारणाचा हा विशेष मंत्रही सांगितला आहे :

> ***आपल्या मनासि रोधावे । परांतर शोधावे ।***
> ***क्षणाक्षणा सांभाळावे । बदलेल म्हणोनि ।।***
> ***पाहिलेचि पाहावे । केलेचि करावे ।***
> ***शोधिलेचि शोधावे । राजकारण ।।***
> ***इशारतीचे बोलो नये । बोलायाचे लिहो नये ।***
> ***लिहायाचे सांगो नये । जबानीने ।।***

समर्थांच्या या साऱ्या पंक्तीना त्यांच्या दासबोधामध्ये देखील कितीतरी आधार मिळतात.

शिवाय या सूचनांवरून त्यांच्या आचारप्रणालीचीही चांगली ओळख घडू शकते.

## गैरसमजाचे मुख्य कारण

समर्थांच्या उपलब्ध सांप्रदायिक चरित्रात गुरुप्रशंसेची कमालीची अतिशयोक्ती आढळून येते. 'देवधर्म गोब्राह्मण । करावया संरक्षण । हृदयस्थ जाला नारायण । प्रेरणा केली ।' अशी समर्थांनी केलेली यथार्थ शिवस्तुती असताना स्वराज्यनिर्मितीचेही सारे श्रेय सांप्रदायिक चरित्रकारांनी समर्थांनाच देत राहून शिवाजीराजे हे त्यांचे सामान्य सेवकशिष्य असावेत अशी वर्णने केली.

'धर्मसंस्थापनेचे नर । आहेत ईश्वराचे अवतार ।' असे समर्थांचे म्हणणे असताना समर्थशिष्यांनी आपल्या मठाधीशांकडूनच सारे कार्य झाले, अशा रीतीने मांडणी केली. शिवाजीराजांचे वडील शहाजीराजे कायमच मोगलांचे चाकर राहिले. त्यांनी वा त्यांचा दुसरा पुत्र संभाजी यांनी महाराजांच्या स्वराज्य प्रयत्नांस फारशी साथ दिली नाही. महाराजांचा मोठा मुलगा संभाजी हाही अधूनमधून वडिलांविरुद्ध वागला. धाकटा मुलगा पुरेसा समर्थ होऊ शकला नाही. चंद्रराव मोऱ्यांसारख्या अनेक आप्तस्वकीयांनी शिवाजीराजांशी बेईमानी केली. प्रसंगी त्यांच्या विरोधात परक्यांसाठी ते फितुरीही करीत राहिले. अशा एकूण विपरीत परिस्थितीत सर्वसामान्य प्रजाजन, सोवळे आणि मावळे यांना एकत्र आणीत राहून समर्थांनी राजांची पाठराखण केली, जागोजागी असणाऱ्या त्यांच्या मठमहंतांचीही हरतऱ्हेने राज्यस्थापनेसाठी मदत झाली, याची प्रमाणे आहेत. पण चरित्रकारांनी या साऱ्याची नोंद वस्तुनिष्ठ रीतीने न करता अविश्वसनीय वाटावीत, अशी वर्णने आणि कथागोष्टी घालून आपले लेखन सजविण्याची अहमहमिका ठेवली. यामुळे शिवचरित्र आणि स्वराज्यनिर्मितीचे चित्र नीटनेटके निर्माण करण्याची ही साधनेच अडचणीत आली.

## संत आणि समर्थ राजकारण

मराठी संतमंडळात निवृत्ति-ज्ञानदेवांपासून तुकाराममहाराजांपर्यंत जे अनेक संतसत्पुरुष आणि संतमहिला झाल्या त्यांचे मठ नाहीत. त्यांच्या शिष्यसंप्रदायात महंतही नाहीत. कुणी नाथसांप्रदायिक गुरुपरंपरा मानणारे योगी संत तर कुणी श्रीकृष्णस्वरूप श्रीविठ्ठलाचे परम भक्तभागवत आहेत. त्यांचे अभंग-काव्य हे बहुश: ईश्वरानुभूती आणि अलौकिक शक्तिवर्णनाचे आहे. या काव्यात समाजाचे चित्र मिळते. काही प्रबोधनही येते; परंतु राजकारणाकडे ते वळत नाहीत. अध्यात्म अथवा हरिकथाकीर्तन, भगवद्भक्तिनिरूपण हे त्यांचे सीमित क्षेत्र दिसते. याउलट 'पहिले ते हरिकथा निरूपण' हे मान्य करूनही 'दुसरे ते राजकारण । तिसरे ते सावधपण । सर्व विषयी ।' आणि 'चौथा तो साक्षेप' देखील अत्यावश्यक, अशी रामदासांची स्पष्ट भूमिका आहे. किंबहुना आपण यात कमी पडल्यामुळे संतचळवळ अपयशी ठरली असेही त्यांचे मत असावे. यासाठीच त्यांनी दुष्ट रावणसंहारक प्रबल प्रतापी, मर्यादापुरुषोत्तम श्रीरामचंद्राची आणि बाहुबली हनुमंताची उपासना सर्वांसमोर ठेवली. त्यांचे उपलब्ध सांप्रदायिक चित्रही संतसत्पुरुषापेक्षा योद्धासंन्याशाचे आहे. ते आपल्याला संतही म्हणवीत नाहीत. 'समर्थ' म्हणवून 'समर्थाचिया सेवका वक्र पाहे । असा सर्व भूमंडळी कोण आहे ।' असे आव्हानही देतात. 'ऐसी हे समर्थ पदवी । विवेके येते ।' अशीही त्यांची नम्र धारणा आहे. प्रपंचाकडे पाठ फिरवून परमार्थ करणे योग्य नव्हे, नरदेह प्राप्त झाल्यावर त्याचा पुरेपूर सदुपयोग करून 'मरावे परी कीर्ती (कार्य) रूपी उरावे' असा कटाक्ष ठेवतात.

समर्थांनी सावधानता, प्रयत्नवाद, विवेक, चातुर्य आणि राजकारण यांची कास धरली. मोगलांचे क्रूर आणि धर्मांध राजकीय, सांस्कृतिक आक्रमण रोखण्यासाठी ती काळाची आवश्यकताच होती. योगायोगही असे होते की, संतश्रेष्ठ तुकाराममहाराजांनंतर भक्तिपरंपरा खंडित होत होती. देवदेवळांचे पावित्र्यविडंबन आणि नासधूस पाहावी लागत होती. अशा वेळी प्रथम करंट्या स्वकीय मंडळींविरुद्ध निर्धाराने उभे ठाकून, सज्जनांचे सबळ संघटन उभारीत मोठ्या युक्तिबुद्धीने आणि ईश्वरी शक्तीने शिवाजीराजे कार्यरत झाले होते. त्यांचे चातुर्य आणि हिंमत सर्वांसमोर ठेवून प्रसंगी त्यांना त्यांच्या राजकारणात आवश्यक ती सोबत करणे आवश्यक होते. त्यासाठी सज्जनांचे मनोबळ वाढवून त्यांना समर्थ करणे निकडीचे होते. हे राजकारणी काम खचितच समर्थ रामदासांनी केले. तत्कालीन अन्य सत्पुरुषांना हे करता आले नाही.

सतराव्या शतकातील महाराष्ट्राचे अहोभाग्य असे की, तळागाळापर्यंत पोहोचलेल्या वारकरी भागवतधर्माचे कलश म्हणून प्रसिद्ध असणारे साक्षात्कारी संत तुकाराममहाराज, हिंदवी स्वराज्याची संस्थापना करून बहुजनांना आधार देत परकीय आणि स्वकीय दुष्टदुर्जनांना धाक निर्माण करणारे छत्रपती शिवाजीमहाराज, हरिकथा वा रामकथानिरूपणाबरोबरच राजकारणाचे महत्त्व आणि शिवरायांच्या कार्यकर्तृत्वाचे वेगळेपण अचूक रीतीने ओळखणारे समर्थ रामदास असे तीन महापुरुष एकाच काळात वावरले आणि त्यांनी मराठी भाषिक मुलखाला 'महाराष्ट्रत्वा'चा गौरव प्राप्त करून दिला. या तिन्ही व्यक्तींतून जी त्रिमूर्ती साकारते ती अर्थपूर्ण आहे. एक लोकपुरुष संत आहे. एक लोहपुरुष समर्थ आहे आणि एक जाणता जयवंत राजा श्रीमंतयोगी आहे. तिघांचे कार्य एकमेकांस पूरक आणि म्हणूनच पुढीलांस तारक ठरवले. त्याचा विचार ऐतिहासिक कालमानपरिस्थिती आणि घटनाप्रसंग यांचे भान ठेवूनच करायला हवा.

## समर्थ आणि विद्यमान स्थिती

आज जीवनाच्या विविध क्षेत्रांत, अगदी शिक्षणासारख्या पवित्र क्षेत्रातसुद्धा बराच अनाचार माजलेला दिसतो आहे. त्यांपैकी राजकारण, जातीयवाद, भ्रष्टाचार यांचा बराच बोलबालाही झालेला आहे. अशा काळात समर्थ रामदासांनी आपल्या समाजाच्या आळशीपणावर नेमकेपणाने ठेवलेले बोट, राजकारण-व्यवहाराला दिलेले दुसरे स्थान, साक्षेप-विवेक, प्रपंच-परमार्थ इत्यादींची घातलेली सांगड पुन्हा एकदा ध्यानी घ्यायला हवी.

समर्थ रामदासांनी महाराष्ट्रात पूर्वप्रचलित निवृत्तिमार्गी संतपरंपरेला आपल्या प्रवृत्तिमार्गी अध्यात्मकारणाने शिवशाहीत कालोचित वळण दिले. केवळ भगवद्‌भजनाने सारे प्रश्न सुटतात, म्हणून देवावर सारा भार टाकून असावे, असे ते म्हणत नाहीत. उलट कोणत्याही प्रकारचे आलस्य हीच जीवनाचे सार्थक करण्याच्या मार्गातील सर्वांत मोठी बाधा होय, असे ते सांगतात.

'नरदेह हा नाना सुकृतांचे फळ' म्हणून मिळालेला असून त्याचे जर योग्य उपयोजन करायचे तर 'सत्यमार्ग सांडू नये । असत्य पंथे जाऊ नये', 'जनी आर्जव तोडू नये' पण त्याचबरोबर 'पापद्रव्य जोडू नये', 'कदाकाळी पुण्यमार्ग सोडू नये', असे अनेकदा समर्थ बजावीत गेले आहेत.

> ***नरदेहाचे उचित । काही करावे आत्महित ।***
> ***यथानुशक्त्या चित्त वित्त । सर्वोत्तमी लावावे ।।*** (२.४.१३)

हे समर्थांच्या मानव-विचारांचे एक प्रबळ सूत्रच आहे.

शरीर हे प्रथम आत्मोद्धारासाठी कारणी लावायचे म्हणून काही कष्ट करून त्याचे फळ संपादन करीत राहिले पाहिजे. प्रयत्नवाद हा मानवाचा बाणा व्हावा. श्रम करण्यामध्ये कोणताही कमीपणा वाटू नये. कष्टानेच मिळवायचे असते, सुखासीन राहून नव्हे. म्हणून ते सांगतात :

*सुखा आंग देऊ नये । प्रेत्न पुरुषे सांडू नये ।*
*कष्ट करिता त्रासो नये । निरंतर ।।* (२.२.१४)

'सावधपणे घडीने घडी काळ अधिक सार्थक करावा', (८.६.५), 'दुश्चितपण' अर्थात दुर्लक्ष कंटाळा येऊ देऊ नये. कारण 'दुश्चितपणे कार्य नासे । दुश्चितपणे चिंता वसे । दुश्चितपणे स्मरण नसे । क्षण येक पाहाता ।।' (८.६.२०) असे होत असते. आपली एकाग्रता ढळली, निश्चय सुटला की आळस येऊ लागतो.

*दुश्चितपणापासूनि सुटला । तरी तो सवेच आळस आला ।*
*आळसाहाती प्राणीयाला । उसंतचि नाही ।।* (८.६.२९)

आळसामुळे माणूस सर्व प्रकारे नाडला जातो. अज्ञान, दैन्य, दारिद्र्य, मौर्ख्य या साऱ्याच्या मुळाशी एक आळस हाच असतो. हे समर्थ विविध प्रकारे स्पष्ट करीत गेले आहेत :

*आळसे नित्यनेम राहिला । आळसे अभ्यास बुडाला ।*
*आळसे आळस वाढला । असंभाव्य ।।* (८.६.३२)

*निद्रा आळस दुश्चितपण । हेचि मूर्खाचे लक्षण ।*
*येणे करिता निरूपण । उमजेचि ना ।।* (८.६.३६)

समर्थांच्या अशा जळजळीत उद्‌गारांतूनच कदाचित शिवशाहीत क्षात्रतेजाला धार आली. ज्यांनी स्वाभिमान सोडला होता, त्यांना जाग येऊन ते योग्य कामांकडे वळले.

महाराष्ट्रात स्वराज्यासाठी उठाव करणाऱ्यांचे संघटन होत गेले. 'महाराष्ट्रधर्म' अधिक सार्थ होत राहिला.

## मराठा मेळवावा

समर्थांनी 'महाराष्ट्रधर्म' निश्चितच व्यापक केला. ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम हे महासंत महाराष्ट्रधर्माचे प्रणेते मानता येतील. समर्थांनी, आपल्या पूर्वसंतांनी जो 'महाराष्ट्र धर्म' निर्माण केला, त्याला कालानुरूप अन् औचित्यपूर्ण असे वळण दिले. त्यांची एक प्रातिनिधिक उक्ती अशी आहे :

*मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्र धर्म वाढवावा ।।*

इथे 'मराठा' शब्द फारच व्यापक अर्थाने येतो. जो जो मराठमंडळात नांदत आहे, तो मराठा. ज्याला ज्याला मायमराठी अन् इथल्या मराठमोळ्या रीतिरिवाजांची, संस्कृतीची पार्श्वभूमी लाभली तो मराठा. अशी मंडळी मराठीभाषी मुलखाबाहेर 'बृहन्महाराष्ट्रात'ही आहेत. अशा साऱ्या मराठी बांधवांनी एक होऊन आपली अस्मिता जपावी– वाढवावी. खरे तर 'बृहन्महाराष्ट्र' ही संकल्पनाही समर्थांच्या देशव्यापक संचरणाने आणि मठस्थापनेमुळे प्रत्यक्षात आली.

आज आपण काय पाहातो? जातीयवाद, प्रांतिकता, संकुचितता यांनी समाजाला पछाडले

आहे. लोकशाहीत लोकराज्य लोकनेते, लोकहितासाठी लोकसहकार्याने चालवितात. आज प्रतिनिधित्वाला कितपत व्यापक स्वरूप आहे? जो ज्ञातिसमाज संख्येने जिथे मोठा तिथे तो आपला प्रतिनिधी निवडतो. हे अगदी सहजपणे होते काय? आपण केवळ 'मतांची मेळवणी' करण्यासाठी काही विवक्षित ज्ञातींचेच प्राबल्य तर निर्माण करीत नाही?

समर्थांना 'राजकारणी संत' मानणारे अभ्यासक आहेत. त्यांचे म्हणणे क्षणभर बाजूला ठेविले तरी समर्थांइतके राजकारणाचे महत्त्व अन्य कुणा संताने ओळखले असे दिसून येत नाही. समर्थकाळात महाराष्ट्राच्या काही भागांत एका शिवाजीचा अपवाद वगळता अन्यत्र मुसलमानी सत्ता क्रौर्याने कारभार करीत होती. त्यांना आपल्या धर्मापुढे इतर धर्म मान्यच नव्हते. अशा असहिष्णु राजवटीला शह द्यायचा तर 'राजकारण' अपरिहार्य झाले होते.

समर्थ राजकारणाचे महत्त्व अचूक शब्दांत मांडीत जातात. पण 'पहिले ते हरिकथानिरूपण' असे सांगून मगच ते राजकारणाची थोरवी स्पष्ट करतात. राजकारण हे अध्यात्मकारण अथवा परमार्थ विचारानंतर करावयाचे, असे त्यांचे स्पष्टच म्हणणे आहे.

*उदंड उपासनेची कामे । लावीत जावी नित्यनेमें ।*
*अवकाश कैचा कृत्रिमें । करावयासि?*

असेही आपले राजकारण ते सांगतात. वायफळ वा अनावश्यक उद्योग करण्यासाठी आपल्या आयुष्यात वेळ नाही, हे ध्यानी ठेवून सारे व्यवहार सामुदायिक उपासनेचा प्रचार-प्रसार करण्याच्या दृष्टीने केले पाहिजेत, अशी त्यांची महंतांना सुस्पष्ट आज्ञा असे. जर अध्यात्मकारण अथवा भगवंताची अर्चना-उपासना हा साधक महंतांचा धर्म असेल तर अन्य समाजाकडून उपासना करवून घ्यायची, हे समर्थांना चांगले 'राजकारण वाटते. म्हणूनच ते सांगतात :

*दीक्षा बरी मैत्री बरी । तीक्ष्ण बुद्धि राजकारणी बरी ।*
*आपणासि राखे नानापरी । अलिप्तपणे ।।*

असे करीतच 'रामकथा ब्रह्मांड भेदून पैलाड न्यावी' असे ते म्हणतात.

महाराष्ट्रधर्माबद्दल बोलताना ते वेगवेगळ्या रीतीने 'दुसरे', 'नेमस्त', 'बरेपणे' असे करण्यास सांगतात. इथे राजकारणाने मर्यादापुरुषोत्तम रामचंद्रांचा आदर्शच सर्वांसमोर ठेवण्याचा त्यांचा मानस आहे. यथा :

*'नेमस्तपणे' राजकारण ।*
*वर्तायाचे लक्षण । तेहि असावे ।।*
*हरिकथा— निरूपण । 'बरेपणे' राजकारण ।*
*प्रसंग पाहिल्याविण । सकळ खोटे ।।*

समर्थांनी अशा रीतीने अध्यात्मविचाराला व्यावहारिक बैठकही दिली आणि अनेक 'समर्थ' वृत्तीचे महंत तयार केले.

समर्थ स्वत:ला 'रामदास' म्हणवीत होते. आपण त्यांना संतांच्या मांदियाळीत बसवतो. अन्य संतांच्या तुलनेने त्यांचा विचार करतो. वस्तुतः त्यांच्यापुढे संतपरंपरेत सामील व्हावयाचे की नाही हा प्रश्नच नव्हता. त्यांनी आपल्या काळातील संत, त्यांचे ग्रंथ, पंथ, अनुयायी यांचा निश्चितच विचार केलेला होता. पूर्वकाळात होऊन गेलेल्या विभूतींचे कार्य आणि त्यांचा

प्रभावही ध्यानी घेतला गेला होता. पुन्हा हे सारे त्यांनी महाराष्ट्रापुरतेच पाहिलेले नव्हते. महाराष्ट्राबाहेर जनसमाजाची काय स्थिती झालेली आहे, हे प्रत्यक्ष पाहून घेतलेले होते. म्हणूनच तर त्यांनी एक स्वतंत्र पंथ उभा करून त्यासाठी 'महंत' तयार केले. त्यांनी मठ म्हणजे ज्ञानपीठे निर्माण केली आणि हे करताना आपला शिष्यवर्ग मर्यादापुरुषोत्तम प्रभुरामचंद्राचे आदर्श जीवन आणि शक्तिमंत हनुमंताचे नैष्ठिक वर्तन यांचा वस्तुपाठ सदैव सामोरा ठेवून प्रत्यक्ष आचार कसा करील याचा विचार केला. त्यांचा 'दासबोध' आणि अन्य ग्रंथरचना त्यासाठी आहे. केवळ 'भक्तिपंथेचि जावे' म्हणून नाही. हरिकथानिरूपणापेक्षा हरिचरित्र-चिंतन आणि प्रत्यक्ष कार्य यावर त्यांचा भर आहे आणि हे करताना शांतपणाने, निवांत वृत्तीने केवळ डोळे मिटून अनंतात मग्न राहून भजन करून भागत नाही, हे त्यांनी दाखवून दिले. काळाची आव्हाने समजून घ्यावी लागतात. प्रसंगी त्या आव्हानांवर मात करण्याकरिता भगवंताचे मात्र अधिष्ठान ठेवून चळवळीचे सामर्थ्य उभारावे लागते. असे ध्येयवादी जीवन स्वीकारल्यानंतर कधी प्रियजनांच्या ताटातुटीही पचवाव्या लागतात.

***देवाच्या सख्यत्वासाठी । पडाव्या जीवलगासी तुटी ।***
***सर्व अर्पावे शेवटी । प्राण तोहि वेचावा ।।*** (४.८)

स्वत: रामदास यासाठी आधी 'हनुमान' झाले व या अर्थाने 'रामदास' होऊन गेले. अखंड सावधान राहिले. जसा त्यांनी प्रपंच आपला म्हटला नाही तसेच ते केवळ परमार्थात अडकले नाहीत. त्यांनी आसमानीसुलतानीचे अवलोकन, अध्ययन केले. वायव्य भारतातील, लढाऊ शिष्य समाजाची बारकाव्याने ओळख करून घेतली. आणि हरिकथेबरोबर राजकारण आणि सावधपणा असा साक्षेप आचरला. ते मात्र 'संत' सत्पुरुष, भक्तश्रेष्ठ, आध्यात्मिक अलौकिक अनुभूतीत मग्न राहिलेच नाहीत. ते 'समर्थ' म्हणून निर्धारपूर्वक उभे ठाकले आणि आपल्या समर्थकांनाही त्यांनी असा आत्मविश्वास देऊ केला, 'समर्थाचिया सेवका वक्र पाहे, असा सर्व भूमंडळी कोण आहे?'

ही 'समर्थ पदवी' सोपी नव्हे. ती विवेकानेच प्राप्त होते. आज आपण अवतीभवती अनुभवतो, जे समर्थ बनले आहेत त्यांचे राजकारण उघडउघड सांगते की, त्यांना सज्जनांशी कर्तव्य नाही. आणि जे भक्तभाविक सज्जन आहेत, त्यांना वर्षानुवर्षे धूर्तपणे असे शिकविले जाते, तुमचा समर्थांशी संबंध नाही!

ही स्थिती पालटली पाहिजे, यासाठी समर्थ-विचार महत्त्वाचा ठरतो.

समर्थांनी मराठी लोकभाषेला फार मोठे शब्दभांडार दिले. त्यांचे काही शब्द पुष्कळच आवडीनिवडीचे आहेत : सावधपण, साक्षेप, प्रयत्न, विवेक असे शब्द ते वारंवार प्रयुक्त करतात. त्यातूनच खरे तर त्यांचे स्वतंत्र विचार अधिक स्पष्ट होतात.

***सावधपणा, साक्षेप, विवेक***

***नाही देहाचा भरवसा । केव्हा सरेल वयसा ।***
***प्रसंग पडेल कैसा । कोण जाणे ।***

अशी विश्वातील आपली क्षणभंगुर वस्ती. म्हणून समर्थ लिहितात :

***या कारणे 'सावधान' असावे । जितुके होईल तितुके करावे ।***
***भगवत्कीर्तने भरावे । भूमंडळ ।।***

दासबोधाच्या बाराव्या दशकात, विवेक-वैराग्य निरूपण येते. प्रपंचात विवेक आणि परमार्थात वैराग्य अशी वाटणी त्यांनी केलेली असली तरी व्यवहारात या दोन्हींची सांगड घालावी म्हणून ते म्हणतात :

***म्हणोनि सावधानपणे । प्रपंच परमार्थ साधणे ।।***

असे केले नाही तर 'नाना दुःखे भोगणे' भाग पडेल. हे टाळायचे तर 'सूचितपणा', 'अचूकयत्न', 'चंदनासारखे झिजणे', 'जनास बोल' न लावता 'आपणच आपल्या मनासी क्षणाक्षणा शिकविणे' अशी व्यावहारिक राजकारणाची शिकवण त्यांनी दिलेली आहे.

दासबोधात पाचव्या समासानंतर पुढे चार समास महंत वा सद्धर्मप्रचारक लक्षणांचे आहेत. त्यात 'कीर्ती पाहता सुख नाही! सुख पाहता कीर्ती नाही' (१०.२५)' अशी परखड शब्दांत सूचना दिली आहे. 'जो दुसऱ्यावरी विश्वासला । त्याचा कार्यभाग बुडाला ॥ (९.१६)' आपले 'अवगुण दूर करून' उत्कट भव्य तेच घेणारे आणि मिळमिळीत टाकणारेच निःस्पृहपणे विख्यात होऊ शकतात. 'आधी केले मग सांगितले' असा कटाक्ष असायला हवा हे समर्थांचे वारंवार सांगणे आहे.

***सामर्थ्य आहे चळवळीचे । जो जो करील तयाचे ।।***

हे फारच सीमित अर्थाने आज अनेकांच्या आंदोलनातून प्रत्ययाला येते. खरे तर 'चळवळ' आणि तिचे 'सामर्थ्य' हे केवळ विरोधासाठी विरोध वा अडवणुकीसाठी नसते. क्षुद्र स्वार्थासाठी चळवळ ही तर समर्थांच्या कल्पनेपलीकडची आहे.

संकुचित मतलबी वृत्ती, अज्ञान आणि ज्ञानी जनांविषयी आकस अशा अनेक अवगुणांनी पछाडलेले बरेच लोक 'सामर्थ्य आहे वळवळीचे' अशा लोचट पद्धतीने वागत राहून समर्थांचा जो मूळ उद्देश, ......'परंतु तेथे भगवंताचे अधिष्ठान पाहिजे', हा साफ विसरून, गटकंपूच्या कारस्थानांना पूरक अशी चाटुकार अनुयायांची फळीच उभी करताना दिसतात. अशांना जर नेस्तनाबूत करायचे तर समर्थांच्या महंतांच्या पद्धतीने राजकारण असे केले पाहिजे की, ते 'कळोचि न द्यावे!'

विचार करण्याची क्षमता म्हणजे विवेक आणि विवेकपूर्वक वागून चौफेर दृष्टी ठेवून स्वीकृत कार्य निश्चयाने सिद्धीस नेण्याचा यशस्वी प्रयत्न म्हणजे साक्षेप.

***विद्या नाही बुद्धी नाही । विवेक नाही साक्षेप नाही ।***
***कुशलता नाही व्याप नाही । म्हणौनि प्राणी करंटा ।।***

अशी त्यांची स्पष्टोक्ती आहे.

विवेकी पुरुषाने हट्टाग्रहात पडू नये. 'अति सर्वत्र वर्जावे' आणि 'प्रसंग पाहोनि चालावे.' जो आपले कर्तव्य नीट ओळखून ते पुरे करतो तोच विवेकसंपन्न होय.

जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात विवेकालाच मूलस्थान आहे. मन एकाग्र करणे विवेकाने साध्य होते. प्रपंच नेटका आणि नियोजनाने करण्यासाठी विवेक आवश्यक. समाजाचे संघटन आणि पुनर्रचना करण्याकरिता विवेकासह नीतिमूल्यांची जपणूक अपरिहार्य ठरते. सज्जनांचे सामर्थ्य वाढावे, दुष्ट-दुर्जनांना जरब बसावी, यासाठीही विवेकजागरण निकडीचे असते.

***यत्न तो देव जाणावा । यत्नाचा लोक भाग्याचा ।***
***यत्नेवीण दरिद्रता ।।***

हा समर्थसंदेश सदासर्वकाळ सर्वच समाजाला प्रेरक ठरणारा आहे.

अल्लाउद्दिनाच्या सैन्यापुढे यादवसेनेचा निभाव लागला नाही आणि चौदाव्या शतकाच्या आरंभी दक्षिणेतील हिंदूंचे सर्वांत मोठे शासन गडगडले. पुढे दक्षिणेत मुसलमानी अंमल जबर होत गेला. महाराष्ट्रात बहामनी राजवटी आल्या. सुमारे दोनशे वर्षे सुलतानांनी इथे विलासी वृत्तीने कारभार करून देवदेवता, तीर्थक्षेत्रे, लोकसमाज, इतिहास-परंपरा, रीतिरिवाज, मानबिंदू साऱ्यांवर आपल्या क्रूर दृष्टीने आक्रमण केले. वैर मांडले. बहामनी साम्राज्य मोडल्यानंतर बीदरची बरीदशाही, अहमदनगरची निजामशाही, विजापूरची आदिलशाही, वऱ्हाडातील इमादशाही, गोवळकोंड्याची कुतुबशाही अशा पाच शाह्या अवतरल्या. खानदेशात फारुकी सुलतान, बागलाणात बागुल आले. सारी सुलतानी शक्ती एकवटून त्यांनी यादवांनंतर दक्षिणेत स्थिरावलेल्या विजयनगरच्या बलशाही हिंदू सत्तेचा १५६५ मध्ये पूर्ण पाडाव केला. अशाप्रकारे समर्थांपूर्वी सलग १९७ वर्षे आदिल, १७६ वर्षे कुतुब, १४७ वर्षे निजाम, १३३ वर्षे बीदर अशी शाहीसुलतानी महाराष्ट्रात यथेच्छ अतिरेक दुराचार करीत होती.

राजकारणाचे सच्चेपण, चतुरस्रता, क्षात्रतेजाचा अभाव यामुळे यादवसाम्राज्य पत्त्याच्या बंगल्याप्रमाणे कोसळले. पुढेही इतिहासातून बोध न घेण्याची असावधानताच सतत दाखविल्याने शाह्या जरी आपापसांत तेढ ठेवून असल्या तरी मराठे सरदार त्यांचे चाकर राहिले. त्यांचे वैयक्तिक कर्तृत्व-पराक्रम एकमेकाला जातीयवादी महत्त्वाकांक्षा ठेवून संपविणारे ठरले.

एखादा एकनाथ मुक्तेश्वराचा अपवाद सारस्वतात निर्माण झालेला दिसतो. नाथांनी रामकथेचा भावार्थ विस्ताराने सांगत सुलतानी रावणराज्याचा विनाश करण्याचा अप्रत्यक्ष संदेश दिला. नाथांचे समकालीन कृष्णदास मुद्गल यांनी स्फूर्तिदायक युद्धकांड रचले. मुक्तेश्वरांनीही देशाटन करून आपल्या काव्यात चांगली युद्धचित्रणे केली आहेत. या तीन अपवादांनंतर मराठी सारस्वतांत रामदासांची भेट मोठ्या सामर्थ्याने घडते. त्यांनी आपल्या मुलखात दुर्जन, म्लेंछरूपात फारा दिवसांपासून माजले असून त्यांचे बंड मोडून काढले पाहिजे, अशी खणखणीत शब्दांत आरोळीच दिली...

***म्लेंछ दुर्जन उदंड । बहुता दिसांचे माजले बंड ।***
***या कारणे अखंड । सावधान असावे ।*** (१८.६)

या अखंड सावधानतेसाठी नानाप्रकारे इशारे दिले. म्लेंछांविरुद्ध राजकारण करायचे तर..
इशारतीचे बोलो नये । बोलायाचे लिहो नये ।
लिहायाचे सांगो नये । जबाबीने ।

समर्थ इतक्यावरच थांबले नाहीत. 'अस्मानी-सुलतानी', 'परचक्र निरूपण' अशा प्रकरणांतून त्यांनी तत्कालीन राजकीय परिस्थिती आणि पारतंत्र्याचे कडक भाषेत वर्णन करून समकालीन सत्त्वशील व्यक्तिशक्ती एकवटल्या आणि स्वाभिमानी क्षत्रियांमध्ये चांगल्या प्रकारची जिद्द आणि रास्त महत्त्वाकांक्षा जागविण्याचा चंग बांधला.

***पदार्थ मात्र तितुका गेला । नुसता देशचि उरला ।***
***येणेकरिता बहुतांला । संकट जाले ।।***
***माणसा खावया अन्न नाहीं ।***

सुलतानशाहीत आपल्या देशाची काय अवस्था झाली त्याचे हे यथार्थ वर्णन आहे.

अलीकडच्या काळात स्वार्थपरायण नेत्यांनी बहुजनोद्धाराच्या नावाखाली स्वत:च्या नि आपल्या गणगोताच्या तुंबड्या भरीत राहून 'येणेकरिता बहुताला । संकट जाले' अशीच स्थिती करून टाकलेली दिसते. अनेक प्रकारे भ्रष्टाचार करून तो पटविणाऱ्यांमुळे 'न्याय बुडाला बुडाला । जाहली शिरजोरी' हे समर्थांचे लिहिणे आजही तितकेच खरे ठरते आहे.

राजकीय सत्ताकांक्षा, रागद्वेष, मत्सर-कारस्थाने, निर्मम वृत्तीने केलेल्या खेळी आणि उचापती यांचा सामाजिक परिस्थितीवर अपरिहार्य असा परिणाम होतो. 'जन' समाज बिथरतो. यातून धार्मिक क्षेत्रावरही बरावाईट परिणाम होत जातो. तिथेही मतलबीपणा-राजकारण प्रभावी होऊ शकते. यातूनच परकीय शक्ती आपापल्या धर्माचा प्रचारप्रसार करण्यासाठी सरसावतात. शिवशाहीपुढे मुसलमानी सत्तेबरोबरच सूफी, पोर्तुगीज, डच, फिरंगी-इंग्रज मंडळींचे आव्हान उभे होते.

समर्थांनी आपल्या विलक्षण सामर्थ्यानिशी एकाकीपणे संतचळवळीला नवे रूप दिले. सनातन बहुजन हिंदू समाजाचे संघटन करण्यासाठी निर्धारपूर्क पावले उचलून एतद्देशियांना आपल्या देशात मानाने जगता आले पाहिजे, असा योग्य आग्रह धरला.

आजही असा आग्रह धरणे कधी नव्हते एवढे आवश्यक झालेले नाही काय?

समर्थांना बहुजनांची खचितच चिंता होती. त्यांचे अज्ञान, दैन्यदारिद्र्य यांची त्यांना जाणीव होती. 'सज्जन' आणि 'जन' यांत यांनी फरक केला. जन म्हणजे अत्यंत सामान्य असा अर्थ नव्हे. 'जन' म्हणजे जो काही कारणांनी अज्ञ राहिला/ अडाणी आहे/ वंचित आहे असा कुणीही. इथे कोणतीच जातपात अभिप्रेत नाही. वंचितांना विकासाची संधी कशी दिली जावी? समर्थ म्हणतात :

***मुलाच्या चालीने चालावे । मुलाच्या मनोगते बोलावे ।***
***तैसे जनांसि सिकवावे । हळूहळू ।।***

इथे अत्यंत समर्पक असा बालकाचा दाखला देऊन समर्थांनी आपली तळमळ नेमक्या शब्दांत व्यक्त केली आहे. 'शहाणे करावे जन । पतित करावे पावन' असे लोकशिक्षण-कीर्तनाचे एक उद्दिष्टच ते देतात.

पुढे त्यांनी ज्ञान-प्रसाराबद्दल सांगितले आहे : जे जे म्हणून ज्ञानी आहेत, शिक्षित आहेत, त्यांनी इतरांना ज्ञान दिले पाहिजे.

***जे जे आपणांसि ठावे । ते ते दुसऱ्यासि सिकवावे ।***
***शहाणे करूनि सोडावे । सकळजन ।।***

आज आपण काय पाहातो? ज्ञानविज्ञानाचा प्रचारप्रसार व्हावा, सर्वांना शिक्षणाची समान संधी मिळावी यासाठी उदंड खर्च केला जातो. असंख्य सुविधा-सवलती दान केल्या जातात. पण प्रत्यक्षात काय काय दिसते? जे सवलती मिळवितात ते सारे प्रामाणिकपणे त्या मिळवून त्यांचा सदुपयोग करतातच असे नाही. जे कुणी थोडाफार करतात ते समाजाच्या ऋणाची परतफेड कितपत करीत असतात याबद्दल सांगणे अवघड आहे.

शिकून शहाणी झालेली मंडळी तरी एकमेकांशी सुसंस्कृतपणे वागतात का? शहाणे लोक एकमेकांवर सोडून दिल्यासारखेही व्यवहार करताना दिसतात.

या साऱ्या वास्तवाच्या पार्श्वभूमीवर समर्थांची सांगी अभ्यासण्यासारखी आहे.

समर्थांना 'सज्जनां' विषयी ओढा आहे. प्रेम आहे. विशिष्ट ज्ञातीविषयी नाही. 'सज्जन' हे 'परमार्थाचे अधिष्ठान' ठरतात, कारण ते ज्ञानसंपन्न असतात. असे 'सज्जन' समर्थही व्हावेत, असा त्यांचा प्रांजळ प्रयत्न राहिला आहे. सज्जनांचे अंतिम उद्दिष्ट कोणते असावे?

> ***नरदेह हा स्वाधीन । सहसा नव्हे पराधीन ।***
> ***परंतु हा परोपकारी झिजवून । कीर्तिरूपे उरवावा ।।***

## डॉ. रा. वा. चिटणीस प्रबंध

एकतीस वर्षांपूर्वी शिवाजी विद्यापीठाला सादर केलेला 'रामदासांची काव्यसृष्टी : एक अभ्यास' हा संशोधनपर प्रबंध आज पुन्हा एकदा सर्वांसमोर ठेवण्यात अभ्यासक म्हणून धन्यता वाटावी अशीच एकूण परिस्थिती आहे.

प्राचार्य डॉ. रा. वा. चिटणीस हे महाराष्ट्र राष्ट्रभाषा सभेसारख्या हिंदी प्रचाराद्वारे देशसेवा करणारे एक निष्ठावान कार्यकर्ते. आपल्या देशकार्याची हुंडी न वठविणारे सच्चे स्वातंत्र्य-सैनिक. आजन्म खादीचे व्रत-पालन करणारे आणि मूलोद्योग शिक्षणप्रणालीचे पुरस्कर्ते निस्वार्थी गांधीवादी. ते जसे विशुद्ध विचार करणारे तसेच विशुद्ध आचारही करणारे होते. संतसाहित्य हे खरे बहुजन समाजाचे लोकसाहित्य म्हणून त्याचे महत्त्व ओळखून ते नित्य अध्ययनरत राहिले.

डॉ. चिटणीसांना समाजोद्धारक संत सत्पुरुषांबरोबरच प्राचीन, मध्ययुगीन ग्रंथ भागवत, ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, नामदेवगाथा, नाथभागवत, भावार्थ रामायण, नाथगाथा, तुकारामगाथा, सकल संतगाथा, अशा नाथ वारकरी वाङ्मयाबरोबरच समर्थ रामदासांची अभंगवाणी, चैतन्यदायी स्तोत्रे, रमणीयार्थ प्रतिपादक करुणाष्टके, तात्त्विक आणि सामाजिक प्रकरणग्रंथ आणि विशेषेकरून दासबोध हे त्यांच्या अभ्यासिकेतील नित्याध्ययनाचे अक्षरवाङ्मय होते.

रामदासांची काव्यसृष्टी फार मोठी आहे. ती केवळ एकाच प्रबंधाचा विषय होऊ शकत नाही; पण तरीही हा अत्यंत व्यापक विषय डॉ. चिटणीस यांनी अभ्यासासाठी का बरं घेतला? त्यांनीच लिहिल्याप्रमाणे रामदास हे कवीच नव्हते अशी हाकाटी जे करतात त्यांच्या म्हणण्यात तथ्य किती, हे तपासून पाहायचे होते. समर्थ रामदास हे चांगले कवी होते, अध्यात्म हा विषय त्यांनी आपल्या कवित्वशक्तीला थिटा पाडला, असे ते म्हणतात. शब्दशक्ती, भाषाशैली, भावोत्कटता, वर्णनकौशल्य, आवेग, आवेश, उदात्तता इत्यादी सारी गुणसंपदा रामदासांच्या कवितेत आहे हे सिद्ध करण्यासाठी डॉ. चिटणीस या शोध-विषयाकडे वळले.

अशा विषयावर डॉ. चिटणींस यांचे आधी कुणी यशस्वीपणे कार्य केलेले नव्हते. विद्यापीठीय मान्यता प्राप्त झालेला समर्थ रामदासविषयक हा पहिलाच प्रबंध आहे, आणि मराठी वाङ्मयेतिहासात देखील तो महत्त्वाचा ठरणारा आहे. त्यात प्रकाशित वाङ्मयाबरोबरच काही अप्रकाशित कृतींचा अभ्यासासाठी उपयोग करण्यात आला आहे. समर्थांच्या हिंदी रचनेचाही विचार करण्यात आला आहे.

एकूण चौदा प्रकरणांतून मूळ प्रबंध मांडलेला आहे. त्यात भरपूर प्रमाणे, उदाहरणे देऊन विस्ताराने समर्थ रामदासांची समग्र साहित्यसृष्टी दर्शविलेली आहे. आरंभी पूर्वाभ्यासकांची रामदासविषयक कामगिरी स्पष्ट केलेली असून पुढे रामदासकालीन ऐतिहासिक परिस्थिती आणि अन्य घटनाप्रसंगांचेही संक्षेपाने वर्णन आले आहे. पुढील प्रकरणांतून क्रमशः आरती-स्तोत्र-

भारूड वाङ्मय, अध्यात्मपर काव्य, स्फुटरचना, अभंग-ओवी वाङ्मय, इत्यादींचा अभ्यास केला आहे. नंतर मनाचे श्लोक व इतर वाङ्मय, रामकृष्णविषयक, प्रासंगिक रचना, यांचा अभ्यास येतो. एक स्वतंत्र प्रकरण मुख्य समर्थ ग्रंथ 'दासबोधा'ची ओळख घडविते. इथेही तुलनात्मक अभ्यासाकडे त्यांचा कल दिसतो. दहावे प्रकरण अप्रकाशित वाङ्मयाला लिहिलेले आहे. अखेरच्या तीन प्रकरणांतून रामदासांचे कवित्व, विभूतिमत्व, विचारविश्व यांचा साक्षेपी विचार आढळतो. एक प्रकरण रामदासांच्या टीकाकार मंडळींचे म्हणणे मांडण्यासाठीही लिहिले आहे.

मुद्रित प्रकाशित साधनांबरोबरच अप्रकाशित साधनांचा नेमकेपणाने उपयोग हे डॉ. रा. वा. चिटणीस यांचे मोठे वैशिष्ट्य ठरते. प्रबंधपूर्तीनंतर त्यांनी अनेक शोधपर स्फुट लेख लिहून रामदासी वाङ्मयाची अपूर्वाई सर्वांसमोर ठेवली. त्यांच्या प्रातिनिधिक लेखांचा एक संग्रह 'मना सज्जना' या शीर्षकाने संपादित करण्याचा योगही मला लाभला. संतसाहित्याच्या आणि महाराष्ट्रधर्माच्या अभ्यासक संशोधकांनी डॉ. चिटणीस यांनी श्रमपूर्वक उजेडात आणलेली सामग्री, अनाग्रही वृत्ती ठेवून केलेले अध्ययन अभ्यासले पाहिजे. त्यातून अनेक अपसमज आणि गैरसमजांचे मळभ दूर करता येईल. प्रस्तुत प्रबंधही त्यादृष्टीने महत्त्वाचा ठरावा. जे डॉ. चिटणीस यांच्या प्रबंधाच्या स्वीकृत विषयसीमेमुळे प्रबंधात समाविष्ट होऊ शकलेले नाही त्याचा ऊहापोह प्रस्तुत प्रस्तावनेत आरंभी केला. यामुळे ग्रंथाला अधिकाधिक पूर्णता यावी असा प्रयत्न केला.

डॉ. रा. वा. चिटणीस आणि त्यांच्या निकटवर्ती, शिष्यपरिवाराचे उत्कट प्रेम आणि स्नेहसद्भाव यातूनच हा ग्रंथ सिद्धीस गेला आहे त्याचे संतवाङ्मयाच्या अभ्यासक उपासकांकडून स्वागत होईल असा विश्वास वाटतो.

संत नामदेव अध्यासन : संत अध्ययन व संशोधन केंद्र
पुणे विद्यापीठ

**अशोक कामत**
१ मे / महाराष्ट्र दिन २००४



# १. रामदास-काव्याभ्यासाचा संक्षिप्त आढावा

## प्रास्ताविक

रामदासांच्या ग्रंथांचा आजपर्यंत विपुल अभ्यास झाला असावा, असे सकृतदर्शनी वाटते. 'रामदास आणि रामदासी' मासिक आणि ग्रंथमाला शं. श्री. देव यांनी सुरू केली, समर्थ वाग्देवता मंदिर धुळ्याला स्थापन केले, सत्कार्योत्तेजक सभा या नावाची एक संस्था उभी करून रामदास संप्रदायाचे सर्व हस्तलिखितांतर्गत वाङ्मय प्रकाशित करण्याचा चंग बांधून बरेचसे ग्रंथ प्रकाशितही झाले. समर्थ चरित्राचे तीन भाग आणि 'रामदास आणि रामदासी' मासिकातून प्रकाशित झालेले 'सुमनहार', 'सांप्रदायिक विविध विषय' असे काही ग्रंथ पाहिले तरी या ग्रंथांचे (चरित्राचे भाग सोडून) स्वरूप स्फुटलेखांच्या संग्रहाचेच होते. हा अभ्यास प्रमुखतः खालील प्रकारचा आहे :

## १) ग्रंथ

टीकात्मक ग्रंथ लिहिणारे सर्वश्री शं. श्री. देव, भा. बा. भट, श्री. म. माटे, न. र. फाटक, शं. गो. तुळपुळे, कवी यशवंत, काका कारखानीस, गं. बा. सरदार, बा. रं. सुंठणकर, शिवाजीराव भावे, डॉ. रा. द. प्राणी, अनंतदास रामदासी, व गुरुदेव डॉ. रा. द. रानडे एवढेच.

**श्री. शं. श्री. देव :** श्री. देवांनी स्फुट लेखन बरेच केले असले तरी त्यांच्या समर्थ चरित्राच्या तीन खंडांपैकी एक 'समर्थ हृदय' हा ग्रंथ समर्थ रामदासांच्या वाङ्मयाचा परामर्श घेणारा एकमेव ग्रंथ आहे आणि या ग्रंथातही त्यांनी समर्थ वाङ्मयाचे महत्त्व अगदी थोडक्यात पटवून देण्याचा प्रयत्न केला आहे. तो काही समर्थ वाङ्मयाचा सर्वांगीण अभ्यास आहे, असे म्हणता येणार नाही. श्री देवांच्या टीकांत विवेचक दृष्टीपेक्षा भाविकता आणि श्रद्धा जास्त आढळून येते.

**श्री. भा. वा. भट :** श्री. भास्कर वामन भट यांच्या 'श्री समर्थ रामदास व श्री रामदासी संप्रदाय' या ग्रंथात प्रमुखतः संप्रदायाचा इतिहास, दासबोध ग्रंथाचा परिचय, स्वराज्य व संप्रदाय यांचा संबंध इत्यादी लेखांचा संग्रह असून रामदासी वाङ्मयाचा अभ्यास असे या ग्रंथाला म्हणता येणार नाही.

**श्री. श्री. म. माटे :** श्री. म. माटे यांचा 'श्री रामदास स्वामीचे प्रपंच विज्ञान' हा ग्रंथ त्यांच्या चार भाषणांचा संग्रह आहे. ही भाषणे 'सूचना व प्रकाशन संचालया'तर्फे प्रकाशित झाली. या ग्रंथातही रामदासांच्या प्रपंच-विज्ञानासंबंधीच्या विचारांचाच परामर्श घेण्यात आलेला आहे. एकाच विचारासंबंधीचा हा परामर्श असल्याने समग्र वाङ्मयाचा अभ्यास असे याचे स्वरूप नाही.

**श्री. न. र. फाटक :** 'रामदास : वाङ्मय आणि कार्य' हा फाटकांचा ग्रंथ. यात प्रमुखतः दासबोध ग्रंथाचा दशकानुसार सविस्तर परिचय करून दिलेला आहे. रामदासांच्या अन्य

काव्यग्रंथांचाही यात अगदीच त्रोटकपणे सारांशरूपाने परिचय करून दिलेला आहे. वाङ्मयीन गुणदोष अथवा रामदासांचे कर्तृत्व, कवित्व इत्यादीविषयक विवेचनाचा या ग्रंथात अभाव आहे. चरित्रात्मक भागातही फाटकांचा आवडता विषय– रामदास-शिवाजी भेट– यासंबंधीचा आपला ग्रह कायम ठेवणारा आणि रामदासांचे कमीपण आग्रहाने व्यक्त करणारा– यात आलेला आहे. नि:पक्षपणे रामदासांच्या व्यक्तिमत्त्वाचा परामर्श त्यात घेण्यात आलेला नाही. त्यांनी केलेल्या दासबोधाच्या अनुवादाच्या ग्रंथातही प्रस्तावनेत तोच विषय आणलेला आहे आणि त्यामुळे त्यांचे हे दोन्ही ग्रंथ एकांगीपणाचे आणि आग्रही आहेत. त्यामुळे त्यांत वाङ्मयाचा परामर्श राहून गेला आहे.

**डॉ. शं. गो. तुळपुळे :** डॉ. शं. गो. तुळपुळे यांचा 'पाच संतकवी' हा ग्रंथ. या ग्रंथात रामदासांचे स्थान पाचवे आहे. यात समर्थांच्या चरित्राचा परिचय करून दिलेला आहे. त्यांच्या काही ग्रंथांचा परिचय व त्या दृष्टीने थोडासा सारांश, तत्त्वज्ञानाचा विचार, साक्षात्कार मार्गाच्या दृष्टीने रामदासांचे महत्त्व, कर्मयोगी रामदास वर्णिलेले आहेत. समर्थांच्या काव्याची काही वैशिष्ट्ये सांगितली आहेत आणि शेवटी समारोप केला आहे. हे सारे विवेचन चांगले असले तरी एक तर साक्षात्कार मार्गावर भर देण्यात आल्यामुळे आणि पाच संतकवींचा संप्रदाय या नात्याने परिचय घडवून आणला असल्याने रामदासांच्या वाङ्मयाचा अभ्यास यात त्या अनुषंगानेच आलेला आहे.

**य. दि. पेंढारकर (कवी यशवंत) :** 'समर्थ रामदास : एक अभ्यास' हा यांचा ग्रंथ. यात दोन भाग आहेत. पूर्वरंग व उत्तररंग. उत्तर रंगात वेच्यांचा संग्रह आहे. पूर्वरंगाच्या १६७ पृष्ठांपैकी १ ते ८४ पृष्ठापर्यंत रामदासांचे चरित्र, त्यांचे व्यक्तिमत्त्व इ. विषयांचा परामर्श घेतलेला आहे. पुढील ८५ ते १६७ ह्या पृष्ठांत वृत्ते, शब्दसृष्टी, दृष्टान्त आणि कवित्व यांचा विचार थोडक्यात केला असून रामदासांच्या रामायणावरही एक लेख आहे. काही दोषांचेही दिग्दर्शन केले आहे. या ग्रंथाचा पूर्वरंगातील भाग लहान असला तरी वाङ्मयाचा अभ्यास करणारा हा एकमेव ग्रंथ असे म्हटले असता वावगे होणार नाही. तथापि रामदासांच्या समग्र काव्यांचा अभ्यास याही ग्रंथात केलेला नाही.

**(ग. गो.) ऊर्फ काका कारखानीस :** 'श्रीसमर्थ रामदास : विचार आणि कार्य' हा ग्रंथ काकांनी 'रामदास आणि रामदासी' या मासिकात लिहिलेल्या रामदासविषयक स्फुटलेखांचा संग्रह आहे. त्यामुळे रामदासांसंबंधी काही विचार असेच या ग्रंथाचे स्वरूप आहे.

**प्रा. गं. बा. सरदार :** 'संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुती' हा त्यांचा एक ग्रंथ. यात रामदासांच्या कार्याचा आढावा एक संत या दृष्टीने घेतलेला आहे. 'रामदासदर्शन' हा त्यांचा दुसरा ग्रंथ. 'महाराष्ट्र धर्माचे प्रणेते समर्थ रामदास स्वामी यांच्या समग्र साहित्यातील ओजस्वी विचारांचे संकलन' असे या ग्रंथाचे स्वरूप असले तरी त्या संकलनाला चाळीस पानांची सुरेख व विवेचक अशी प्रस्तावना आणि तीही अत्यंत नि:पक्षपणे लिहिलेली, हे या ग्रंथाचे भूषण होय. या प्रस्तावनेत बहुतेक सर्व महत्त्वाच्या मुद्द्यांचा विचार आलेला असल्याने समर्थ रामदासांच्या वाङ्मयाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्याला व टीकाकारांनाही हा ग्रंथ एक आवश्यक ग्रंथ झाला आहे.

**बा. रं. सुंठणकर :** 'संत मंडळाचे ऐतिहासिक कार्य' या ग्रंथात सर्व संतांच्या कार्याचे मूल्यमापन करताना रामदासांच्या कार्याचेही मूल्यमापन आहे. एवढेच याचे स्वरूप.

**शिवाजीराव भावे :** 'मनाचे श्लोक : भाष्य व संगती'. 'मनाचे श्लोक' हा छोटा ग्रंथ घेऊन भावे यांनी विषयाचे सुरेख विश्लेषण केले आहे. पण हा ग्रंथ समर्थांच्या एकाच ग्रंथाचे विश्लेषण करणारा आहे.

**रा. द. प्राणी :** मिरजेचे डॉ. रा. द. प्राणी यांनी 'स्वाध्याय मनोबोध' हा आपला ग्रंथ दोन भागांत लिहिला आहे. मनाच्या श्लोकांवर त्यांनी दिलेली ही प्रवचने आहेत. मनाच्या श्लोकांचा संपूर्ण अभ्यास, विशेषत: आध्यात्मिक दृष्टीने– निरूपणाच्या रूपाने केलेला– यात मांडलेला आहे.

**अनंतदास रामदासी :** 'श्री दासबोध प्रवेश' हा यांचा ग्रंथ, दासबोधाचा अर्थ विश्लेषणपूर्वक सांगणारा. अर्थ निर्णयाच्या व विश्लेषणाच्या दृष्टीने हा अत्यंत महत्त्वाचा ग्रंथ आहे. अर्थातच एकाच ग्रंथाचा अभ्यास यात असल्याने समग्र वाङ्मयाच्या अभ्यासाच्या दृष्टीने याचे क्षेत्र मर्यादित आहे, हे उघड आहे.

**गुरुदेव रा. द. रानडे :** यांनी आपल्या 'मराठी वाङ्मयातील साक्षात्कार मार्ग' या ग्रंथात 'दासबोधा'चा 'साक्षात्कार' या दृष्टीने विचार केलेला आहे.

**अनुवाद-ग्रंथ :** श्री. ल. रा. पांगारकर व प्रा. न. र. फाटक यांनी केलेले दासबोधाचे दोनच अनुवाद आहेत. एक हिंदी अनुवादही आहे. या ग्रंथात परिचयात्मक प्रस्तावना आहेत. शिवाय काही मुद्द्यांवर संक्षिप्त विवेचन आहे एवढेच.

मनाच्या श्लोकांचे अनुवाद आजपर्यंत पुष्कळ झाले आहेत. सर्वश्री शं. श्री. देव, ल. रा. पांगारकर, ना. वा. गुणाजी, भालचंद्र देवस्थळी, डॉ. रा. द. प्राणी, समर्थ सेवा मंडळाने प्रसिद्ध केलेला अनुवाद, शां. श्री. सुंठणकर इत्यादी. पांगारकरांची प्रस्तावना विवेचक आहे. 'आत्माराम' या ग्रंथाचा अनुवाद भास्करबुवा रामदासी यांनी केलेला व श्री कल्याणसेवक महाराज यांनी केलेला असे दोनच आहेत. कल्याणसेवक महाराजांनी केलेल्या अनुवादाला लहानशी प्रस्तावना आहे.

## २) मासिके

'रामदास आणि रामदासी', 'सज्जनगड पत्रिका', 'श्रीधर-संदेश, 'पुरुषार्थ', 'पुरुषार्थ' मासिकाचे 'शिवाजी खास अंक' व 'समर्थ' खास अंकाचे तीन भाग', सह्याद्री मासिकांतून आलेले काही लेख, एवढाच पसारा या मासिकांतून आलेल्या अभ्यासाचा आहे. हे सर्व लेख स्फुट स्वरूपाचे असून कोणत्या तरी विषयाची एक बाजू घेऊन तीवर आपले मत साधार मांडण्याचा प्रयत्नच त्यांतून झालेला आहे.

## ३) चरित्रग्रंथातून आलेले समालोचन

श्री देवांनी लिहिलेल्या चरित्रांतून जागोजागी रामदासांच्या वाङ्मयाबद्दलचे विचार प्रकट झालेले आहेत. यासंबंधी वर विचार येऊन गेलेलाच आहे. महाराष्ट्र भाषाचित्रमयूर, केरळकोकिळकार श्री. कृ. ना. आठल्ये यांचा 'श्रीसमर्थांचे सामर्थ्य अथवा श्रीसमर्थ रामदास स्वामींचा लीलानुग्रह' हा ग्रंथ. यात काही ग्रंथांचा त्रोटक परिचय आलेला आहे. प्रामुख्याने दंतकथा, आख्यायिका यांचा संग्रह असलेला हा ग्रंथ आहे. श्री. स. खं. आळतेकर यांच्या 'श्रीसमर्थचरित्र' या ग्रंथात समर्थांच्या ग्रंथावर एक प्रकरण लिहिलेले आहे. त्यात दासबोध, मनाचे श्लोक, करुणाष्टके इ.

प्रमुख ग्रंथांचा परिचय दिलेला आहे. श्री अनंतदास रामदासी यांनी रामदासांचे सप्तकांडात्मक चरित्र तीन भागांत लिहिले आहे. त्यात जागोजागी रामदासांच्या वाङ्मयाचा परामर्श प्रसंगोपात घेतलेला आहे.

## ४) वाङ्मयेतिहास ग्रंथातील अभ्यास

'महाराष्ट्र सारस्वत' (वि. ल. भावे) व 'प्राचीन मराठी साहित्याची रूपरेषा (शेणोलीकर), 'मराठी साहित्याचा विवेचक इतिहास, प्रथम खंड (डॉ. प्र. न. जोशी), 'मराठी वाङ्मयाचा इतिहास (रामदास खंड– ल. रा. पांगारकर)' इत्यादी लहानमोठे वाङ्मय-इतिहास ग्रंथ आहेत. त्यांपैकी 'महाराष्ट्र सारस्वत' व 'पांगारकरांचा रामदास खंड' यात रामदासांच्या वाङ्मयासंबंधी काही अभ्यास केलेला आढळतो. वाङ्मयेतिहास लेखन हा प्रमुख उद्देश असल्याने स्वाभाविकच अशा ग्रंथातून सखोल अथवा सर्वांगीण अभ्यासाची अपेक्षा करू नये.

## ५) प्रबंध

डॉ. टी. डी. जोशी 'Social and Political Thoughts of Ramdas' हा इंग्रजीत लिहिलेला प्रबंध. यात रामदासांच्या सामाजिक व राजकीय विचारांचा विषय असल्याने समग्र साहित्याचा परामर्श यात नाही, अपेक्षितही नव्हता. डॉ. मु. गो. कानडे यांचा 'दासबोधाचा भाषाशास्त्रीय अभ्यास' हा प्रबंध केवळ भाषाशास्त्रीय दृष्टिकोनातून सादर केलेल्या अभ्यासाचा ग्रंथ आहे. हा अद्याप अप्रकाशित आहे. डॉ. न. चिं. जोगळेकर यांचा हिंदी प्रबंध– 'हिंदी और मराठी वैष्णव काव्य का तुलनात्मक अध्ययन' या हिंदी प्रबंधात रामदासांच्या काही कवितांचा अनुवाद सादर केला आहे इतकेच.

## ६) स्फुटरचना

वि. का. राजवाडे यांचा लेखसंग्रह साहित्य-अकादमीने प्रसिद्ध केला आहे. त्यातील एक लेख रामदासांसंबंधी आहे. त्यात दासबोधाची रचना, रामदासकृत कवित्वाची व्याख्या, दासबोधाचे काव्यत्व व प्रतिपाद्यविषय आणि उद्देश असा विचार दासबोधाला धरून केलेला आहे. समर्थांच्या इतर काव्याविषयी त्यात विवेचन नाही. वृत्तपत्रातील लेख : 'साप्ताहिक स्वराज्य', 'मराठा' यांसारख्या वर्तमानपत्रांनी मधून मधून स्फुटरूपाने आलेले रामदासांच्या संबंधी किंवा त्यांच्या काव्यासंबंधी लेख प्रसिद्ध केले आहेत.

## निष्कर्ष

रामदासांच्या समग्र काव्याविषयीचे अध्ययन आजपर्यंत कोणीच केलेले नसून त्यांच्या विशेष प्रसिद्ध अशा दासबोधादी ग्रंथासंबंधाने सुद्धा फारच त्रोटक स्वरूपात अभ्यास केलेला आढळतो.



# २. रामदासकालीन परिस्थिती

## जीवनातून कवितेकडे

रामदासांची कविता केवळ प्रतिभासंपन्न कवीचा कल्पनाविलास नसून ती जीवनाच्या साक्षात अनुभवातून निर्माण झालेली जिवंत कविता आहे. याचा अर्थ त्यांना प्रतिभेचे देणे लाभले नव्हते असा नव्हे, तर त्यांची प्रतिभा जीवनाधारावरच पोसलेली होती. पोकळ कल्पनेची भरारी आणि उपमा-रूपकवादी अलंकारांची पोतडी म्हणजे कविता, असे त्यांनी कधीच मानले नाही. कवितेकरिता कविता त्यांनी केली नाही. ज्या ज्या ठिकाणी ते गेले, ज्या ज्या स्थळांना त्यांनी भेटी दिल्या त्या त्या स्थळांच्या एतिहासिक प्रसंगांच्या जाज्वल्य प्रेरणेने त्यांना जी स्फूर्ती झाली, त्यातून व त्यांना जीवनाचा जो अर्थ कळला, प्रत्यय आला त्यातूनच त्यांच्या कवितांचा उगम झाला. त्यांच्या सर्व काव्यांचा अर्थ या दृष्टीनेच लागतो आणि तो तसाच लावला पाहिजे. कवीच्या चरित्राचा त्याच्या कवितेशी असलेला संबंध हा आता वादाचा विषय मुळीच राहिलेला नाही. म्हणून समर्थांची सारी कविता त्यांच्या जीवनाचे अवलोकन करूनच वाचली पाहिजे आणि म्हणून संपूर्ण काव्यसृष्टीचा अभ्यास करण्यापूर्वी रामदासांच्या काळाची ऐतिहासिक पार्श्वभूमी पाहणे त्यांच्या जीवनाच्या संदर्भात अत्यंत आवश्यक आहे.

## रामदासांचे जीवन आणि काव्य

रामदासांना त्यांच्या बालवयातच ईश्वराचा-श्रीरामाचा साक्षात्कार झालेला होता, हे त्यांच्याच शब्दांत आपल्याला वाचायला मिळत असल्याने त्याबद्दल शंका बाळगण्याचे मुळीच कारण नाही. रामदासांनी संतांना आत्मचरित्र सांगितले आहे. त्यात याचा स्पष्ट उल्लेख आहे.

*पुढें ज्येष्ठ बंधु न सांगेचि कांहीं । सुखें देवालयीं निद्रा केली ॥२५॥ निद्रा केली तेथें श्रीरामे उठवूनी ।*[१] *तोचि मंत्र कानीं सांगितला ॥२६॥*

हनुमंतस्वामीकृत बखरीतही हा प्रसंग वर्णिलेला आहे.'' श्री रघुपतींनी दर्शन देऊन, मस्तकी वरदहस्त ठेवून आज्ञा करिते झाले जे,' तुम्हास मारुतीने अंशेकरून निर्माण केले आहे, तरी.... कृष्णातीरास जाऊन जगदोद्धार करावा' ......... याप्रमाणे आज्ञा होऊन रामदास ऐसें नाम ठेविलें आणि अदृश्य जाले...........'' दिनकरांनीही हा प्रसंग वर्णिलेला आहे.[२]

बालवयातच (वयाच्या अकराव्या वर्षी) साक्षात्कार घडलेला हा महापुरुष वैराग्यसंपन्न निघावा यात आश्चर्य नाही आणि तेथून एक वर्षपर्यंत नारायण (बालसमर्थ) मौन्यमुद्रा धारण करूनच होता. लहानपणी कोपऱ्यात रुसून बसलेला नारायण 'चिंता करतो विश्वाची' असे आपल्या आईला उत्तर देतो ही गोष्ट सहज सोडून देण्यासारखी नाही. देहाची तमा न बाळगता, संसाराची आकांक्षा न ठेवता, रामदर्शनासाठी हट्ट करून तो अनुग्रह करून घेणारे रामदास त्या काळापासूनच विश्वाची चिंता करीत असले पाहिजे हे निराळे सांगण्याची आवश्यकता नसावी आणि येथेच त्यांच्या कवितेची भूमिका स्पष्ट होते. त्यांच्या अंतरीच्या वेदनांची चिंता करण्याचे

त्यांचे वय नव्हते हे खरे असले तरी अलौकिक महापुरुषांच्या जीवनात असे प्रकार घडल्याची अनेक उदाहरणे आपल्या महाराष्ट्रीय संतांच्या बाबतीत सापडतात.

रामदासांचे विवाहप्रसंगी बोहल्यावरून पळून जाणे याच प्रकारचे. सांसारिक पाशात सापडायचे नाही, असा निश्चय केवळ वैराग्याच्या बुद्धीनेच झाला असेल असे नाही, तर पुढे जे कार्य करावयाचे आहे त्यासाठी विवाहाची बेडी अडकवून न घेणेच आवश्यक होते. पळून जाणे ही केवळ भावनेची ऊर्मी नव्हती. त्याच्यामागे भावी काळाच्या कार्यविचाराची सूक्ष्म बीजे होती आणि ही गोष्ट त्यांच्या कवितेच्या संदर्भात विचारात घ्यावी लागते.

## टाकळीतील तपश्चर्या

समर्थ टाकळीला आले आणि लागलीच त्यांनी आपल्या तपश्चर्येला आरंभ केला. वयाच्या बाराव्या वर्षी आरंभ करून पुढे सतत बारा वर्षे नाशिकच्या परिसरातील प्रचंड थंडी, वारा, ऊन, पाऊस यांची क्षिती न बाळगता नित्य सूर्योदयापूर्वी उठून व टाकळीच्या संगमावर कमरेइतक्या पाण्यात उभे राहून गायत्रीचे पुरश्चरण मध्यान्हीपर्यंत करावयाचे, त्यानंतर पंचवटीत मधुकरी मागावयाची, तिचे तीन भाग करून एक भाग गाईला देऊन, दुसरा दान देऊन, तिसरा पाण्यात धुऊन आपण खायचा. दुपारच्या वेळी नाशिकच्या पंडितांकडे वेद, शास्त्रे, पुराणे, गीता, उपनिषदे, भागवत इत्यादी ग्रंथांचे अध्ययन करावयाचे आणि केवळ लंगोटी लावून मठात वस्ती करावयाची ही एवढी कडकडीत तपश्चर्या कशासाठी? एकनाथांचा आदर्श ठेवावयाचा होता असे म्हणावे तर रामदासांना संसार करूनही भक्ती करता आली असती. पूर्वसूरींप्रमाणे 'रामकृष्ण हरी' असा जप व भजन करून 'ठेविले अनंते तैसेचि' राहता आले असते. प्रत्यक्ष वडील सूर्याजीपंत व ज्येष्ठ बंधू यांनीही तोच मार्ग आक्रमिला होता. पण रामदासांचा विचार निराळाच असला पाहिजे, हे स्पष्ट होते. त्यांना 'जगदोद्धार' करण्याची आज्ञा प्रत्यक्ष श्रीरामचंद्रांकडूनच झाली होती आणि म्हणून स्वत:ची योग्यता वाढविणे त्यांना आवश्यकच होते.

टाकळीचा एक प्रसंग रामदासांच्या जीवनात अत्यंत महत्त्वाचा आणि आणीबाणीचा होता. तो म्हणजे मृत गिरिधरपंतांना जिवंत करण्याचा. हा चमत्कार असो नसो, कदाचित गिरिधरपंतांचा वास्तविक मृत्यू झालाही नसेल, पण रामदासांना हे माहीत नव्हते. गिरिधरपंतांची पत्नी अन्नपूर्णाबाई सती जाण्यापूर्वी रामदासांना नमस्कार करते. 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' असा रामदासांच्या मुखातून आशीर्वाद निघतो आणि पेच-प्रसंग निर्माण होतो. रामदासासारख्या तपश्चर्या करणाऱ्या अल्पवयी- केवळ १५ वर्षांच्या बालकाला- केवढा जबरदस्त धक्का बसला असेल! त्याने आपली सारी तपश्चर्या पणाला लावली आणि आश्चर्य हे की गिरिधरपंत जिवंत झाले. केवढी कृतज्ञता वाटली असेल श्रीरामकृपेबद्दल आणि केवढा प्रचंड आत्मविश्वास वाटला असेल, स्वत:च्या तपश्चर्येबद्दल! श्रद्धा अधिक दृढ झाली असणार आणि श्रीरामाला त्रास दिल्याबद्दल पश्चात्तापही झाला असणार. फक्त दोन वर्षे तीन महिने या मुदतीच्या तपश्चर्येचे एवढे फळ!

## व्यथित रामदास

रामदास जेव्हा टाकळीला आले तेव्हा त्यांच्या मनाला निराशा जाणवली होती.

*उदासीन हा काळ जातो गमेना । सदा सर्वदा थोर चिंता शमेना ।। उठे मानसी सर्व सांडूनि*

*जावें । रघूनायका काय कैसे करावें ॥१॥*

काही वेळा मोहाचाही प्रसंग उत्पन्न झाला असेल, विवेकाने त्याला आवर घालताना किती मानसिक कष्ट पडले असतील, मानसिक संताप किती झाला असेल! याच मायामोहिनीला उद्देशून त्यांनी केलेले पद या मन:स्थितीचे पूर्ण वर्णन करायला समर्थ आहे :

*उगी राहे रांडे शब्दचाळ भांडे ॥धृ.॥ काजळ कुंकू लेवुनि रांडे किती करिसी नखरा । भिल्लीण होऊनि रुद्र नेला ठकविलें शंकरा ॥१॥ साही त्रिकूट अठरा रांडे तेंहि वेडावलीं । चौघी जणीं वाद केला तेंहि धुडकावलीं ॥२॥ दुर्वासासी गर्व केला तेथें जालिस घोडी । कोठे म्हणता लाज नाही डांगवी बांदोडी ॥३॥ शुकापाशीं जाऊनि तुवां काय उजेड केला । मारुनिया बाण तुझा मोहरा फिरविला ॥४॥ रामदासें पर्णुनि तुला लग्नीं टाकुनि दिल्हें । साधुसंतां जाणुनिया फार फजीत केलें ॥५॥*[३]

"वय नसताना याला देव पिसे लागले, देव काय आम्हा सकळापासी नसे? जगावेगळेच याचे भजन । हे आधीच विषय संसाराला उबगले, याला कोणी वडीलधारे माणूस नाही म्हणून हा छंद ।[४]" अशा जननिंदेचाही त्रास सहन करावा लागला होता. अशा अवस्थेत श्रीरामाने कृपा केली, मृताला जीवदान दिले! केवढी दया! केवढी कृतज्ञता वाटली असेल! श्रीरामाच्या चरणी दृढ श्रद्धा निर्माण झाली आणि पुढची तपश्चर्या करण्यास धीर उत्पन्न झाला. गिरिधरपंतांना व अन्नपूर्णाबाईंना आठ पुत्रांऐवजी दहा पुत्र होतील, असा आशीर्वाद या श्रद्धेमुळे दिला. थोरला मुलगा मागून घेतला. येथेही रामदासांचा भावी उद्देश स्पष्ट होतो. दुर्धर प्रसंग ओढवला होता, तो टळला. बरे, झाले ते झाले. पुन्हा मुलगा कशाला मागून घ्यावा? आपली स्वत:ची अवस्था ती काय? त्यात त्या मुलाचे ओझे कशाला हवे होते? अर्थात शिष्यपरंपरा वाढवायची होती, मठ स्थापायचे होते, महंत निर्माण करावयाचे होते, लोकांची स्थिती सुधारायची होती. हा सर्व उद्देश आधीच मनात ठरवून ठेवल्याशिवाय उद्धवाची मागणी केली गेली नाही. म्हणजेच रामदासांचे प्रत्येक पाऊल पुढील धोरणाने, विचाराने, विवेकाने, आणि निश्चयाने पडत होते, असे त्यांच्या कवितेवरूनही दिसून येईल.

याच काळात त्यांची प्रसिद्धी झाली. चमत्कार करणारा अल्पवयी साधू, नि:स्पृह साधू म्हणून त्यांची ख्याती झाली. नाशिक हे तीर्थयात्रेचे महत्त्वाचे ठिकाण. सर्व भारतीय तेथे येणार. रामदासांची कीर्ती त्यांच्या कानावर गेली असणार आणि त्यांच्या दर्शनाला ते लोक गेले असणार. त्या वेळी देशातील सर्व परिस्थिती त्यांना कळली असणार. पुरश्चरणाचा काळ असल्याने त्यांना ते स्थान सोडणे शक्य नव्हते. पण मनाची किती तळमळ झाली होती! याच वेळी कदाचित पुढील तीर्थयात्रेचा बेत मनात ठरलेला असणार. कारण देशातील परिस्थिती प्रत्यक्ष त्यांना कळायला हवी होती.

## तीर्थयात्रा, अवलोकन आणि अनुमाने

पुरश्चरणाच्या काळात शहाजीराजांची व त्यांची भेट झाली होती. रामदास नंतर तीर्थयात्रेला गेले. उत्तरेचा प्रवास आटोपून द्वारकेला पोहोचले. नंतर पूर्वेकडे जगन्नाथाचे दर्शन घेऊन दक्षिणेला रामेश्वर-कन्याकुमारीला गेले. तेथून ते कोल्हापूरमार्गे पुन्हा नाशिकला पोहोचले. टाकळीला उद्धवाला भेटून जांबेला आपल्या मातु:श्रीला भेटले. तिची दृष्टी गेली होती, ती तिला दिली. तेव्हा ही भूतविद्या कोठे शिकलास म्हणून तिने विचारताच श्रीराम हेच भूत आहे[५],

असे पद रचिले हे प्रसिद्धच आहे.

या सर्व प्रवासात त्यांनी देशाचे निरीक्षण केले. राजकीय, सामाजिक, धार्मिक, आर्थिक, सांस्कृतिक सर्वच परिस्थितीचे मोठे भयानक चित्र त्यांनी प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिले. टाकळीच्या मठात जे ऐकिले ते तीर्थयात्रेत डोळ्यांनी पाहिले आणि जो उद्वेग झाला त्यातून कृष्णातीरीचा निवास निश्चित झाला. उत्तरेच्या यात्रेत हिम केदाराजवळ त्यांनी सर्वांचाच उबग येऊन देह समर्पण करण्याचे ठरविले तोच श्रीरामांनी दर्शन देऊन तुमची तनू ती आमची तनू असे सांगून कृष्णातीरीच्या स्थानाची आज्ञा दिली. म्हणजेच त्यांचे कार्यस्थल निश्चित झाले, कार्य काय करावयाचे याचा निर्णय तीर्थयात्रेत प्रतिदिनी होतच होता. 'जगदोद्धार' हेच ते कार्य होय.

## राजकीय परिस्थिती

रामदाससमकालीन व त्याच्या थोड्या आधीची देशाची स्थिती कशा प्रकारची होती, याचे वर्णन अनेक ठिकाणी मिळते. रामदासांच्या स्वत:च्या काव्यावरून तर त्या परिस्थितीचे विदारक चित्र स्पष्टपणे समजून येते. याशिवाय दिनकर, गिरिधर, श्रेष्ठ (रामी रामदास) यांच्याही काव्यांतून जी वर्णने आली आहेत ती सारी एकमुखाने रामदासांना पाठिंबाच देतात. तत्कालीन ऐतिहासिक पुरावेही रामदासांनी वर्णिलेल्या परिस्थितीला अनुकूलच आहेत.

"समर्थ रामदास जन्माला आले त्या काळी महाराष्ट्र देश मुसलमानी घराण्याच्या राजसत्तेखाली होता. ज्ञानेश्वरांच्या समाधिकालानंतर चाळीस-पन्नास वर्षांत महाराष्ट्रात ज्या मुसलमानी राज्यकर्त्यांची राजकीय सत्ता प्रस्थापित झाली होती, ती समर्थाधिष्ठित काल विभागात कायम होती. श्रुतिस्मृतिप्रणीत धर्मानुयायी महाराष्ट्रीय जनतेवर जो जुलूम, जाच, मुसलमान-धर्मीयांच्या राजकीय सत्तेच्या स्थापनेच्या प्रारंभापासून सुरू होता, तोच समर्थांच्या काळापावेतो अस्तित्वात असून महाराष्ट्रीय जनतेस असह्य झाला होता .......... हा पुराणांतरी वर्णिलेल्या कलियुगाचा परिणाम आहे, अशी महाराष्ट्रीय जनतेची सर्वसाधारण समजूत होती."[६] श्रेष्ठांनी या कलियुगाचे वर्णन केले आहे– *कलियुग महाघोर । सर्व दोषांचा आकर । वर्णचतुष्टय नारीनर । सर्व धर्म पराङ्मुख ॥३१॥*

## अस्मानी-सुलतानी

रामदासांची 'अस्मानी-सुलतानी' नावाची तीन प्रकरणे आहेत. पहिल्यात १० ओव्या, दुसऱ्यात २० आणि तिसऱ्यात १० अशा एकूण ४० ओव्यांत त्यांनी आपल्या वेळच्या परिस्थितीचे अत्यंत बोलके आणि वास्तव वर्णन केले आहे. मुसलमानांनी केलेल्या अत्याचारांचे इतके भयानक वर्णनच रामदासांच्या मन:स्थितीची कल्पना देण्यास पुरे आहे.

दुष्काळ पडला, लुटालूट सुरू झाली, लोक मरू लागले, व गावे ओस पडली. चोऱ्यामाऱ्या व दंगेधोपे यांचा सुकाळ झाला. इतक्यात परचक्र आले व दोन्हीकडच्या सैनिकांनी प्रजेचा संहार मांडला. दांडग्यांनी हजारो जीव कुटून काढले, नाक-कान कापले, स्त्रिया भ्रष्टविल्या व लोकांच्या मोटा बांधून समुद्रात बुडविल्या. चोरांनी सौदागरांना बुडविले आणि काफिल्यांना लुटले. शामळांनी व मुसलमानांनी गुजरिणी व ब्राह्मणी भ्रष्टविल्या, बाटविल्या, जहाजांवर धरून नेल्या, कित्येक स्त्रियांना देशांतरास नेऊन गुलाम म्हणून विकून टाकले आणि शेकडो सुंदरांना आणि मातांना हालहाल करून मारून टाकिले."

"हे समर्थकृत वर्णन एखाद-दुसऱ्या दुष्काळाचे नाही. मुसलमानी अमलात समर्थांच्या बालपणात अस्मानी व सुलतानी जुलूम नित्याचा होऊन बसला होता, त्याचे हे वर्णन आहे. तीर्थक्षेत्रे बुडविणे, व्यापारी उदीम लुटणे, स्त्रिया-पोरे भ्रष्टविणे आणि धर्मपंथांचा उच्छेद करणे ह्या बाबी मुसलमानांच्या अमलात शालिवाहनाच्या सोळाव्या शतकाच्या प्रारंभास व मध्यासही पूर्वीप्रमाणेच जारीने प्रचलित होत्या. हा अनन्वित निर्दयपणा समर्थ बालपणापासून पाहत होते व ह्यातून लोकांची मुक्तता कोणत्या उपायाने करता येईल ते शोधीत होते."[७] असेच वर्णन दासबोधातही संसाराची परवड कशी होते, हे दाखविण्यासाठी तिसऱ्या दशकात आले आहे–

"एखाद्या सरदाराने पराक्रम केला म्हणजे त्याच्या विजयाचा दाखला म्हणून कत्तल केलेल्या लोकांची मुंडकी आग्र्यास पाठविण्यात येत व तेथे ती सर्वांच्या नजरेस पडावीत, म्हणून बादशहाच्या राजवाड्याच्या चौकात ठेवली जात. चोवीस तासांनंतर ती मुंडकी तेथून उचलून बाहेरच्या रहदारी रस्त्याच्या दुतर्फा झाडांना टांगली जात किंवा एवढ्यासाठी मुद्दाम उभारण्यात आलेल्या बुरुजांच्या भोकात ठेवीत. प्रत्येक बुरुजात शंभर-शंभर मुंडकी मावत. अशा मुंडक्यांच्या राशी मी कैक वेळा शहरात पाहिल्या आहेत. एकदा तर अशी दहा हजार मुंडकी माझ्या पाहण्यात आली, असे वर्णन शिवसमर्थकालीन इटालियन प्रवासी मनुसी याने केली आहे.[८]

लोकस्थिती अथवा सामाजिक परिस्थितीचे वर्णन रामदासांच्या कवितेत ठाई ठाई दिसून येते. करुणाष्टके, सवाया, पदपदांतरे, जनस्वभाव गोसावी, दासबोध इत्यादी कितीतरी ठिकाणी लोक स्वधर्मापासून च्युत झाले, आचार संपला, नीती राहिली नाही, न्याय राहिला नाही, वर्णसंकर तर झालाच. स्वार्थ बोकाळला, घरात बाप-लेकाचे, पती-पत्नीचेही जिव्हाळ्याचे संबंध राहिले नाहीत, इत्यादी प्रकारची आलेली वर्णने समाज कसा पोखरून निघाला होता हे दाखवितात आणि याचे कारण धर्मावरील श्रद्धा पार मावळली किंवा त्यातही ढोंग शिरले. मूळ पायाच घसरला आणि म्हणून धर्माचा पाया घालून लोकस्थिती सुधारावी हा समर्थांच्या सर्व धडपडीचा हेतू होता, हे स्पष्ट आहे.

## अत्याचाराचा लोकस्थितीवर परिणाम

या अत्याचारामुळे सर्वसाधारण जनतेत नैराश्य पसरले होते, यात आश्चर्य नाही. देवाधर्मावरील, देवाच्या न्यायप्रियतेवरील आणि काही वेळा त्याच्या अस्तित्वावरीलही विश्वास उडणे स्वाभाविक होते. काही वेळा जबरदस्तीमुळे तर काही वेळा श्रद्धाच नाहीशी झाल्यामुळे व्यवहारी शहाणपणा म्हणूनही असेल 'कित्येक तुरुक होती आपुल्या इच्छेने' असे घडत होते. सांस्कृतिक परिस्थितीची कल्पना देणारी अनेक वचने रामदासांच्या कवितेत आढळून येतात...

(१) *ब्राह्मण बुद्धीपासून घेवले । आचारापासून भ्रष्टले । गुरुत्व सांडून जाले । शिष्य शिष्याचे ॥३१॥*[९] *कित्येक दावल मलकास जाती । कित्येक पीरास भजती । कित्येक तुरुक होती । आपुल्या इच्छेने ॥३२॥*

ब्राह्मणास ग्रामणीने बुडविले.....

(२) *थोडे बहुत समजले । पोटापुरती विद्या शिकले । प्राणी उगेच गर्वे गेले । मी ज्ञाता म्हणौनी ॥ १५-९-२७*

(३) *कांता तरुण पुरुष वृद्ध । दोघांस पडिला संबंध । खेद सांडून आनंद । मानिला*

*तेहीं ॥ ३-५-२५*

(४) *जे जन्मून पोसली । तेचि फिरोनि पडिलीं । अंती विषम वेळ आली । प्राणीयांसी ॥ ३-६-४८*

(५) *बहुत ज्ञातीं नागविली । कामनेने वेडीं केलीं । कामना इच्छितांच मेली । बापुडे मूर्खें ॥ ५-२-३७*

(६) *नि:शेष कामनारहित । ऐसा तो विरुळा संत ॥५.२.२८*

(७) *जाली विषई वृत्तिअनावर । दृढ धरिला संसार । परमार्थ चर्चेचा विचार । मळिण जाला ॥५-३-५५*

(८) *दु:ख दरिद्री उदेगे । लोक सर्वच पीडिले ।*[१०]

(९) *तुम्ही समस्त देवता । कठीण काळ धावता ॥६॥ जना प्रत्यक्ष हे दिसे । तयासि संशयो नसे ॥*

(१०) 'व्यर्थ संसार जातसे' या लहानशा प्रकरणात तर तत्कालीन समाजाचा काळ कसा जात असे याचे वर्णन बोधप्रद आहे : *कटकटी खटखटी रागे । चटपटी वटवटी सदा । चुर्चुरी चुर्मुरी रागे । व्यर्थ संसार जातसे ॥१॥ कर्करी खर्खटी रागें । गर्गरी भर्भरा मदें । पर्पटी घर्घटी अंती । व्यर्थ संसार जातसे ॥२॥ कुंजती थिंकिता दु:खे । हांसती रडती सदा । बोंबळीती महाजाळे । व्यर्थ संसार जातसे ॥३॥ धडधडी तडपडी लोभें । मायाजाळ सुटेचिना । तळमळा खेदें । व्यर्थ संसार जातसे ॥४॥ हटाटे पटाटे मोठे । थोर संसार सांकडी । शोक चिंता अहर्निशी । व्यर्थ संसार जातसे ॥५ ॥ तीर्थ नाहीं यात्रा नाही । नाहीं कथा निरुपण । तृप्त हे वासना नाहीं । व्यर्थ संसार जातसे ॥६॥*[११]

(११) कोणाचे कोणाशीच पटत नाही. याही प्रकरणात ही समाजपरिस्थिती स्पष्टपणे व्यक्त झाली आहे.

*बहू आतुरांचातुरांही पडेना । कदा कातरां वातरां ही पडेना । बहू निंदकां वादकांही पडेना । बहू साधकां बाधकांही पडेना ॥१॥ कदा देवदैत्यांमध्ये सख्य नाही । जिवां मानवांही मधे सख्य नाहीं । जाती विजातीमध्ये सख्य नाही । महंता महंतांमध्ये सख्य नाही ॥ कळहो लागला पंडितां पंडिताला । कळहो लागला ज्ञानिया ज्ञानियाला । कळहो लागला योगियां योगियालां । कळहो लागला तापसी तापसीला । यती भीइती भांडती दीर्घ द्वेषे । सदा निंदिती येकमेकां निशेषे । बळे बोलिती हाकिती घोर घोषे । अहंता गुणे सांडितां ज्ञान्तोषें । बहू जाणते बोलती शास्त्रमते । जनीं दाविती आपुले व्युत्पतीतें । उणे बोलती शीघ्रकोपें बहूतें । बळे मारिती येकमेकांसि हाते ॥५॥*[१२]

(१२) 'रडक्यांचा रडका संसार' या प्रकरणात जनतेची दैनंदिन दारिद्र्याची परिस्थिती कशी होती ते स्पष्ट केले आहे : *नसे आंथराया नसे पांघराया । नसे धाम ना दृढ छाया निजाया । नसे अन्न खाया नसे रम्य जाया । वृथा शीण संसार कर्ती रडाया ॥ नसे द्रव्य काही घरीं धान्य नाहीं । बहू वेष्टिला काम क्रोधादि देहीं । पराधीनता वेळ नाहीं मराया । वृथाशीण संसार कर्ती रडाया ॥२॥ मनासारिखा मित्र तोही मिळेना । परत्रीक ते ज्ञान पोटी वसेना । सदा कोप आरोप संतप्त काया । वृथा शीण संसार कर्ता रडाया । मनासारिखा सोइराहि मिळेना । मनी पाहता चित्तशुद्धी असेना । उणे बोलता सर्व काही छळाया । वृथा शीण संसार कर्ता रडाया ॥*

ह्या तपशीलवार दिलेल्या उताऱ्याच्या आधारावर असा निष्कर्ष काढता येतो की, समर्थ रामदासांच्या वेळची समाजाची आर्थिक, सांस्कृतिक, धार्मिक परिस्थिती अत्यंत खालावलेली व

अधोगतीला पोचलेली होती. राजकीय सत्ता मुसलमानांच्या हाती असल्याने तिकडूनही समाधान नव्हते. छळ, बलात्कार, अन्याय, मूर्तिभंजन, देवालयांचा नाश, लुटालूट, जबरदस्तीने बाटविणे इत्यादी अनन्वित प्रकार होत होते आणि ही सारी परिस्थिती रामदासांनी उघड्या डोळ्यांनी आपल्या तीर्थयात्रेच्या प्रसंगी पाहिलेली होती. त्याशिवाय त्यांच्या कवितेत इतके तपशिलाने वर्णन येणे शक्यच नाही. रामदासांच्या कार्याची दिशा या वेळी पुन:पुन: निश्चित झाली असली पाहिजे यात शंका नाही.

## रामदास पूर्वकालीन वाङ्मयातील संदर्भ

ज्ञानेश्वरांच्या वाङ्मयात मुसलमानांच्या अत्याचारांचा कोठेही उल्लेख नाही. रामदासांचे इंग्रजी चरित्र लिहिणारे एस. एस. आपटे हे लिहितात,

"There is no single reference in the comprehensive literature of Gyaneshwar to the Muslim agressions, their rule in the North and in the West, or even to the impact of this alien religion on the Hindu society."

नामदेवांच्या वाङ्मयातील उल्लेखांबद्दल श्री. आपटे लिहितात :–

"When he (Namdeo) from his travels in the Worth had the misfortune to witness the tragedy of the Deccan being overrun by the fanatiocal Muslims. On seeing this Namdeo lamented : ``Muslims have become kings. No wonder there is misery everywhere. What bad times are yet to come? Disbelief is rampant every where. All have forsaken duties (Dharama) enjoyed by `Varnes's what can except the devotion of God Hari, burn out all these piles of sins?"

In another place he arieves : "The kings have become converts and fallen. Everywhere there are weaknesses and vices. It was to reform this society that Gnyaneshwar took birth. When the impact of yavanas will make life miserable, only devotion of Hari will redeem them ``He implores his diety : ``Truth has become rare and religion is in danger. O God, What are you waiting for? O Vithal, run down : I am worried of life, come and help us!"[१३].

प्रत्यक्ष नामदेवांवरच आलेला एक प्रसंग त्यांनी हिंदी पदातून व्यक्त केला आहे. सुलतानाने त्यांचा छळ केला.

*सुलतान पुछे सुनरे नामा । देखो राम तुमारे कामा । नामा सुलताने बांधा । देखो तेरा हर विठा । बिस्मिल्ल गो दोव जिवाय । नहिं तो गर्दन मारूं ठाव ॥१॥ बादशाह ऐसी क्यों होय । बिस्मिल्ल कीय न जिये काम । मेरा किया कछु न होय । कर है राम होय है सोय ॥२॥ बादशाह चढयो हंफार । गजहस्ती दियो चमत्कार ॥*[१४] *रुदन करे नामेकी माय । छोड राम बिन भजे खुदाय ॥३॥*

गाईला जिवंत कर नाहीतर ठार मारतो अशी धमकी सुलतानाने दिली. नामदेव त्यातून वाचले ही गोष्ट वेगळी. महिकावतीच्या बखरीतही असा उल्लेख आहे.

"All fighting classes, landed gentry and common people and the rest have gone over to the side of the Muslims. The Kshatriyas have no pride of the king-

dom. They have thrown away their weapons and taken to the plough. The Somavanshies are engeging themselves in petty village offices. Shinde famiy has become the servants of the Muslim kings and all without exceptions have fallen from the traditional path of life."[१५]

रामदासांच्या वाङ्मयातील संदर्भांच्या मानाने जुने संदर्भ अल्प आहेत. याचा अर्थ असा नव्हे की रामदासपूर्वकालीन संतांना मुसलमानी अत्याचारांची झळ लागली नव्हती किंवा त्यांचे त्यांना काहीच सोयरसुतक नव्हते. परंतु एवढे मात्र निश्चित मानावेच लागेल की रामदासांनी सर्व परिस्थिती सुधारण्याचा जितका प्रयत्न केला तितका एक पारमार्थिक बाजू सोडली तर पूर्वसूरींनी केला नाही. हे त्यांच्यावरील दोषारोपण नसून रामदासांचे मूल्यमापन आहे.

## पूर्वसूरींचा प्रभाव

रामदासांना आध्यात्मिक परंपरा मुकुंदराजांपासून लाभली होती. मुकुंदराजांचा विवेकसिंधू रामदासांनी वाचला होता. एवढेच नव्हे, तर त्याचा प्रभावही रामदासांच्या ग्रंथावर पडला आहे, असे विधान प्रा. कृ. पा. कुलकर्णी यांनी केले आहे.[१६] ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ यांचे वाङ्मयही त्यांच्या दृष्टीआड झाले नव्हते. एकनाथांचाही प्रभाव रामदासांच्या वाङ्मयावर असल्याचे सर्वश्रुतच आहे. परंतु रामदासांनी अध्यात्मापुरती परंपरा स्वीकारली आणि तीही थोड्या फरकाने म्हणजे देवतेच्या निवडीत फरक करून श्री रामउपासना दृढ करून प्रपंच आणि परमार्थ यांची सांगड घालण्याचे काही विचार नाथांच्या आचरणावरून त्यांनी अवश्य घेतले असतील. परंतु तीर्थयात्रेच्या वेळी प्रत्यक्ष आलेल्या अनुभवांनी रामदासांचे वाङ्मय अधिक प्रभावित झाले आहे, यात शंका नाही. स्वत:चे कडकडीत ब्रह्मचर्य, तपस्या आणि देशाची परिस्थिती बदलून टाकण्याची आतील ऊर्मी हीच त्यांच्या काव्याची कारणे होत हे स्पष्ट दिसते. म्हणून परंपरेतून आवश्यक त्या गोष्टी रामदासांनी अवश्य उचलल्या, पण सर्व वाङ्मय स्वत:च्याच विचारांनी व भावनांनी व श्रद्धांनी व्यापून टाकले.

## रामदास आणि समकालीन कवी

आश्चर्य हे की समकालीनांनी स्वराज्यासाठी काही कशी– वाङ्मयीन का असेना– पण, चळवळ केली नाही. रघुनाथपंडित, वामनपंडित, तुकाराम आदी कितीतरी कवी फक्त अध्यात्म-परमार्थ करीत बसले आणि ईश्वराची भक्ती एवढाच उपाय दिसला किंवा सुचला. या त्यांच्या कार्याचेही महत्त्व काही कमी नव्हते. जनतेच्या मनाची तयारी क्रांतीसाठी अवश्य लागते. ती या सर्व संतांच्या वाङ्मयाने अवश्य केली आहे. पण ती एका दृष्टीने, संत झाले नसते तर रामदासांना कार्यच करता आले नसते, ही गोष्ट खरी. तथापि रामदासांनी जी कामगिरी केली ती अलौकिक होती एवढे निर्विवादपणे सिद्ध होते.



# ३. रामदासांचे आरती वाङ्मय

आरती : शब्दार्थ, आरत्यांचे कर्तेपण, वर्गीकरण आणि विषय 'उदात्त' आरत्यांचा विषय-आरत्यातील सांस्कृतिक-आरत्यातील आर्त-आरत्यातील विविध भावनाविष्कार, गुरुभक्ती, वीर आणि भयानक रस, शांतरस, हास्यरस, करुण रस, आरत्यांची भाषाशैली, आरत्यांतील अलंकार, आरत्यांतील तत्त्वज्ञान-आरत्यांची गेयता-उपसंहार.

देवांनी संपादिलेल्या 'पदपदांतरे'[१] या ग्रंथात समर्थांनी रचलेल्या आरत्या छापल्या आहेत. त्यांची संख्या १४ आहे. याशिवाय ३०-३१ आरत्या श्री अनंतदास रामदासी यांनी संपादिलेल्या समर्थांच्या 'गाथ्या'त[२] मिळतात. काही आरत्या धुळे येथील समर्थ वाग्देवता मंदिरातील हस्तलिखित बाडावरून उतरून घेऊन परिशिष्टात संग्रहित केल्या आहेत. काही आरत्या 'मराठी आरती'[३] या डॉ. म. वि. गोखले यांच्या प्रबंधातून घेतल्या आहेत. काही आरत्यात 'जयदेव जयदेव' किंवा 'ओवाळू आरती' असे शब्द नसले तरीही त्यातील भाव आरतीचाच असल्याने त्यांचा विचार येथे केला आहे.

## 'आरती' शब्द

'आरती'चा शब्दार्थ आणि समर्थांना अभिप्रेत असलेला अर्थ कोणता याचा उलगडा येथे करणे आवश्यक आहे. महाराष्ट्र शब्दकोषात[४] आरतीचा अर्थ पुढीलप्रमाणे दिलेला आहे. (१) तबकात लावलेले निरांजन किंवा जळता दिवा ठेवून त्याने देव, गुरू, यांना ओवाळण्याचा विधी. २) देवास निरांजन ओवाळताना म्हणावयाचे स्तुतिपर गीत. हिंदी शब्दसागर[५] या हिंदी शब्दकोशात याचा अर्थ खालीलप्रमाणे दिलेला आहे : (१) पूजामे किसी देवमूर्ति के समक्ष कपूर या घी का दीपक मंडलाकार घुमाना, (२) आरती मे पढ़ा जानेवाला स्तोत्र या विनय के पद या प्रार्थना । संस्कृत कोशात 'आरती' या शब्दाचा Waving lights before an image असा अर्थ दिला आहे.

आरतीत जो दीप ठेवलेला असतो तो 'आरात्रिक्म' आरती म्हणजे रात्रीपर्यंत तेवत ठेवावयाचा दीप अशा अर्थावरून हा शब्द रूढ झालेला असावा किंवा 'आर्तिक्य' आरती म्हणजे ओवाळण्याचा दीप या शब्दावरूनही तो आला असेल. 'एकार्तिक्य दीपं समर्पयामि' यात एकार्तिक्य हा दीप म्हणजे आरती असे म्हटले आहे.

या अर्थाशिवाय आरतीतील भावविशेषावरून 'आरती' या शब्दाचा अर्थ आर्तता, व्याकूळता असाही होतो. या अर्थाने संस्कृत, 'आर्ति' या शब्दापासून आरती हा शब्द आला असावा. आर्तता व्यक्त करणारे पद, गीत म्हणजे आरती असा अर्थ अधिक योग्य वाटतो. 'आर्ति' चा अर्थ वेदना, दु:ख, तळमळ,. व्याकूळता असा आहेच. 'आपन्नार्ति प्रशमन फला: संपदो हयुत्तमानाम् ।[६]' असा निर्वाळा संस्कृत कोशाने दिला आहे. या वेदनांचे कथन करणे, आत्मनिवेदन करणे, आणि त्यातून सुटकेची याचना करणे हे आरतीचे सर्वसामान्य स्वरूपही हाच अर्थ व्यक्त करते. तथापि आरतीत केवळ आर्तताच असते असे समर्थांच्या आरत्यांवरून तरी दिसत

नाही. तेथे जिवाशिवाचे ऐक्य आहे, स्तुतीही आहे, देवतांचे महत्त्वही वर्णिले आहे. सगुण रूपाचे ध्यान वर्णन, सौंदर्यवर्णनही आहे.

## आरत्यांचे कर्तेपण

'रामी रामदास' या नावाने जी कविता मिळते ती कदाचित श्रेष्ठांची असेल असे मानावे असे वाटण्याचा संभव आहे. कारण अनंतदास रामदासी यांनी 'पिंगळा' (किंवा 'सरवदा') हे वचन समर्थांचे मानून गाथेत[७] त्याचा समावेश केला आहे. गाथेत हे प्रकरण 'पिंगळा' या नावाने छापले आहे. गाथा अर्थात समर्थांच्या अभंगांचा-काव्यांचा आहे. 'पिंगळा' हा भविष्याची भाकणूक आहे. गाथेतील 'पिंगळा' फक्त बारा कवितांचा (कवितेचे जे भाग पाडले आहेत त्यातील एक भाग) असून त्यात भविष्यवाणी आहे. शेवट 'रामी रामदास' असाच आहे. परंतु देवांनीच प्रसिद्ध केलेल्या 'रामी रामदासांची कविता'[८] या ग्रंथात 'सरवदा' हे प्रकरण रामी रामदासांचे म्हणून छापले आहे. मात्र या 'सरवदा' प्रकरणात एकूणचाळीस कविता आहेत, आणि प्रारंभीच्या दोन व शेवटची एक अशा तीन कविता सोडल्यास हे प्रकरण रामदासी पिंगळ्याहून वेगळे आहे. परंतु त्यामुळे 'रामदास' आणि 'रामी रामदास' हे काही वेळा एकच व्यक्ती आहेत काय? असा प्रश्न त्यांच्या कवितांच्या आधारे पडतो. परंतु हा एक अपवाद सोडल्यास रामी रामदासांची कविता स्वतंत्र छापली गेली असल्याने आता जी कविता 'रामी रामदास' या नावाने मिळेल ती सर्व समर्थांचीच असे मानावे लागेल. 'रामी रामदासा फळला सद्भाव', 'रामी रामदास सहजी सहज ओवाळी', 'रामी रामदासा जिवलग भेटला' इ. आरत्यांतील भावविवशता, शब्दवैशिष्ट्य यांवरून या आरत्यांचे समर्थकृतित्वच स्पष्ट होते. भाव, शैली, विचार-पद्धती, शब्दयोजना यांच्या आधारेही या आरत्यांचे कर्तेपण श्री रामदासांच्याकडेच असल्याची खात्री पटते.

## वर्गीकरण आणि विषय

या सर्व एकूण ६१ आरत्यांचे विभाजन खालीलप्रमाणे आहे :–

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| श्री राम | १६ | श्री नृसिंह | १ | श्री अंबाबाई | १ |
| श्री हनुमान | ७ | श्री नागेश | १ | श्री वेदमाता सरस्वती | १ |
| श्री शंकर | ३ | श्री पांडुरंग | १ | श्री भगवती | १ |
| श्री केदार | १ | श्री व्यंकटेश | १ | कृष्णानदी | १ |
| श्री बहिरोबा | १ | श्री आत्माराम | १ | श्री गीता | १ |
| श्री विष्णू | २ | श्री ज्ञानेश्वर | १ | श्री क्षेत्रपाळ | १ |
| श्री दत्तात्रय | ३ | श्री सदगुरू | २ | | |
| श्री श्रीकृष्ण | १ | श्री संतमंडळ | १ | | |
| श्री सूर्य | १ | श्री शांता | २ | | |
| श्री गणपती | ३ | श्री महालक्ष्मी | १ | | |
| श्री देव | १ | श्री देवी | १ | | |
| श्री खंडोबा | १ | श्री अंबे | २ | | |
| | ४० | | १५ | | ६ |

यावरून आरत्यांच्या विषयीभूत देवता कोणत्या आहेत हे स्पष्ट होते. (१) देवताविषयक, (२) सद्गुरुविषयक, (३) संतविषयक, (४) नदीविषयक, (५) ब्रह्मविषयक व (६) ग्रंथविषयक.

## आरत्यांतील 'उदात्त' भाव

केवळ आदरणीय व्यक्तींच्या अथवा दैवतांच्या स्तुतीसंबंधीच आरती गाइली जाते, असे नाही. नदी अथवा ग्रंथाबद्दलचीही आरती गाइली जाते. दासबोधाची आरती, भगवत्‌गीतेची आरती, भागवताची आरती, महाभारताची आरती, रामायणाची आरती इ. आरत्या प्रसिद्ध आहेत. समर्थांनी भगवत् गीतेची आरती गाइली आहे. यावरून गीतेबद्दलचा त्यांच्या मनातील नितान्त आदर व्यक्त होतो. रामदासांनी कृष्णा नदीची आरती गायिली आहे. कृष्णाकाठ त्यांनी आपली कर्मभूमी बनविली होती.

सद्गुरुसंबंधीच्या दोन आरत्या आहेत. या दोन्ही आरत्यांत समर्थांनी आपला गुरू श्रीराम याचेच महत्त्व वर्णिले आहे. परंतु या आरत्यांत श्रीरामाचे सद्गुरू या नात्याने महत्त्व गाइले आहे, राम म्हणून नव्हे. त्यांचा गुरू श्रीराम असल्याचा स्पष्ट उल्लेख त्यांनी आरतीत केला आहे. ते म्हणतात, *'मंगलधामा रामा सद्गुरु निष्पापा'*[९]

श्रीराम हे गुरुराज आहेत, दयाघन आहेत, मुलांना आत्मस्वरूप दाखविणारे आहेत. दुसऱ्या आरतीत या सद्गुरूचा महिमा– *'न कळे ब्रह्मादिका अंत अनंता'*[१०] असे विश्वव्यापक विराट आत्म्याच्या रूपाने वर्णन करून गायिला आहे. 'रामी रामदासा फळला सद्भाव' अशी ग्वाही शेवटी दिली आहे.

परंतु 'श्रीराम' या सगुण देवतेवर समर्थांनी अठरा आरत्या लिहिल्या आहेत. शुद्ध सगुण रूपच या आरत्यांत विशेषत्वाने वर्णिले आहे, तरी राम हा आत्माराम असल्याचा, ब्रह्म असल्याचा भावही व्यक्त झाला आहे.

*'नेणति पार अपार प्रकाश तुमचा । अंत नाही अनंत प्रांत मायेचा । ब्रह्मादिकां न कळे जप तो शिवाचा ।'*[११]

असे व्यापक ब्रह्म म्हणजेच श्रीराम असेही मानले आहे. सगुण रूपात समर्थ रंगून जातात. श्रीरामाच्या शरीराचे वर्णन, त्याने ल्यालेल्या अलंकारांचे वर्णन वारंवार आलेले आहे.

*'किरीट कुंडले माला विराजे । झळझळ गंडस्थळ घननिळ तनु साजे । घंटा किंकिणा अंबर अभिनव गति साजे । अंदवाकी तोडर नुपुर ब्रिद गाजे ।'*[१२]

असे सालंकृत ध्यान त्यांनी मांडले आहे. राम 'सीतावर' असून 'शरयूतीरवासी' असल्याचेही मोठ्या अभिमानाने सांगितले आहे.

श्रीराम हे समर्थांचे परम आराध्य दैवत. त्या दैवतावर त्यांनी सर्वांत अधिक आरत्या लिहाव्यात यात आश्चर्य नाही. त्याचे सुंदर ध्यान त्यांनी नित्य केले आहे. त्याचा साक्षात्कार त्यांना झाला आहे. त्याच्या सगुण अलौकिक सौंदर्याने ते मोहित झाले आहेत. त्याचे महत्त्व त्यांनी ओळखले आहे. गायिले आहे. त्रिदश वैचारी हे त्याचे ब्रीद आहे. तो देवांना बंदीतून मुक्त करणारा आहे. परब्रह्माहून त्यांचा राम वेगळा नाही, याची जाणीवही त्यांना झाली आहे. भक्तांच्या कैवारासाठी सगुण रूपाने ब्रह्म अवतरले असल्याची त्यांची खात्री आहे. कसल्याच प्रकारची शंका त्यांच्या मनात राहिली नाही. इतकेच नव्हे, तर रामदाससुद्धा राममय झाले असल्याचा निर्वाळाही त्यांनी एका आरतीत दिला आहे. ते म्हणतात, *'राम आणि दास चैतन्य*

*पहुडले रामीं । हेही बोलावसायी दुजा न उरे धामीं ॥*[१३]

सगुण रामाच्या शेजारतीत त्यांनी रामाला निद्रेसाठी चलण्याची विनंती केली आहे. 'सुख शेजेसी चला रघुवीरा' अशी प्रार्थना केली आहे.

## भारतीय संस्कृतीचे दर्शन

समर्थांनी बारा वर्षे देशाटन केले, तीर्थयात्रा केल्या, देवतांची दर्शने घेतली त्या त्या देवतांच्या कार्याची स्तुती त्यांनी आपल्या अभंगांतून आणि आरत्यांतून केली आहे. वेदातही प्रत्यक्ष मूर्तिपूजा नसली तरी प्रतीकार्थाने मूर्तिपूजा होती असे दिसते. अग्नी हा प्रतीक आहे अथवा सर्व यज्ञदेवतांचे मुख आहे. इंद्र, उषा, ऋभ, त्वष्टा, बृहस्पती, मरुत, रुद्र, विष्णू, सरस्वती, सविता, सूर्य, सोम या सर्व देवता प्रतिमारूपानेच अस्तित्वात असाव्यात. त्यांचे जन्म कसे झाले यासंबंधीचे वर्णनही वेदात आढळते. उदाहरणार्थ सोम या देवतेचे वर्णन पहा : 'सोम हा वल्लीरूप असून, तो सुंदर वर्णाचा आहे, तो हिरवट, पिंगट रंगाचा आहे असेही म्हटले आहे.'[१४] पुढे भागवत पुराणाच्या काली मूर्तिपूजेला विशेष स्वरूप आले. महत्त्व आले. पुराणातील कथांच्या आधारानेच नंतर मूर्ती आणि मंदिरे निर्माण झाली आणि मग सगुणोपासनेने चांगलाच स्पष्ट आकार घेतला. सर्व समाजात मूर्तिपूजा निश्चित रूपाने सुरू झाली. काकड आरती, धूपारती, शेजारती, विडा, नैवेद्य, स्नान, अभिषेक, प्रार्थना, मंत्रपुष्प अशा अनेक उपचारांचा अंतर्भाव या उपासना पद्धतीत झाला. या उपासनेच्या द्वारेच उपास्य दैवतांच्या भिन्नतेवरून वैष्णव, शैव, स्मार्त, भागवत, गाणपत्य, शाक्त आदी भेद निर्माण झाले आणि आचारातही फरक पडला. तथापि भारताची संस्कृती म्हणून या सर्वांचे महत्त्व मानले गेले. संस्कृतीचा मूळ गाभा आस्तिक भावनेचा, धर्माचरण सत्याच्या शोधाचा, आध्यात्मिकतेचा, तो कायमच राहिला. भिन्न भिन्न देवतांची मंदिरे व मग त्या देवतांची आरती करताना त्यांची स्तुती, त्यांच्या कार्याचे महत्त्व वर्णन आणि प्रार्थना असा क्रम सांस्कृतिक कार्यक्रमात अंतर्भूत झाला. समर्थांनी या परंपरेला प्रमाण मानून विष्णू, शंकर, कृष्ण, नृसिंह, गणपती, खंडोबा, दत्तात्रेय, व्यंकटेश, विठोबा इ. सर्व देवतांच्या दर्शनाच्या वेळी त्यांच्या संबंधीच्या कथा प्रमाण मानून त्यांच्या कार्याच्या आधारे त्यांची स्तुती आरत्यांतून केली आहे.[१५/१६] हनुमतांच्या आरतीत[१७] रामायण कथेतील हनुमंताच्या कार्याचा गौरव, शंकराच्या[१८] आरतीत त्याचा विषकंठ, व्याघ्रांबर, गजचर्म धारण, फणीवर धारण, जटाजूट व गंगाधारण यांचा उल्लेख, गणपतीच्या आरतीत[१९] त्याच्या संकटनाशनाचा गौरव, उंदराच्या वाहनाचे वर्णन, हाती लाडू, मोदक, इ., खंडोबाच्या आरतीत[२०] त्याच्या मल्लांना मारल्याच्या शौर्याचे व त्याच्या लग्नप्रसंगी बाशिंग बांधल्याचा उल्लेख हे सर्व पूर्णपणे भारतीय संस्कृतीचे दर्शन घडवितात. आरती हा उपचार मुळातच संस्कृतीचा द्योतक आहे. प्रात:काळी स्नान, पूजाअर्चा आणि पूजाविधीत अंतर्भूत झालेली आरती, पुन: संध्याकाळी धूपारती, रात्री शेजारती, पहाटे उठताना काकडारती हा सर्व सांस्कृतिक विधी आहे. ज्या ज्या ठिकाणी मंदिरे आहेत तेथे-तेथे ही पद्धती आहे. मग देवळात पुजारी ब्राह्मण असो, गुरव असो, जंगम असो किंवा अन्य कोणी असो. यामुळे आरती वाङ्मयात संस्कृतीचे प्रतिबिंब पडले असल्यास नवल नाही.

## आर्तत्व

आरती रचणाऱ्या भक्त कवींसमोर सर्वशक्तिमान, सर्वसाक्षी, सच्चित्स्वरूपी दैवत आहे. त्या दैवताला अनन्यभावाने शरण जाऊन या भक्ताला स्वत:चा उद्धार करून घ्यावयाचा आहे. या शरणागतीमागे स्वत:च्या अनुभवाला आलेली अनंत दु:खे ईश्वराला कथन करावीत असाही हेतू दिसतो. आपण अत्यंत अज्ञानी, अविवेकी आहोत आणि इतरही अनेक न्यूनांचे अधिष्ठान आहोत, ही भूमिका स्वीकारून आरतीकारांनी जीव स्वरूप वर्णिले आहे. संसारग्रस्त जीवाची तळमळ व्यक्त करताना त्यात द्वैतभाव, अहंकार, अवगुण अशांचा खेदपूर्ण उल्लेख केलेला आहे. पुढे कृतकर्माची कबुली देऊन जन्ममरणाच्या फेऱ्यातून सोडविण्याची विनंती आहे. यावरून जीवस्वरूपाविषयीच्या आरतीतील विवेचनाची दिशा स्पष्ट होते.[२१] समर्थ रामदासांनी आपल्या जीवीचे आर्त आरत्यांतून प्रकट केले आहे. पण वर उल्लेखिलेल्या उताऱ्यातील विधानाप्रमाणे आपल्या कृतकर्माची कबुली देण्याचा प्रश्न समर्थांपुढे नव्हता. त्यांच्या जीवीचे आर्त स्वत:ला पापातून बाहेर काढण्याबद्दलचे नव्हते. त्यांच्या जीवनातील पावित्र्य स्पष्ट असल्याने त्यांना तसे उद्धार काढण्याची पाळी आली नाही. तथापि जीवाशिवाची भेट व्हावी, चरणी ठाव मिळावा, दर्शन व्हावे, आत्मारामाची भेट व्हावी, दास आणि राम यात भेद राहू नये, अभेद व्हावा हे आर्त निश्चितपणे होते. सगुण भक्तीत काय किंवा निर्गुण भक्तीत काय समर्थांच्या जीवीचे हे आर्त त्यांच्या आरती वाङ्मयात अधिक उत्कटतेने प्रकट होते. ईश्वराची भक्ती केली तरी तो ताबडतोब प्रसन्न होऊन दर्शन देतोच असे नाही. 'कृपाळूपणे अल्प धारिष्ट पाहे' या न्यायाने भक्ताची कसोटी तो पाहतो. भक्ताच्या अंत:करणात तळमळ उत्पन्न होते, प्रसंगी निराश होण्याचीही वेळ येते आणि उतावळेपणाने लवकर भेटण्याबद्दल भक्त प्रार्थना करीत असतो. ईश्वराच्या कृपेचा प्राथमिक अनुभव आल्याने भेटीची उत्सुकता अधिक वाटत राहते आणि दर्शन न झाल्यास दु:ख होते. आरती हा वाङ्मय प्रकार हा प्रमुखत: मनातले आर्त व्यक्त करण्यासाठीच असतो. मनातले आर्त भक्ताच्या भावनेने आपल्या दैवतापर्यंत पोचविण्याचे कार्य आरतीमध्ये प्रधान मानलेले असते. समर्थ रामदासांचे आर्तही आरत्यांतून वेळोवेळी प्रकट झाले आहे. ईश्वरदर्शनाची त्यांना ओढ लागली होती. त्यासाठी ते अशांत झाले होते. दैवत आपल्यावर रुसले तर नाही ना? अशी शंकाही त्यांनी व्यक्त केली आहे.

समर्थांच्या हृदयातील हे आर्त अनेक वेळा प्रकट झाले आहे :

(१) *दास म्हणे मी बुडतो काढि धरूनि हातां ।*[२२] (सद्गुरूची आरती)

(२) *रामी रामदासां आरतें ओवाळिलें ।*[२३] (सद्गुरूची आरती)

(३) *दास म्हणे ताराया दे सकृप वचना ।*[२४] (शंकराची आरती)

याप्रमाणे शंकराची, बहिरोबाची, दत्ताची, गणपतीची, पांडुरंगाची, महालक्ष्मीची, विष्णूची अशा सर्वच आरत्यांतून समर्थांच्या देवभेटीचे हे आर्त उत्कटपणे व्यक्त झाले आहे. भावनेची ही प्रखरता, भक्तीची ही उच्च पातळी, भावांचा असा भावुकपणा समर्थांच्या अंतरंगाची साक्ष पटवून देतो. नि:संशय ते अंत:करण उत्कट भक्ताचे आहे. यातील भाव-सबलता काव्याला आवश्यक असणाऱ्या उत्कट अवस्थेपर्यंत पोचली आहे यात शंका नाही. प्रपंच आणि परमार्थ या दोहोंना साधले पाहिजे असे आवर्जून सांगणारे समर्थ प्रपंचापासून स्वत: दूर राहिले आहेत आणि ही दूरता तशीच कायम राहावी, अशी त्यांची तीव्र मनीषा आहे. प्रपंचापासून स्वत:ला

दूर ठेवण्यासाठी ते प्रार्थना करीत आहेत– *"बाधोना मज किमपि प्रापंचिक हेवा । दास म्हणे हे बालक अपुल्या पदिं ठेवा ॥"*[२५]

समर्थांच्या या आर्ततेसंबंधाने डॉ. म. वि. गोखले आपल्या 'मराठी आरती' या ग्रंथात म्हणतात– *"दास रामाचा वाट पाहे सदना । संकटीं पावावे निर्वाणीं रक्षावे ।"*
या ओळी म्हणताना मनाला जाणवणारी आर्तता कित्येकांनी अनुभवली असेल.

या आर्ततेत रामदास केवळ स्वत:चाच उद्धार पाहात नाहीत. भवसागरात गटंगळ्या खाणाऱ्या जनांना हा भवसागर ओलंडून जाता यावा यासाठी तो सुलभ कर अशी ते प्रार्थना करतात.

## भावाविष्कार

गुरूबद्दल अतीव अभिमान आणि कृतज्ञता समर्थांनी आपल्या आरत्यांतून प्रकट केली आहे. संसारसागरात हेलकावे खाणाऱ्या जीवननौकेला एखाद्या दीपगृहाप्रमाणे योग्य मार्गावर आणण्याचे कार्य सद्गुरूला करायचे असते असे म्हणतात. पण या भक्तिमार्गात प्रत्यक्ष अनुभव मात्र वेगळा येतो. साधकावस्था संपवून आपली वाटचाल एका विशिष्ट टप्प्यापर्यंत आल्याशिवाय सद्गुरूच्या कृपेचा लाभ घडत नाही. भक्तिमार्गियांना परिचित असलेला हा विचार आरतीकारांच्या लेखनात त्याच पद्धतीने व्यक्त झाला आहे. भक्तिमार्गात सद्गुरूचे स्थान अढळ आहे. आरत्यांमध्ये या दृष्टीनेच विवेचन केलेले आढळते."[२६] हे विवेचन समर्थांच्या आरत्यांना बरोबर लागू पडते. 'सद्गुरूप्रसादें सुगम उपाय' अशी त्यांची खात्री पटली आहे. सद्गुरूला समर्थांनी 'माहेर' म्हटले आहे. या एका शब्दातच सद्गुरूविषयीच्या त्यांच्या भावना स्पष्ट होतात. निराळ्या स्पष्टीकरणाची आवश्यकताच राहत नाही.

**वीर आणि भयानक रस :** हनुमंताच्या आरत्यांत[२७] वीर आणि भयानक रसांचा उत्कट आविष्कार झाला आहे. उत्साह आणि भय या दोन्ही भावनांचे मिश्रण त्यात झाले आहे. उड्डाण करण्यापूर्वी हनुमानाने जो हुंकार भरला त्या हुंकारात केवढी तरी प्रचंड शक्ती होती. त्याचा प्रतिध्वनी पाताळापर्यंत पोचला, दुमदुमला, पर्वत कडाडिले, नक्षत्रांचा उच्छेद झाला. हनुमंताच्या या उत्साहामुळे भूमंडळ भयभीत झाले. भयाने डळमळू लागले, सिंधूचे जळही डचमळू लागले, सुरवर, नर, निशाचर यांची पळणा झाली– ते सैरावैरा पळू लागले. धरणीधर सुद्धा थरथरला. दुसऱ्या आरतीत[२८] हनुमंताच्या केवळ स्मरणाने कळिकाळ कापतो इतका धाक असल्याचा उल्लेख आहे. वीर आणि भयानक रसाचे हे प्रभावी वर्णन पुन: आपणास भीमरूपी स्तोत्रातही दिसून येते. हनुमंताचे सौम्यरूप समर्थांना अभिप्रेतच नसावे. सीतापहरणाची त्याला चीड असल्याने तो संतप्तच असणार. मारुतीच्या आरत्यांतून त्याचे हे वीर दर्शन आपणास घडते आणि अंत:करणावर परिणाम घडविते.

**शांतरस :** आरत्यांत शांतरसही प्रकट झाला आहे. ही शांतता पूर्णपणे आत्मिक आहे. शांतरसाचा आविष्कार आत्यंतिक पराकोटीला पोचल्याचे वर्णन समर्थांच्या आरत्यांतून दिसून येते. श्रीरामाच्या आरत्यांत तर रामाचे हे निर्गुण रूप-ब्रह्मरूप– त्यांना अभिप्रेत असल्याचे स्पष्ट दिसते. 'जयजया पूर्ण कामा आत्मया रामा' असे वर्णन पहिल्या कडव्यात दिसून येते.[२९] 'परमात्मा श्रीराम महामाया जानवी' असे वर्णन करून पुढे– *राम आणि दास चैतन्य पहुडलें रामां हेहि बोलावयासी दुजा न उरे धामां ।*[३०]

असे समर्थांचे रामाशी ऐक्य झाल्याचेही वर्णन आहे. हाच ऐक्याचा विचार

*माया कर्पुरीं आत्मा दीप प्रकटला, तेणे तेजें अवघा भंबाळ केला, तेथे रामदास दीपची जाला, लाहोणोळुनी आपेंआप निमाला ।*[३१]

दीपरूपाने रामदास आत्मारामाशी तद्रूप झाला– असा प्रकट केला आहे. 'तेथे राम रामचि जाला ।'[३२] रामदासांना शांतिलाभ झाल्याची ही वर्णने शांतरसाने परिपुष्ट झाली आहेत. वीर व भयानक रस सोडल्यास सर्व आरत्यांत शांत व भक्तिरसाचा परिपोष झाला आहे.

**हास्यरस :** आरतीत हास्यरसाला वाव कमीच असणार. परंतु दत्तात्रेयाच्या आरतीत समर्थ विनोदी झालेले दिसतात. अत्री ऋषींच्या आश्रमी अनसूयेचे सत्त्व पाहण्यासाठी त्रिदेव आले आणि तिच्या पातिव्रत्याच्या तेजाने ते तीन बालकांत रूपांतरित झाले. हा कथाभाग गृहीत धरून तीन देव तीन बाळे झाल्यानंतर अनूसयेने त्यांच्या बायकांना हाक मारली[३३] आणि आपआपला पती कोणता ते ओळखून घेऊन जाण्यास सांगितले. बालकरूपात पतीला ओळखण्याची पंचाईत पडली असणार हे उघड आहे. हा जो हास्यरसाचा प्रसंग आहे तो समर्थांच्या कल्पकतेचा द्योतक तर आहेच, पण नसत्या भानगडीत पडल्यानंतर देवसुद्धा असे फजित पावतात, हेही सूक्ष्मपणे सूचित केले आहे.

**भक्तिरस :** भक्तिरसाने ओथंबून जाणे हा आरतीचा गुणविशेषच असतो. ते एक भक्तिगीतच असते. आरतीच्या प्रत्येक अवयवात भक्तिरस सामावलेला असतो. आत्मनिवेदनानंतर ईश्वरचरणी संपूर्ण शरणागती हाच आरतीचा भाव विशेष.

'आता नामें गाईन ही तुमची सेवा'[३४] किंवा 'दास म्हणवोनी ध्याती अंतरीं'[३५] अशासारख्या भक्तियुक्त अंतःकरणाने केलेला धावा प्रत्येक आरतीत प्रकट झालेला आहे.

**करुणरस :** आरतीचा अर्थ सांगत असता आणि आरतीतील आर्त या शीर्षकाखाली आर्ततेचे वर्णन आले आहे. कारुण्यपूर्ण स्वरात स्वतःचे आर्त प्रकट करून धावा करावयाचा हा करुणरस आरतीच्या प्रत्येक चरणात असतो. डॉ. म. वि. गोखले यांनी आरत्यांच्या भावसौंदर्याबद्दल उद्गार काढले आहेत. ते समर्थांच्या आरत्यांनाही यथातथ्य लागू पडतात. ते म्हणतात, "आरत्यांचे स्वरूप बाह्यतः मनोहर तसेच अंतरंग पाहिल्यास ते पूज्यपूजक संबंधाचे साक्षात् दर्शन घडविणारे सरस काव्य ठरेल. इतकी त्यांची योग्यता आहे."[३६] समर्थांच्या आरत्या उत्कट रसांनी परिपूर्ण आहेत असाच भाव येथे प्रकट होतो, असे मानावयास प्रत्यवाय नसावा.

**भाषाशैली :** समर्थांच्या भाषेत एक प्रकारचा आत्मविश्वास आहे. त्यांची भाषा स्वयंभू आहे. शब्दांची त्यांना कधीच उणीव पडत नाही. त्यांनी योजलेला प्रत्येक शब्द चपखलपणे आपल्या स्थानी बसलेला आहे. त्यांच्या शब्दयोजनेत शब्दचित्राचे कौशल्य व परिणामकारकता दिसून येते. सगुणरूपाचे वर्णन करताना समर्थ प्रत्यक्ष त्या दर्शनात रंगून गेल्याचे दिसून येते. 'सहजी सहज ओवाळोत' अथवा 'सबाह्य अभ्यंतरी अवघा निघोर दीपक असून राम आणि दास चैतन्य रामीं पहुडले'ले असोत, अथवा 'रामी रामदासी समाधी' लागलेली असो किंवा 'रघुकुळटिळकदास पदरज त्या लाभे' अशी आत्मसाक्षात्कारानंतरची संतुष्ट अवस्था असो. त्या-त्या अवस्थेचे वर्णन त्यांनी अगदी यथार्थ केलेले आहे. आरतीच्या उपचाराच्या भाषेत तर 'ज्वाळेचा कर्पुराचा भंबळ' उठला आहे. वाद्ये, घोष, टाळी वाजे, धूसर उधळे, नाना वाद्ये एकवेळा गर्जना झाली– अशा तऱ्हेचे प्रभावी व उचितार्थ द्योतक शब्द उपयोजिलेले दिसतात. त्यांच्या वाक्यरचनेत ओघ आहे, कोठेही कृत्रिमता आढळत नाही. त्यांच्या भाषेमुळेच देवतांच्या

चरित्रातील प्रसंगांची वर्णने, भुतेखेते पळवून लावणे, राक्षसांना मारणे, भक्तांना वाचविणे इ. वर्णने अत्यंत परिणामकारक झाली आहेत. वाक्यांची सोपी, सुटसुटीत रचना, योग्य त्या जिवंत शब्दांचा उपयोग, रसपूर्ण वर्णनशैली, प्रचीती उत्पन्न करणारी जीव-शिवाच्या ऐक्याची वर्णने, प्रसाद व ओज गुणांनी युक्त अशी संपन्न भाषा समर्थांनी रचिलेल्या आरत्यांची आहे. मराठीच्या संपन्नतेत समर्थांनी घातलेली ही एक अलौकिक भर आहे, असे म्हणावेसे वाटते. रामदासांची भाषा कुठे टप्पे घेत उडणाऱ्या चेंडूप्रमाणे आहे, तर कुठे कुठे सोंडेत दणकट साखळदंड धरून दणादण आपटणाऱ्या हत्तीचा अवखळपणा तिच्यात आहे व प्रसंगी वीणाधारिणीच्या करांगुळीतील कोमलताही तिच्यात आहे.

## अलंकार

समर्थांच्या आरत्यांतून अलंकारांचाही उपयोग कौशल्याने केल्याचे दिसून येते. रूपकांचा उपयोग आध्यात्मिक एकता दर्शविण्यासाठी केला आहे. 'त्रिगुण' रूपांचा काकडा द्वैतरूपी तुपात भिजविला, त्या दीपकाची काजळी म्हणजे तमोगुण अशा रूपकांच्या आधारे आध्यात्मिक अवस्थेचे वर्णन केले आहे. 'ऐक्याचे सुमन शेजे' आत्मा रघुपति पहुडला आहे. 'धर्म, अर्थ, काम, मोक्ष पहा मंचक प्रत्यक्ष' असे चार पाय असलेल्या मंचकाचे वर्णन आहे. धर्म अर्थादी चार पुरुषार्थांचे खूर (पाय) असणारा हा मंचक ही कल्पना किती हृद्य आहे? येथे दीपक कोणता? तर माया कर्पुरी आत्मादीप प्रगटला । असे कितीतरी अलंकार उदाहरणादाखल देणे शक्य आहे. अनुप्रासांचा वापर तर कित्येक आरत्यांत सहजपणे झाला आहे.

## तत्त्वज्ञान

आरत्यांतून व्यक्त झालेले तत्त्वज्ञान वेगळे नाही. परंपरागतच आहे. परब्रह्म एक आहे, ते अविनाशी आहे. अकर्ता, अभोक्ता, सत्-चित्-आनंदमय आहे. मायेच्या उपाधीमुळे सृष्टीची रचना झाली. मायेच्याच उपाधीमुळे तेच निर्गुण ब्रह्म सगुण बनते, आणि भिन्न देवतांच्या अवतारांच्या द्वारे जगातील सज्जनांचे संरक्षण व दुर्जनांचा संहार करते. राम, कृष्ण, विष्णू, नृसिंह, दत्तात्रय, खंडोबा, गणपती, अंबा, शांता इ. सर्व अवतार आहेत. पण या सर्व देवता मूलतः परब्रह्मच होत. सगुणरूपाच्या आधारेच निर्गुणाची ओळख होते. आत्मासाक्षात्कारानंतर द्वैत राहात नाही. जीव व शिव यांचे ऐक्य घडविणे हा मनुष्यजन्माचा हेतू आहे. त्यासाठी चित्तशुद्धी करावी लागते. चित्तशुद्धीसाठी नीती व स्वधर्म यांचे आचरण व भक्तिभावना आवश्यक असते. सगुणभक्ती हा सोपा उपाय आहे. तो श्रेष्ठही आहे. देवतांची स्तुती करून भक्ताने आत्मनिवेदन करावयाचे, आर्ततेने धावा करावयाचा म्हणजे ईश्वर प्रकट होतो व संकटातून सोडवितो. हेच तत्त्वज्ञान आरत्यांतून व्यक्त झाले आहे.

## गेयता

आरत्यांचा छंद सामान्यपणे 'परिलीना'जाती असतो. परंतु समर्थांच्या आरत्या उत्स्फूर्त असल्याने अक्षरांचे वा मात्रांचे बंधन पाळलेले फारसे दिसून येत नाही. परंतु हे विधान आरती म्हणण्याच्या धाटणीमुळे चुकीचेही ठरण्याची शक्यता आहे. उदा. *किरीट कुंडले माला विराजे ।*

*झळझळ गंडस्थळ घननिळतनु साजे* ॥ या ओळींतून *किरीट कुंडलेऽमालाऽवीऽराजे* ॥ असे उच्चारण केल्यास मात्रादोष राहात नाही.

## निष्कर्ष

समर्थांच्या काव्यशक्तीचा परिचय वरील विवेचनावरून होईल. डॉ. गोखले यांच्या शब्दात या विवेचनाचा शेवट करणे उचित होईल. "समर्थांच्या आरत्या विविध विषयावरील आहेत, विपुल आहेत, आणि लोकप्रियही आहेत. शब्दांच्या मर्यादा त्यांना कधीच जाणवल्या नाहीत, असे त्यांच्या आरत्या वाचून वारंवार मनात येते. सुखकर्ता, दु:खहर्ता, लवथवती अशा त्यांच्या आरत्यांनी लोकप्रियतेची सीमा गाठली आहे. परंतु त्यांची श्रीरामाची शेजारती वाचून मन चकित होते... आरती रचनेत आशय आणि अभिव्यक्ती या दोन्ही दृष्टींनी रामदास हे श्रेष्ठ कवी आहेत."[३७] महाराष्ट्र कवी यशवंतांची साक्षही मुद्दाम द्यावीशी वाटते– "रामदासस्वामींजवळ केवळ भावभक्तीच नव्हती. तिच्या जोडीला कलाविलास होता, कवित्व करणारा मतिप्रकाश होता व ज्यायोगे 'श्रवणी रस तुंबळे' असा वाग्विलास त्यांना साध्य होता"[३८]

# रामदासांचे स्तोत्र-वाङ्मय

## स्तोत्र: शब्दार्थ, उत्पत्ती आणि विकास

'स्तोत्र' हा शब्द 'स्तु' (स्तूयते) या संस्कृत धातूपासून बनलेला आहे. स्तु म्हणजे स्तवन करणे, वर्णन, प्रशंसा, वाखाणणी, स्वरूपकथन अथवा गुणवर्णन करणे. अर्थात स्तोत्र म्हणजे ज्यात स्तुती केली जाते अशी रचना अथवा काव्य. काव्य म्हणण्याचे कारण असे की स्तोत्रे ही बहुधा पद्यमयच असतात. गेय असतात. येथे काव्य याचा अर्थ पद्य असाच घ्यावयाला पाहिजे. स्तोत्राची परिभाषा (व्याख्या) सांगणारे संस्कृतातील रूढ वाक्य असे आहे. '*प्रतिगीत मंत्रसाध्यं स्तोत्रम्* ।' (कोणत्याही देवतेचे छंदोबद्ध स्वरूपकथन अथवा गुणसंकीर्तन अथवा स्तवन, स्तोत्र होय). सायणाचार्यांनी स्तोत्राला साममंत्र म्हटले आहे. यावरून स्तोत्र हे त्या काळी तरी संगीतात्मक, गेय, छंदोबद्ध असावे, याबद्दल शंका राहात नाही. वेदात स्तोम हा शब्दही स्तोत्र या अर्थानेच आलेला दिसतो. ऋग्वेद आणि सामवेद यांतील काही सामूहिक ऋचांना 'स्तोत्रिया' ही संज्ञा होती.

स्तोत्रात प्रथम काही मागणे नसे किंवा उपदेशात्मकता नसे. देवतेची निर्भेळ स्तुती भक्तिपूर्वक करणे हाच हेतू असे. पुढे पुढे 'भज गोविन्दम्' सारख्या स्तोत्रात उपदेशही केलेला आढळतो. नंतरच्या विकासात स्तुती, देवतेचे आवाहन, मानसपूजा, प्रार्थना आणि वरप्रसादाची मागणी यांचाही समावेश झाल्याने स्तोत्रे ही काव्यस्वरूपाची झाली. पण त्यांतील प्रार्थना काव्य असली तरी ती सात्त्विक मागणी होती. तामस अथवा राजस इच्छापूर्तीसाठी याचना नव्हती आणि मग हळूहळू तामस इच्छांच्या पूर्तीसाठीसुद्धा स्तुतिस्तोत्रे गायिली जाऊ लागली. वास्तविक स्तोत्र ही भक्तियुक्त अंत:करणाने केलेली देवतेची स्तुती होय आणि हेतू असलाच तर ईश्वराची प्राप्ती हाच. व्यक्तिगत दु:खे दूर करण्यासाठी अथवा काही सौख्यलाभ होण्यासाठी, संकटांचे निवारण होण्यासाठी अलौकिक शक्तीची स्तुती करून तिला प्रसन्न करणे हे स्तोत्रांनी नंतर

धारण केलेले स्वरूप होय. स्तोत्र काव्यामध्ये कवी भक्तिभावाने उपास्य दैवताच्या माहात्म्याचे वर्णन करीत, आपल्या हृदयातील कोमल भावना व उदात्त स्वरूपाच्या प्रार्थना व्यक्त करीत असतात.

भारतीय प्राचीन ग्रंथांत आरंभी श्री गणेशस्तुती व वंदन करण्याचा प्रघात आहे. नंतर देवतांची स्तुती आणि नमन असते. ग्रंथ निर्विघ्नपणे शेवटपर्यंत पूर्ण व्हावा हीच अपेक्षायुक्त प्रार्थना असते.

## स्तोत्रातील भाव

भक्ताचे चार प्रकार गीतेत सांगितले आहेत. आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी आणि ज्ञानी. स्तोत्रे गाणारा भक्तसुद्धा चार प्रकारचा असू शकेल. अज्ञ, मुमुक्षु, साधक आणि सिद्ध. आर्त भक्तच विशेषत: आपली आर्तता दूर करण्यासाठी देवतांची स्तुती करील. मग ती आर्तता कसलीहीं असो. कदाचित सर्व राष्ट्रावर ओढविलेली आपत्ती असू शकेल. आर्त आणि अर्थार्थी यांत फारसा भेद करण्याचे कारण नाही. कारण त्यांची भक्ती कामिक असते. काम्य भक्तीचे हीनत्व कितीही मान्य केले तरी काम्य कर्मे सर्वथा त्याज्य आहेत असे म्हणता येणार नाही. समर्थांनीही 'तुझा तू वाढवी राजा' अशी प्रार्थना देवाच्या स्तोत्रात केलीच आहे. ही आर्तता होय आणि अर्थार्थ भक्ती सुद्धा होय. जिज्ञासू भक्त हा सद्गुरूची स्तुतिस्तोत्रे गाईल. कारण त्याला ज्ञानाची उत्सुकता असते. याला अर्थार्थीही म्हणता येईल. ज्ञानी भक्त हा ईश्वराची स्तुती गाईल. सगुण अथवा निर्गुण त्याला जसा साक्षात्कार झाला असेल तसे वर्णन तो करील. जरी निर्गुण ब्रह्माचे ज्ञान त्याला झाले असले तरी तो सगुणाची स्तोत्रे गाईल. शंकराचार्यांची स्तोत्रे प्रसिद्ध आहेत. त्याचप्रमाणे रामदासांनीही सगुणाची स्तोत्रे गायिली आहेतच. ज्ञानोत्तर कर्मे करावीत– लोकांकरिता करावीत. त्यामध्ये स्तोत्रे गाणे हे ज्ञानोत्तर भक्तीचे कर्मच होय.

## रचना-स्वरूप

स्तोत्रांचे स्वरूप निश्चित करताना एक गोष्ट ध्यानात येते. काही स्तोत्रांच्या (विशेषत: वैदिक) आरंभी स्तोत्राची देवता, छंद, इत्यादिकांचा उल्लेख असतो. त्यानंतर न्यास (करतलन्यास इ.) नंतर प्रत्यक्ष स्तोत्र. यांत देवतेचे चरित्रवर्णन, देवतेचे रूपवर्णन, स्तुती, जयजयकार, पूजा, ध्यान, प्रार्थना इ. प्रकार असतात. नंतर फलश्रुती सांगितलेली असते. वैदिक स्तोत्रांचा पाठ या देवता, छंद, ऋषींचा उल्लेख केल्याशिवाय अथवा न्यास केल्याशिवाय आणि शेवटची फलश्रुती म्हटल्याशिवाय करावयाचा नसतो. परंतु पौराणिक स्तोत्रांत ऋषी, छंद, न्यास आदींचा उल्लेख सहसा नसतो. श्री शंकराचार्यांनी जी स्तोत्ररचना केली आहे त्यात फलश्रुती कधी कधी असते, पण न्यासादी उल्लेख नसतो. मराठीतील स्तोत्रात न्यास नसतोच.

फलश्रुती न सांगताही स्तोत्ररचना केलेली आढळते. भक्ताने गाइलेली-केलेली गुरूची व देवतेची स्तुती एवढेच स्तोत्राचे स्वरूप असू शकेल. म्हणजेच स्तोत्रात स्तुती असली पाहिजे आणि वंदनही. स्तोत्रे सात्त्विक, राजस, तामसही असू शकतात. दुष्टांचा संहार करण्यासाठी गाइलेली स्तोत्रे राजस म्हणता येतील. दुसऱ्याचा घात करण्यासाठी व स्वार्थ साधण्यासाठी रचलेली स्तोत्रे तामस म्हणता येतील आणि केवळ स्तुती अथवा मोक्षप्राप्तीसाठी प्रार्थना अथवा भक्तिभावना दृढ होण्यासाठी अथवा साक्षात्कारामुळे देवतेच्या सौंदर्याचे वर्णन इ. ने युक्त

स्तोत्रे सात्त्विक म्हटली पाहिजेत. तथापि करुणाष्टके ही करुणस्तोत्रांत समाविष्ट केली आहेत, म्हणून येथेही त्या रामदासांच्या रचनांचे खालीलप्रमाणे भाग पाडले आहेत.

(१) स्तोत्र वाङ्मय– स्तुती आणि प्रार्थनेने युक्त, केवळ स्तुती

(२) धावा– संकटातून मुक्त करण्यासाठी प्रार्थना. यात करुणाष्टकांचा समावेश केला आहे.

(३) केवळ वंदन अथवा नमन– रामदासांनी रचलेल्या स्तोत्रांची सूची खालीलप्रमाणे होऊ शकेल.

भीमरूपी स्तोत्रे–देवीची स्तोत्रे–गणपतीची स्तोत्रे–रामाची स्तोत्रे–परशुराम–शंकर–विष्णू–नृसिंह–रामकृष्ण निर्गुण स्तोत्र–सूर्यस्तोत्र–करुणास्तोत्रे

## भीमरूपी स्तोत्राची रसवत्ता

भीमरूपी स्तोत्रांची हनुमानाच्या पराक्रमाची वर्णने करणारी आहेत. विशेषतः हनुमानाच्या जीवनात ज्या महत्त्वाच्या घटना घडल्या त्यांचा अभिमानपूर्वक उल्लेख या स्तोत्रांतून झालेला आहे. सर्वच स्तोत्रांना 'भीमरूपी' हे नाव पडले आहे. कारण ती हनुमानाची-वीर हनुमानाची-बलभीमाची स्तोत्रे आहेत. तथापि 'भीमरूपी महारुद्रा वज्र हनुमान मारुती' या स्तोत्राच्या आरंभाचा शब्द 'भीमरूपी' आहे, त्यावरून सर्वच स्तोत्रे भीमरूपी झाली.

'भीमरूपी' या नावावरूनच हनुमानाचे केवळ रामाच्या सेवकाचे रूप रामदासांना मान्य नसावे. कारण भीमरूपी सर्व स्तोत्रे मारुतीच्या पराक्रमाचे वर्णन करणारी आहेत.

रामदासांनी रचलेले आणखी एक भीमरूपी स्तोत्र– 'कोपला रुद्र जे काळीं' हे स्तोत्र श्री विनायक महाराज मसूरकरांनी अधिक लोकप्रिय केले. या स्तोत्रात क्रुद्ध झालेल्या हनुमानाचे वर्णन-रौद्रवर्णन केले आहे. हे सर्व वर्णन शब्दचित्रात्मक आहे.

हनुमानाच्या वीरश्रीचे, क्रोधयुक्त मुद्रेचे, त्या वेळच्या त्याच्या आवेशयुक्त हावभावाचे वर्णन इतके बोलके आहे की जणू काय हनुमानाचे ते अक्राळविक्राळ रूप आपण प्रत्यक्ष पाहत आहोत. चित्रमय प्रतिमा निर्माण करण्याचे रामदासांचे कौशल्य या सर्व स्तोत्रांत अतिशय उत्कृष्टपणे दिसून येते.

**रचना-हेतू :** 'कोपला रुद्र जे काळां' या स्तोत्राच्या शेवटी असा उल्लेख आहे– 'धर्म स्थापनेसाठी । दास तो ऊठिला बळे' येथे धर्मस्थापनेचे कार्य करण्यासाठीच रामदास सर्व शक्तिनिशी उठले आहेत, असे स्पष्ट म्हटले आहे. रामदासांच्या सर्व जीवितकार्याचे हे सूत्र आहे, असे दिसते. 'अंजनीसुत प्रचंड' या स्तोत्रात लंका जिंकल्याचा आनंद व्यक्त झाला आहे. 'सुरारि काळ क्षोभला । त्रिकूट जिंकिला भला ।' यावरून रावणाच्या अन्यायाची किती चीड रामदासांना आली होती, यावर प्रकाश पडतो. 'शक्ति शोधिली बळेंचि', 'अगणित गणवेना शक्ति काळासि हारी', 'महारुद्र तैसा विभांडी त्रिकुटा', या सर्वांवरून असा निष्कर्ष निघतो की धर्मस्थापना, अन्यायाचा प्रतिकार करण्यासाठी रामराज्याची स्थापना व त्यासाठी बलोपासना हा उद्देश रामदासांच्या स्तोत्ररचनेमागे दिसतो. इतकेच नव्हे, तर 'समरांगणावर उदंड पाठ' देण्यासाठी मारुतीचा ताईत दंडावर बांधण्यास किंवा गळ्यात बांधण्यास ते सांगत आहेत, यावरून राजकारणाशी समर्थांचा अगदीच संबंध नव्हता, असे म्हणता यावयाचे नाही.

**छंद आणि भावार्थ :** ही स्तोत्रे वेगवेगळ्या वृत्तांत लिहिलेली आहेत. उदा. अनुष्टुभ,

मालिनी, चामर, भुजंगप्रयात, द्रुतविलंबित वगैरे.

भीमरूपी स्तोत्रांतील रामदासांची भाषा त्यांतील रौद्र आणि वीर रसाला पोषक अशीच आहे. हनुमानाचे बालरूप 'बाळ लोंबाळ गोजिरे' या शब्दांनी व्यक्त केले आहे. मऊ लुसलुशीतपणाला 'लोंबाळ' या शब्द मराठीला नवीन वाटतो. त्याच्या शेपटीचे वर्णनही 'लांगुळ लळलळीतसे' या शब्दानी केले आहे. याशिवाय दुसऱ्या कोणत्याही शब्दांनी हा अर्थ औचित्याने व्यक्त झाला असता, असे वाटत नाही. त्याच्या धावण्याचे वर्णनही 'पवनासारखा धावे' असे करून पुढे 'वावरे विवरे बहु' या शब्दांनी दऱ्याखोरी ही ठिकाणे व्यक्त करण्यात 'पवनासारखा' या उपमेला सार्थकत्व प्राप्त झाले आहे. हनुमानाच्या कोपाचे वर्णन 'कोपला रुद्र' या स्तोत्रात किती योग्य भाषेत केले आहे, हे खालील उदाहरणावरून दिसून येईल. हनुमान क्रोधाने लाल झाला, त्या वेळी त्याच्या डोळ्याचे वर्णन एका उपमेने केले आहे, ते डोळे मार्तंडमंडळाप्रमाणे होते, एकाच सूर्यासारखे नव्हे, तर सूर्यमंडळासारखे. ते दोन्ही नेत्र पिंगाक्षच (तापलेले लाल) जणू. दाढांचे करकरणे, रोमांच उभे राहणे, अद्भुत अशा गर्जना-हुंकार करताच मेघ देखील वोळावेत एवढा आवेश! आणि हनुमानाने आपले शरीर विशाल बनविले ते केवढे? तर ब्रह्मांडाहून मोठे, स्थूल, उंच, भयानक असे आणि त्याने आपली पावले शून्य मंडळापर्यंत भिडविली. हे सर्व स्तोत्रच रामदासांच्या शब्दशक्तीची आणि भाषेच्या सामर्थ्याची प्रचीती देण्यास पुरे आहे.

'हनुमंता रामदूता' या स्तोत्रात हनुमंताला आवाहन करून प्रार्थना करावयाची असल्याने कितीतरी परींनी त्याला आळविले आहे. हनुमंता, रामदूता, वायुपुत्रा, महाबळी, ब्रह्मचारी, कपीनाथा, विश्वंभरा, जगत्पते, दानवारी, कामांतका, शोकहारी, दयानिधे, महारुद्रा, मुख्यप्राणा, कुळमूर्ति, पुरातना, वज्रदेही, शोकहारी, भीमरूपी, प्रभंजना, या विशेषणांनी आळवूनही जणू रामदासांची तृप्ती झाली नाही. म्हणून 'स्थितिरूपे तूंचि विष्णू', 'संहारका', 'पशुपते', 'परात्पर स्वयंज्योती', 'नामरूपा', 'गुणातीता' ही सात विशेषणे लावून त्यांनाच विशेषनामांचे रूप दिले आहे आणि तरीही मन अतृप्त राहिले. म्हणून 'सांगता वर्णिता येता, वेदशास्त्रा मंडे ठका (मौन)' अशी शरणागती द्यावी लागली. पण ही शरणागती भाषेबद्दल नसून हनुमानाचे रूपच एवढे विशाल आहे की, भाषा त्यापुढे लंगडीच पडावी. भाषेला अमूकच वळण देऊन रचना करावी ही भाषा रामदासांच्या रचनेच्या बाबतीत बरोबर नाही. त्यांच्या मनातील भाव हे इतके प्रबळ होतात की, त्यामुळे भाषा आपोआपच त्या भावांना अनुसरते आणि ती स्वतःचे शब्दरूप घेऊन येते. मग ते शब्दरूप साहित्यातील रूढ भाषेहून किती का वेगळे असेना! रामदास त्याची क्षिती बाळगत नाहीत. उलट असे म्हणता येते की त्यामुळे रामदासांचा भाषाविशेष म्हणून स्वतंत्रपणा दाखविता येतो.

ते जे शब्द वापरतात ते शब्द नव्यानेच येत असल्याने किंवा त्यांच्या पूर्वसूरींनी ते शब्द वापरले असल्यास त्या शब्दांची नवी रूपे रामदासांनी बनविल्याने मराठी भाषेला समृद्ध बनविण्याचे श्रेय रामदासांना निश्चितपणे मिळते. वनारी, भ्रूकुटी त्राटिल्या, ठकारे पर्वता ऐसा, धगधगीतसी कळा, करील आटधाट तो, सुवर्ण कटुकास, वेदशास्त्रा पडे ठका, तुजचि अलगराया, हितकांटा पैसला, नडगडी, धूटधूट, धसास, हस्तार, दैत्यभार, उलंडलेचि भंडसे, किल्लाळ, दुपटत कपि झोके, झडझडाट, कडकडाट, जेठी, तळाथें (तळापासून), उदारी, ठाण वगैरे हे सारे शब्द रामदासी आहेत, याची जाणीव अधिक अभिमान उत्पन्न करते. प्रार्थना करताना अत्यंत नम्रता व दास्यत्वाची भावना व्यक्त व्हावी तर वीर-रौद्र रसांच्या वर्णनात

अत्यंत दुर्बल माणसाच्या मनातही उत्साहाचे उधाण यावे एवढी रामदासांची भाषा प्रभावी आहे. भक्तीच्या रसात डुंबून जात असता शांत रसात शब्द बुडवूनच आणले आहेत, असे वाटते. संसारासंबंधी अप्रीती उत्पन्न करावयाची असते, त्या वेळी त्याची किळस यावी इतक्या परिणामकारक शब्दांची ते योजना करतात. रामदासांच्या स्तोत्रांत भाषेचा हा गुण प्रकट झाला आहे, असे नाही, तर त्यांच्या सर्वच वाङ्मयात हा गुण उत्कृष्टपणे प्रत्ययाला येतो,

**अलंकार :** 'कोपला रुद्र जें काळीं' या स्तोत्रात 'मार्तंड मंडळा ऐसे दोन्ही पिंगाक्ष' ही नेत्रांना दिलेली सूर्यमंडळाची उपमा रौद्ररूपी हनुमानाच्या वर्णनात उचितच आहे. 'नेत्राग्नी चालिल्या ज्वाळा' हे रूपकही अतिशयोक्त असूनही तितकेच उचित आहे. हनुमानाचे अणूपासून ब्रह्मांडाएवढे होत जाणे सार अलंकाराचे चांगले उदाहरण आहे– *अणूपासूनि ब्रह्मांड एवढा होत जातसे । तयासी तुळणा कोठें, मेरू मंदार धाकुटें । ब्रह्मांडा भोंवते वेढे वज्रपुच्छे करूं शके । तयासी तूळणा कैची ब्रह्मांडी पाहता नसे ।।*[३९]

अनुप्रासांचा उपयोग तर ठिकठिकाणी पाहायला मिळतो आणि हे अनुप्रास कृत्रिम रीतीने आणले नसून सहज ओघवती भाषेत आपोआपच निर्माण झाले आहेत. 'लांगूळ लळलळीतसे', 'बाळभोवाळ', 'खडीखारी', 'पाळणेंच परोपरी', अशी कितीतरी उदाहरणे देता येतील. भीमरूपी स्तोत्रातील दोन स्तोत्रांना मंत्रत्व प्राप्त झाले आहे. नित्यनियमाने त्यांचे पठण केले तर त्याने निर्देशिलेली फलश्रुती प्रत्ययाला येते, असे म्हणतात. धर्मप्रसाराबरोबरच संस्कृति-प्रसाराचे कार्यही रामदासांच्या स्तोत्रांनी (आणि आरत्यांनीही) निश्चितपणे केले आहे.

## देवीची स्तोत्रे

देवीच्या स्तोत्रात शारदादेवीची दोन, विश्वमाता भवानीचे एक आणि तुळजाभवानीची दहा स्तोत्रे आहेत.

**शारदादेवीची स्तोत्रे :** शारदादेवीच्या एका स्तोत्रात शारदेला कुमारी शारदादेवी असे म्हटले आहे'[४०] ती गानदेवता असल्याचेही म्हटले आहे. 'सुंदरा गायनीकळा, हंसासना, चतुर्भुजा, वीणा-पुस्तक धारिणी, ब्रह्मसुता,' असे तिचे वर्णन आहे. 'वेदमाता' या नावाने तिचा गौरव केला आहे. हे सर्व वर्णन परंपरेप्रमाणे वाटण्याचा संभव आहे. परंतु या स्तोत्रातील महत्त्वाचा भाग म्हणजे 'शारदा' या शब्दाचा अर्थ सांगून तिचे स्वरूप-वर्णन केले आहे. ते परंपरेहून कितीतरी वेगळे आहे.

*जाणीव म्हणजे देव्या । जाणता देव बोलिजे । सीवशक्ती रत्नजोती । वेगळी करिता नये ।। सीवशक्ती बहुरूपी । नामरूपीं विलासते । दिसते नासते काया । माया ते अंतरी वसे ।।*[४१]

देवीची व्याख्याच मुळी अशी केली आहे की जी जी जाणीव म्हणून आहे ती ती देवी, म्हणून देवी या शब्दाचे अनेकवचन वापरून म्हटले आहे– 'जाणीव म्हणजे देव्या' आणि मग अर्थातच 'देव' कोण तेही सांगितले गेले. 'जाणता देव बोलिजे' जाणतेपणाचा अर्थच देव. कोणत्याही अलंकाराचा उपयोग न करता देवी आणि देव यांचे स्वरूप परंपरेहून किती वेगळेपणाने रामदासांना अभिप्रेत होते ते स्पष्ट होते. जनतेत जागृती निर्माण करण्यासाठी सर्व व्यक्तिमात्राच्या ठिकाणी देवत्व आहे. ही चेतना त्यांना निर्माण करावयाची होती म्हणून त्यांना स्वत:ला प्रतीत झालेले शारदेचे जाणीवरूपी रूप या स्तोत्रात प्रकट केले. रामदासांचे हे वैशिष्ट्य आहे. इतर कोठल्याही संत कवीत ही सूक्ष्म आणि लोकव्यापक दृष्टी दिसून येत नाही.

**भवानीची स्तोत्रे :** 'विश्वमाता भवानी'चे एक स्तोत्र फक्त पाच श्लोकांचे आहे. हे स्तोत्र 'भुजंगप्रयात' वृत्तात आहे. या स्तोत्रात विश्वमातेचे वैभव वर्णन करून तिला भजण्याविषयी रामदास आवाहन करीत आहेत. हिरे, माणके, सुवर्ण यांचे अलंकार सर्व काल्पनिक असले तरी रामदासांचे कल्पनावैभवही त्यात व्यक्त होते.

*हिरे पाच गोमेद वैडूर्य मोती । प्रवाळे निळें माणिकें ढाळ देती । मणी हेमलंकार भांगार खाणी । जवादा धुवे कस्तुरी चारू गंधे । फुले केशरें धूशरें ते सुगंधे । सिबीकेवरी दिव्य छत्रे विचित्रे । बहू चामरे मत्छ मार्तंडपत्रें । अती शोभती चंद्र सूर्योनिशाणी ।*[४२]

इतके वैभव असूनही विश्वमाता भवानीचे महत्त्व याहून आगळे आहे. ती योगियांची समाधी आहे आणि ती सर्वांची आधिव्याधी दूर करते– अशा विश्वमातेचे भजन करा असा या स्तोत्राद्वारे रामदासांनी उपदेश केला आहे. 'भवानी वानीतो' हे फक्त शिखरिणी वृत्तातील पाच कडव्यांचे छोटेखानी स्तोत्र आहे. भवानीचे मोठेपण यात गायिले आहे. 'मायेची माय तीचाहि' हे स्तोत्र भवानीचे मायास्वरूप वर्णन करते. माया 'जगाची मुळीची माता' असल्याचा भाव समर्थांनी व्यक्त केला आहे. या मायेमुळेच सर्वांच्या ओळी (वंश) लांबल्या, मायाच अंडज, जारज, उद्भिज, स्वेदज आदी सर्वांची माता आहे. ती शिवशक्तीच होय. हीच माया किंवा आदि शक्ति कुलदेवी म्हणून सर्वांची कुळे पाळिते– संरक्षिते– ही शक्ती रामदासांवर कृपादृष्टीने पाहते आहे, कृपेचा वर्षाव करते आहे. या स्तोत्रात रामदासांचा ईश्वरकृपेचा आत्मविश्वास प्रकट झाला आहे.

*'दासांची शक्ती दासांला । वोळला कृपाळूपणे ।*[४३]

**तुळजाभवानीची स्तोत्रे :** ही स्तोत्रे अत्यंत महत्त्वाची आहेत. काव्य या दृष्टीनेही त्यांचे महत्त्व आहे आणि राजकारणाच्या दृष्टीनेही पण, यातील संदर्भाबद्दल काही मतभेदही आहेत, म्हणून या सर्व स्तोत्रांचा सर्वांगीण विचार करणे आवश्यक आहे. तुळजामातेचे स्वरूप काय आहे ते या स्तोत्रात अनेक ठिकाणी व्यक्त झाले आहे. ती शक्तिस्वरूपा आहे. महिषासुरमर्दिनी आहे, दुर्जनांचे निवारण करणारी आहे. अनंतरूपिणी आहे, वीणापुस्तकधारिणी आहे, चतुर्भुजा आहे, श्रीरामवरदायिनी आहे, तात्काळ मनकामना पुरविणारी आहे, सर्व व्याधी निवारणारी आहे, आनंद वाढविणारी आहे, पारधाही (प्रतापगडाजवळ) येऊन राहिली आहे, रामदासांची ती कुळदेवता आहे, प्रसन्नमुख सुंदरा आहे. तिच्यामुळेच सर्व बोलणे, चालणे, योग धारण, राजकारणे चालतात. या सर्व स्तोत्रांतून रामदासांची उत्कट भक्ती प्रतीत होते. तिचा महिमा सांगत असता ते कंटाळत तर नाहीतच, उलट त्यांची भाषा अधिक ओघवती होते. आपली कुळदेवता असल्याबद्दल ते मोठ्या अभिमानाने उल्लेख करतात. एके ठिकाणी तर ते 'माझी माता' असे मोठ्या अभिमानाने लिहितात– *रामदास म्हणजे माझी । माता ही जगदीश्वरी ।*[४४] *ऐश्वर्य सर्व शक्तींचें । विवेकें प्रत्यये पहा ।३१।*

तिला लावलेली विशेषणे ही त्यांच्या तिच्याविषयीच्या आदराची, भक्तीची निदर्शक आहेत. त्याचप्रमाणे रामदासांच्या भाषा-प्रभुत्वाचीही निदर्शक आहेत. लोभाळू, कृपाळू, लाक्षिणी, अनंतरूपिणी, मूळमाया, महामाया, रामवरदायिनी, चतुर्भुजा, वीणापुस्तकधारिणी, वेदमाता, स्फूर्तिरूपे प्रकाशणारी, आदिशक्ती, परमेश्वरी, महिषासुरमर्दिनी, जगदात्मा, जगदेश्वरी, परमात्मा परमेश्वरी, प्रसन्नमुख, सुंदरा, त्रैलोक्यजननी अशा अनेक विशेषणांनी रामदासांनी आपल्या भावना तुळजा मातेलाच बोलून दाखविल्या आहेत. सर्वांत महत्त्वाचे विशेषण 'रामवरदायिनी'

हे आहे. हे विशेषण चार स्तोत्रांत पाच वेळा आले आहे. देवी भागवतातील एक कथा कदाचित याचा आधार असू शकेल. रावणाचा पराजय होईना म्हणून राम निराश झाल्यानंतर जांबुवंताने शक्तीची आराधना करण्याचा सल्ला दिला आणि सहस्र कमळे अर्पण करण्याचे अनुष्ठान रामाने पार पाडले. परंतु एक कमळ देवीने लपविले आणि म्हणून शेवटच्या दिवशी स्थानावरून हालता येत नसल्यामुळे रामाने आपले नेत्रकमळ अर्पण करण्याचा निश्चय केला तेव्हा देवी प्रसन्न झाली आणि तिने त्याला यशस्वी होशील, असा वर दिला म्हणून ही रामवरदायिनी झाली.

'रामवरदायिनी'चा उल्लेख स्फुट प्रकरण ६७ मध्ये आला आहे. 'राम-लक्ष्मण' हे वयाने लहान होते. सीतेचा शोध धुंडूनही कोठे लागेना, म्हणून उदास झाले, अरण्ये, गिरिकंदरे, कपाटे, दर्कुटें हिंडून पाहिली. पाहता पाहता त्रैलोक्यजननी कुमारीच्या रूपाने दिसली. 'तू कोण' असे राम-लक्ष्मणांनी विचारले त्या वेळी मीच तुकाई आहे. तुम्हाला वर दिला, आता तुम्ही जा' असे तिने सांगितले. पण हे खरे कशावरून? येथून आम्हाला लंका दाखवशील तर आम्ही हा वर खरा आहे असे मानू. असे म्हटल्याबरोबर लंकेचे कळस त्यांना दिसले आणि तेव्हापासून 'रामवरदायिनी' असे तुळजाभवानीचे नाव पडले.

दुष्टांचे संहाराचे काम रामदासही अत्यंत महत्त्वाचे मानीत. 'दुष्ट संहारले मागे । ऐसे उदंड ऐकितो ।।' असाही उल्लेख एका स्तोत्रात आहे. त्यामुळे 'रामवरदायिनी' हे विशेषण रामदासांना अतिशय आवडत होते, असे दिसते.

तुळजाभवानीची स्तोत्रे एकूण आठ आहेत. त्यांची भाषा अत्यंत ओजस्वी आहे. वीररसाने ही स्तोत्रे ओतप्रोत आहेत. त्याचबरोबर भक्तीचा ओलावाही शब्दोशब्दी प्रकट होतो. विषय विवेचनाचा ओघ आणि वाणीचा ओघ हे दोन्ही परस्परात इतके एकरूप होऊन केले आहेत की कलात्मता आणि आशय यांना वेगळे करताच येत नाही. कलेची आधुनिक लक्षणे या दृष्टीने आशयाशी शैलीची एकरूपता या स्तोत्रांतून सहज रीतीने दृग्गोचर होते. प्रसादगुणही येथे सहज रूप धारण करून अवतीर्ण झाला आहे. अलंकार स्वतंत्रपणे वापरलेले नाहीत, पण ते काव्याच्या अंगीभूतच आहेत. काव्यशरीर सौष्ठव हे अलंकारमय असते असे साहित्यशास्त्रकारांनी म्हटलेले आहे.

## भाषासौंदर्य आणि आवेश

रामदासांची स्फुटप्रकरणे सर्वच्या सर्वच मोठी ओजस्वी आहेत. म्लेंच्छांच्या अत्याचारांनी चिडून गेल्यामुळे जी चीड मनात एकसारखी जळत होती आणि त्यामुळे सर्व जनतेला बलवान, स्वाभिमानी आणि तेजस्वी बनविण्यासाठी रामदासांना जेवढी आतुरता होती ती सारी भावना या स्फुट प्रकरणांतून मोठ्या आवेशाने प्रकट झाली आहे. ही प्रकरणे वीरकाव्याचा उत्कृष्ट नमुना आहेत. देवीच्या स्तोत्रातून हा आवेश अधिक ओसंडून जावा हे स्वाभाविक आहे. कारण तुळजामाता म्हणजे मूर्तिमंत शक्तीच आणि या दृष्टीने 'दुःखदारिद्र उदेगे' हे तुळजाभवानीचे स्तोत्र पाहण्यासारखे आहे.

## तुझा तू वाढवी राजा

देवीच्या स्तोत्रांपैकी 'प्रपंची आमचे कुळी' हे एक स्तोत्र आहे. यातच 'तुझा तू वाढवी

राजा, शीघ्र आम्हाचि देखता ।' हे शब्द आले आहेत. या स्तोत्राची चिकित्सा श्री. म. माटे यांनी केली आहे. या स्तोत्राचे तीन खंड पडतात असे त्यांचे म्हणणे आहे. एक) श्रेष्ठांनी केलेला नवस फेडणे, दोन) आपल्या वैराग्य दीक्षेची सार्थकता झाली असे उद्गार काढणे व 'राजा'साठी देवाची प्रार्थना करणे. नवस फेडण्याचा काळ फार उशिराच आहे व तोपर्यंत स्वराज्यस्थापना झाली होती. तेव्हा 'तुझा तू वाढवी राजा' हे उद्गार इतक्या उशिरा काढण्याचे कारण नव्हते, असा युक्तिवाद त्यांनी केला आहे आणि म्हणून हे स्तोत्र एकच नसून ते कालाच्या ओघात तीन स्तोत्रांचे एक स्तोत्र झाले असले पाहिजे असे त्यांचे म्हणणे आहे आणि हे अनुमान बरेचसे बरोबर असावे असेही दिसते. कारण 'तुझा तू वाढवी राजा । शीघ्र आम्हाचि देखता ।' यातील तळमळ शिवाजीच्या बाळपणच्या वेळची असावी हे स्पष्टच दिसते.

हे स्तोत्र शके १६०० मधील असावे. कारण त्याच वेळी समर्थ नवस फेडण्यासाठी प्रतापगडास गेले होते. त्या वेळी शिवाजीचे वय ४०-४२ वर्षांचे होते. जरी त्या वेळी राज्यस्थापना झाली होती तरी 'तुझा तू वाढवी राजा' याचा अर्थ हे राज्य अधिक वाढावे असाही असू शकेल. 'शीघ्र आम्हाचि देखता' याचा अर्थ समर्थ जवळजवळ सत्तरीला आले होते. तेव्हा शिवाजी राजांचे राज्य आणखी वाढावे असा या स्तोत्राचा अर्थ घेतल्यास माटे यांच्या म्हणण्याप्रमाणे या स्तोत्राचे तीन तुकडे करण्याचे कारण नाही. कसेही असले तरी 'तुझा तू वाढवी राजा' हा संदर्भ शिवाजी महाराजांबद्दलचाच आहे यात शंका नाही.

**देवीच्या स्तोत्रांची छंदोरचना :** देखिली तुळजामाता, सर्वारंभी मुळारंभी, दुखदारिद्र उदेंगे, प्रपंची आमुचे कुळी, आणि बालका वाढवी माता,या पाच स्तोत्रांचा अनुष्टुभ छंद आहे. 'प्रसन्नमुख सुंदरा । तुझेच हे वसुंधरा ।' हे स्तोत्र प्रमाणिका वृत्तात आहे. 'अघटित ते उदंड केले । विवंचिता' ते समजोन गेले ।' हे स्तोत्र 'इंद्रवज्रा' वृत्तात आहे. भावनेचा, विचारांचा आणि भाषेचा ओघ खंडित न करता जेवढा छंदांचा नियम पाळता येईल, तेवढाच रामदासांनी पाळला आहे. या दृष्टीने रामदास क्रांतिकारक होते असे म्हटले पाहिजे.

## गणपतीची स्तोत्रे

'मस्तसा हस्त किंकाटे' या स्तोत्रात गणेशाचे वास्तव वर्णन केले आहे. हे स्तोत्र लहान आह आणि ग्रंथारंभी नमन-स्तवन असावे याच स्वरूपाचे आहे. पण स्फुट प्रकरणे ६२[४५] यात गणेशाचे स्तोत्र विस्तृत आहे. गणेश तात्काळ कसा पावतो असे महत्त्व सांगून सिंधुरासुरास मारल्याचा-पराक्रमाचा उल्लेखही यात आहे. यमयातनेचे वर्णन करून त्यातून सुटण्यासाठी 'ज्ञानेमोक्षाचा होतसे' हे पटविले आहे. आणखी एक मालिनी वृत्तातील गणेश-शारदा सद्गुरू या नावाचे स्तोत्र आहे.[४६] यात गणेश, शारदा व सदगुरू या तिघांना वंदन केले आहे. या तीनही स्तोत्रांत गणेशाबद्दलची भक्ती रामदासांच्या अंत:करणात होती हे दिसून येते.

## रामाची स्तोत्रे

रामदासांची रामाची स्तोत्रे जरी काही वेगळी काढलेली असली तरी त्यांच्या कवितेत श्रीरामचंद्राबद्दलचा आदर, त्याचे महत्त्व, त्याची स्तुती, त्याची प्रार्थना, जागोजागी आलेली आहे.

**भक्तिभावना :** रामाच्या स्तोत्रातून त्यांची श्रीरामावरील भक्ती प्रत्ययाला येते. शंकराचे

अंग जेव्हा विषाने पोळले तेव्हा तो दाह रामनामाने कमी झाला. पण ही प्रचीती मला आलेली आहे असे रामदास म्हणतात. *विषे बहुत जाळिले । विशेष अंग पोळले । प्रचीत माझ्या मना । श्री राम राम हे म्हणा ।।*[४७]

रामाबद्दलची भक्तिभावना 'परमसुंदर' या स्तोत्रात दिसून येते. यात रामाची स्तुती कितीतरी विशेषणाच्या द्वारे केली आहे. 'भुवनकंटकदैत्यमारक', 'अमरमोचन दैन्यहारक', 'दुरितनाशन पुण्यकारक,' 'हरित्संकट दासतारक', 'वर अनावर दैत्य भेदक','दशमुखांतक सीरच्छेदक', 'ऋषिमुनिजनचित्तवेधक', 'वीरवीरांतक', 'वीरोत्तम असुरकंटक' इत्यादी. सर्व स्तोत्र या विशेषणांनीच व्यापले आहे. या विशेषणांमागे रामदासांची उत्कट भक्तिभावनाच दिसून येते. 'गणाधीशाईशा' या स्तोत्रात रामाचे महत्त्व आर्ततेने गाइले आहे. 'कपाळूबा देवा झडकरी मला करणे दया' अशी आर्त प्रार्थना केली आहे. 'दिनानाथा वेधा चुकउनि बसवी पदा' अशी ही मागणी केली आहे.

'अनंत नामाचा' या स्तोत्रात देहेपुरात वर्तणारा पुरुष म्हणजे राम असे त्याचे परब्रह्मत्वही सिद्ध केले आहे.

**वर्णन शैली :** रामाचे वर्णन करताना त्याची शोभा समर्थ वर्णन करतात-

*खडे रुतलेखुतले शुद्ध हेमा । माहीतेज पुंजाळले दिव्य रश्मी । हिरे माणिके फांकता दिव्य काळा । सुटाळांगळा रुळती मुक्तमाळा ।।*[४८]

हे सर्व वीतरागी रामाचे वर्णन आहे. रामाचे वैराग्य हा रामदासांचा एक आकर्षणाचा विशेष भाग असावा. कारण पुढे 'वनवासी राम' या कवितेत ते लिहितात– *मऊ सुमने रोज खुपे जयाला । असा राम तो सीघ्र पाई निघाला ।*[४९]

'करुणाष्टके सवाया' या ग्रंथात रामाचे स्तोत्र दोन सवायांत गाइले आहे.

वंदिला गजवदन सुखसुखाचे सदन

या सवाईत 'राम' हा 'जनसज्जन विश्राम' असल्याचे म्हटले आहे. 'धीर, उदार, सुंदर किर्ती जाणतसे हा', 'सोडविले सुरवर वरदायक खरा' असे मोठ्या अभिमानाने वर्णन केले आहे आणि अशा रामाला ओवाळावे, असे तळमळीने सांगितले आहे आणि दुसऱ्या सवाईत 'प्रचंड गजमुख वितंड तनुसुख' यात *देवाधिदेव राम आनंद सुखधाम दीनवच्छल राम भक्तांसी पावला* असे त्याचे भक्तवत्सलपण सांगितले आहे.

या सर्व स्तोत्रातील भाषा प्रत्ययी, आत्मविश्वासाची आणि आदरयुक्त आहे. रामाची स्तोत्रे केवळ भक्तिभावना आणि रामाचे मोठेपण व्यक्त करतात. अनुप्रासादी शब्दालंकार यात विपुल आहेत. मात्र अर्थालंकार क्वचितच आढळतो. भाषेचा ओघ मात्र अनुस्यूत आहे. रामदासांचे हे एक मोठे वैशिष्ट्य आहे.

## परशुरामाचे स्तोत्र

परशुरामाचे स्तोत्र महत्त्वाचे आहे. रामदास रामेश्वराहून निघाले ते हाटकेश्वर-आदिरंग-मध्यरंग, शेषाचलादी, व्यंकटेश, विरुपाक्ष-सुब्रमण्य-अरुणाचलादी शिवस्थाने, श्रीशंकराचार्य-रामानुजाचार्य-मध्वाचार्यादिकांची आचार्यपीठे ऋष्यमूक पंपा सरोवर-शबरी जटायू-अगस्त्याश्रम वगैरे श्रीरामचंद्राच्या चरित्राशी संबंधित असलेली पवित्रस्थाने, शिव-विष्णुकांची, पक्षितीर्थ, श्रीशैल्यपर्वत, गोकर्ण महाबळेश्वर इत्यादी क्षेत्रे पाहत पाहत परशुराम क्षेत्री (चिपळूण) आले.[५०] ज्या ज्या ठिकाणी समर्थ गेले त्या त्या ठिकाणी काही कविता, स्तोत्रे वगैरे करीत असत असे

दिसते. परशुरामाच्या क्षेत्री तर त्यांची अस्मिता जागी झाली यात नवल नाही. ते जामदग्न्य गोत्री. अर्थातच एका दृष्टीने परशुरामाचेच वंशज, दुसरे असे की परशुरामानेही एकवीस वेळा पापी क्षत्रियांचा पराभव केलेला. जाज्वल्य स्वाभिमानी परशुराम, आणि समर्थांच्या वेळचीही परिस्थिती जवळजवळ तीच. तीर्थक्षेत्रे भ्रष्टलेली, ब्राह्मणांचा व धर्माचा अनन्वित छळ चालू असलेला. अशा परिस्थितीत परशुरामाकडे तेजस्वितेची प्रार्थना समर्थांनी केली नसती तरच आश्चर्य! फक्त पाच श्लोकांचे हे स्तोत्र पण अत्यंत करुण आहे.

हे जमदग्नी, मी तुझ्याच गोत्राचा अर्थात वंशज येथे आलो आहे. सदासर्वकाळ तुझेच नाम घेतो आहे. धारण करतो आहे. तुझा पुत्र-परशुराम सागराचे तीरावर राहतो आणि तो माझा समाचार घेत नाही. ही तक्रार समर्थांनी जमदग्नीशी केली आहे. मागे परशुरामाने किती युद्धे केली. ब्राह्मणांना राज्येही दिली. याचा उल्लेख करून समर्थ परशुरामाला प्रार्थना करीत आहेत. आताच आकस्मित हे सामर्थ्य कोठे गेले? कलियुगात सर्वच निस्तेज होते. तसे ते तुझे सामर्थ्य निस्तेज झाले काय? असे आर्त आव्हान केले आहे. तू चिरंजीव आहेस. तर मग तुला ही परिस्थिती दिसत नाही काय? की दिसत आहे पण तुझे हृदयच कठीण झाले आहे? तुझे चित्त कसे बरे वळत नाही? मी तुझा नामधारी येथे आलो आहे. तू कृपा करणारा नाहीस काय? असा उदासीन होऊ नको रे । समर्थाने कसे स्वाभिमानी असावे. हे दीनानाथा, तू आपली तेजस्वी वाणी सत्य करावी मी राघवाचा दास तुला ही विनंती करतो.[५१] असा अत्यंत आर्त धावा समर्थांनी केला आहे.

करुणरसाचे हे स्तोत्र एक उत्कृष्ट उदाहरण आहे.

## शंकराची स्तोत्रे

शंकराची दोन स्तोत्रे आहेत. रामचंद्राच्या एका[५२] स्तोत्राप्रमाणे यातील एका स्तोत्रात विशेषणांचे प्राचुर्य आहे. दुःखहर, शोकपरिहर, शैलजावर, कालकूटश्वर, परमसुंदर इत्यादी. यात फक्त अनुप्रासांचा वापर अधिक आहे. रामचंद्रांच्या स्तोत्रात विशेषणांच्या वापरातही एक प्रकारची उत्कट भक्तिभावना प्रकट होते, तितकी यात होत नाही.

## विष्णूचे स्तोत्र

विष्णूनेच रामअवतार घेतलेला असल्याने राम आणि विष्णू यांचे ऐक्य रामदासांनी मानणे आश्चर्य नव्हे. यात समर्थांची आर्तता स्पष्ट झालेली आहे.

*समर्था मी तुझा म्हणवित जना वेर्थ सिण मी । तुझे सेवेसाठी नकळत मुखे दीन वदले । दयासिंधू दाता हिनदिन जनालागि निववी । समर्था मी तुझा तुजविण मला कोण पाहाता ।*[५२]

असे अनेक उद्गार या लहानशा स्तोत्रात प्रगट झाले आहेत. याशिवाय 'जनालागि निववी' या शब्दावरून जनांचे दुःख हरण करण्याची किती चिंता समर्थांना लाभली होती हे स्पष्ट होते. आणि हा विष्णूच्या भक्तीचा मार्ग विवेकाचा आहे. तो आक्रमित असता अघटितही घडते असा आत्मविश्वासही प्रकट केला आहे. करुणाष्टकात ७३ वे प्रकरण रामकृष्ण[५३] म्हणून आहे. त्यात एका भुजंगप्रयात वृत्तात रामाचे चरित्र वर्णन आणि दुसऱ्यात कृष्णाचे असे आलटून-पालटून वर्णन आहे. आणि शेवटच्या छंदात दोन्हींचे ऐक्य असावे असा उपदेश केला असून रामकृष्ण एकच असल्याची समर्थांची भावना स्पष्ट झाली आहे. *'क्षमा सर्वदा ऐक्यरूपे करावी । पथीं*

*आदरे सार्थकाची धरावी । म्हणे दास द्वैतास हो तातळावे । जळावे परी सर्व भूती मिळावे ।।'* यावरून अशी रचना समर्थांनी जाणूनबुजून केली आहे हे स्पष्ट होते.[५४] आणि या सर्व श्लोकात रामकृष्णांच्या चरित्रातील काही परिचित-अपरिचित उल्लेख आलेले आहेत.

## निर्गुण स्तोत्रे

निर्गुण स्तोत्रे चार आहेत. स्फुट प्रकरणातील पृष्ठ ४३१ वरील ६३ वे प्रकरण, पृष्ठ ३७५[५५] वरील १५ वे, ३७७ वरील १८ वे आणि ४२० वरील ५७ वे,[५६] ३७६ वरील १६ वे सुद्धा ब्रह्मवर्णन असल्याने निर्गुण स्तोत्रच मानावे लागेल.

## करुणास्तोत्रे

'करुणाष्टके' या ग्रंथात आलेली करुणरसाची स्तोत्रे येथे विचारार्थ घेतली आहेत. ती एकूण ३३ आहेत. पहिल्याच स्तोत्रात गणपतीला विनविले आहे.[५७] आपण 'लघुमा कवी' असल्याचे जरी म्हटले आहे तरी मला 'धारणा दे' अशी मागणी आहे. इतकेच नव्हे, तर मला 'सबळ रामकथा' वदता येत नाही, म्हणून तुझी दया वांछितो अशी करुणा भाकली आहे. बहुत सेवक आहेत त्यांच्याहून मी हीन आहे हे खरे, पण माझ्याहूनही पतित पुष्कळ आहेत तेव्हा तुमचे ब्रीद सोडू नका, अशी ही आर्त प्रार्थना आहे. कदाचित ही प्रार्थना काव्यरचनेस आरंभ केल्यानंतर काव्य जमेनासे झाले आहे असे वाटत असावे त्या वेळचीही असेल. पण यात रामकथा गाण्यासाठी 'जाऊ करीत कळा' असावी अशी मागणी आहे. ती रामदासांची तळमळ व्यक्त करते. येथे भावनोत्कट रचना झाली आहे हे स्पष्ट आहे. दुसऱ्या स्तोत्रात श्री रामाचे उपकार जाणले आहेत.

'दीनवत्सल देव' या स्तोत्रात रामाचे मोठेपण गाइले आहे. त्याच्या सावळ्या तनूचे सौंदर्यवर्णन लोभसपणे केले आहे. फक्त पाच कवितांचे हे स्तोत्र रामदासांनी भक्तिभावनेने गाईलेचे प्रत्ययाला येते. 'श्री समर्थांची इच्छा' या काव्यात समर्थांच्या मनाची उदास स्थिती व्यक्त झाली आहे आणि आनंद व्हावा, उदासस्थिती जावी, उद्वेग नसावा, शत्रूचा नि:पात व्हावा अशी प्रार्थना केली आहे. 'देवे दयाळे करुणा करावी' हे रामनामी 'तरुनी तरावी' या शब्दांवरून रामनवमी कशी साजरी होईल ही चिंता त्यांना लागली असावी असे अनुमान काढता येते. रघुनाथदासा कल्याण व्हावे । अतिसौख्य व्हावे, आनंदवावे । यावरून रघुनाथाचे जे दास होतील त्या सर्वांना सौख्य व्हावे ही त्यांची तळमळ दिसून येते. जे शरणागत असतील त्या सर्वांचे इच्छित (इप्सित) पूर्ण व्हावे अशी मागणी समर्थ करीत आहेत. परिस्थितीने गांजलेल्याबद्दल कळकळ, करुणा आणि ती परिस्थिती दूर व्हावी म्हणून रामरायास प्रार्थना असे या स्तोत्राचे व्यापक स्वरूप आहे. रामदासांचा उदार स्वभाव, रामरायांनी उत्कट भक्ती, दु:खितांबद्दल सहानुभूती आणि त्यांची दु:खे दूर व्हावीत याबद्दलचे त्यांचे प्रयत्न या सर्वांचे दर्शन या स्तोत्रात होते. मनाचे क्लेशाची भावना या काव्यात उत्कटपणे दृष्टीला येते. रामदास व्यापक विचारांचे होते, त्यांची दृष्टी संकुचित कधीच नव्हती. व्यक्ती आणि समष्टी यांचा ते साकल्याने विचार करीत असत आणि देशाबद्दलची तळमळ त्यांनी आपल्या काव्यात अनेकवार प्रकट केली आहे.

रामदासांच्या काव्यशक्तीचा, काव्यात्मकतेचा आणखी एक उत्कृष्ट पुरावा 'उदासीन हा

काळ कोठे न कंठे' (अथवा समर्थांच्या जीवाचे आर्त) हे स्तोत्र देते.

*'समाधान साधुजनाचेनि योगे'* परंतु नंतर? *परि मागुते दु:ख होते वियोगे ।*

या काव्यात रामदासांची उदास अवस्था अत्यंत हृदयद्रावक रीतीने प्रकट झाली आहे. त्यांना रामाच्या भेटीची तळमळ लागली आहे. ही आर्तता एखाद्या आर्त भक्ताशिवाय इतर कोणालाही इतक्या उत्कटपणे प्रकट करणे शक्य नाही. मनाची अवस्था काय झाली हे कसे सांगायचे? येथे वाचाही स्तंभित होते. अनिर्वचनीय आनंद जसा असावा तसे दु:खही योग्य शब्दात प्रकट करणे कठीण असते. असा कसा मी पराधीन झालो आणि हळूहळू आयुष्यही व्यर्थ जाऊ लागले आहे. म्हणजेच रामाच्या भेटीसंबंधी त्यांना आता आतुरता उत्पन्न झाली होती. आता अधिक वेळ त्यांना घालवायचा नव्हता असे दिसते. हीच भावना 'तुजवीण रामा मन कंठवेना ।[५८]' या आर्त स्तोत्रातही व्यक्त झाली आहे. यात 'संसारवेथा चुकवी समर्था' असा धावा केला आहे. संसाराची व्यथा आहे आणि हा समर्थांचा संसार देशाचा संसार आहे हे उघड आहे. ती व्यथा म्हणजेच देशाच्या संसाराचे सर्व दु:ख तू दूर कर असेच त्यांनी आर्जविले आहे. 'संसारसंगे बहु पीडीलो मी' याचा अर्थ त्यांना एकांत हवा होता असाही करता येतो. त्यांना रामदर्शनाची तळमळ लागली होती हे तर उघडच आहे. समर्थांना दुसऱ्याच्या दु:खामुळे होणारे दु:ख अनेक ठिकाणी प्रकट झाले आहे. 'दुज्यासि जाता दु:खे रडावे ।[५९]', 'संसारचिंता मज वाटते रे[६०] ।' निववी संती श्रोतया सज्जनांचे'[६१]

**करुण-रसाचा पूर :** करुणास्तोत्रे म्हणून जी २३ स्तोत्रे वर उल्लेखिलेली आहेत त्यांत करुणरस इतक्या विपुल प्रमाणात प्रकट झालेला आहे की त्याला करुणरसाचा पूर असेच म्हणणे शोभेल. या करुणरसात्मक कवितात रामदासांच्या अंत:करणाच्या कैक खुणा दिसतील असे श्री. देव म्हणतात.[६२] त्यात त्यांच्या जीविताचे आर्त पहावयास मिळेल. रामाच्या भेटीविषयी, त्यांना वाटणारी तळमळ आपल्या प्रत्ययाला येईल. त्यांनी वर्णिलेली माहात्म्ये, अवलोकिलेली देशस्थिती, लहानथोरांना केलेला उपदेश[६३] हे सर्व आपणास पाहावयास मिळेल. विषयांची ही विविधता असूनही या सर्व काव्यात त्यांच्या अंत:करणातील खळखळीची दृश्ये आपणाला तशी स्पष्ट दिसतात. ही चित्रे त्यांच्या भावभावनांची तर आहेतच, पण त्याशिवाय त्यांच्या अंत:करणातील सूक्ष्म संवेदनांचीही आहेत.

करुण रसाचा स्थायीभाव शोक आहे. रामाचे दर्शन होत नाही, लोकव्याप मात्र जो अंगावर घेतला आहे तो सुटत नाही. त्यामुळे रामाच्या भेटीची तळमळ लागूनही काही उपयोग नाही हा संसाराचा व्याप आता तेव्हाच सुटेल जेव्हा हा देहपात होईल. हा शोक रसवत्तेला पोचलेला दिसतो. देहत्याग करण्याची इच्छा प्रबळ होते तेव्हा 'सर्वोत्तमा कै मज भेटि देसी', 'तुजवीण रामा मज कंठवेना' 'उदासीन हा काळ कोठे न कंठे', 'राखी जिवे सांडुनि सर्व जावे', 'रघुनायका मागणे हेचि आता', 'उदासीन ही वृत्ती कोठे न लागे', 'मना चाल उठी वना दुगमाते', 'तुझा दास मी व्यर्थ जन्मासि आलो', 'न जावे चि तेथे चि लागेल जावे', 'तुजविण जगदीशा बुद्धि हे भंजवी रे', 'अनुदिन अनुतापे तापलो रामराया', 'तुजविण रघुनाथा सर्वथा कंठवेना', 'वणवण विषयांची सर्वथा ही शमेना', 'विषय गति मनाची ते मला आवरेना' अशी अनंत उदाहरणे त्यांच्या करुण अवस्थेची देता येतील आणि त्या त्या प्रत्येक काव्यात हे कारुण्य इतके उफाळून आले आहे की हा सारा करुणरसाचा-कारुण्याचा सागर आहे असे म्हणणे बरोबर ठरेल.

**करुणस्तोत्रांची भाषा :** करुणस्तोत्रांची भाषा करुण आहे हे सांगण्याची आवश्यकता नसावी. प्रभावी हृदयग्राही-हृदयस्पर्शी वर्णन तेव्हा होऊ शकते जेव्हा त्याची भाषा ही प्रभावी असेल.

रामदासांच्या रचनेत काव्य नाही असे म्हणणे चुकीचे आहे हे निश्चित. नवीन नवीन प्रत्ययकारी शब्दयोजना, भाषेचा प्रचंड ओघ, भावना व्यक्त करणारे वाक्यांश, आपल्या भावना किंवा अंत:संवेदनांना उचित भारदस्तपणा किंवा वजन देण्यासाठी वापरलेले उपमा, रूपक, दृष्टांत, विरोधाभास, अनुप्रास इत्यादी अलंकार आणि या सर्वांतून वाहणारा प्रचंड वेगाचा उत्तुंग रसप्रवाह या दृष्टींनी ही करुणास्तोत्रे मराठी काव्याचे भूषण बनून राहिली आहेत.

## रामदासांची लोककाव्ये

रामदासांची लोककाव्ये हा शब्दप्रयोग त्यांनी रचिलेल्या भारुडांच्या संदर्भात केला आहे. त्यांची एक लावणीही आहे. परंतु मुख्यत: 'भारुडे' हा लोककाव्याचा प्रकार म्हणून येथे गृहीत धरलेला आहे.

भारुडांतील श्लेष किंवा रूपक, इत्यादी अलंकार, त्यांचे कथापण, त्यांची संवादात्मक किंवा कथात्मक शैली, शब्दांचे सौष्ठव, भाषेतील प्रवाह व प्रभाव आणि एकंदरीत परिणामकारकता इत्यादी दृष्टींनी भारुडे ही जिवंत काव्ये असतात. त्यातील कल्पनात्मक प्रतिमासृष्टी उभी करण्याचे कवीचे सामर्थ्य आणि कवीच्या अनुभूतीतून त्यांना आलेले एक प्रकारचे वजन किंवा भारदस्त स्वरूप यामुळे भारुडांची काव्यात्मकता संशयातीत असते. खरे लोककाव्य या दृष्टीने भारुडांचे मराठी साहित्यात कितीतरी महत्त्व आहे. भारुडे लोकभाषेत, लौकिक प्रसंगावर आधारलेली असली तरी त्यांचे अंतिम स्वरूप व ध्येयही आध्यात्मिक असल्यामुळे प्रभावाच्या दृष्टीने त्यांची अंती गणना करावी लागेल. यामुळेही भारुडांचे स्वरूप अन्य काव्यापेक्षा कितीतरी वेगळे असते आणि म्हणूनच त्यांचे महत्त्वही अधिक.

रामदासांनी साधारणपणे अकरा विषयांवर आणि त्यांच्या ४७ उपभेदांवर एकूण एकशेतेरा भारुडे लिहिली आहेत. या संख्येवरून आणि विषयांच्या विविधतेवरून रामदासांनी जनसामान्यात आपला उपदेश किती विविध प्रकारांनी पोचविला होता हे दिसून येते. लोकांच्या उद्धारासाठी, त्यांनी मूर्खपणापासून उत्तम पुरुष होण्यापर्यंत सुधारण्यासाठी, त्यांना उत्तम प्रापंचिक बनविण्यासाठी, त्यांना बद्धापासून मुमुक्षु आणि मुमुक्षुपासून साधकावस्थेपर्यंत पोचविण्याची त्यांनी केलेली आटाआटी या भारुडांच्या रचनेवरून आणखी सिद्ध होते. लोकोद्धारासाठी त्यांनी अमुक एक मार्ग अवलंबिला नाही असे नाही. भजन, कीर्तन, भारुडे, गाणे, योग, ध्यान, जप, मंदिर-स्थापना, उत्सव, मठस्थापना इत्यादी अनेक मार्गांचा अवलंब त्यांनी केला. भारुडांच्या विविधतेवरून ही गोष्ट स्पष्ट होते असे जे वर म्हटले आहे ते पुढील विवेचनावरून स्पष्ट होईलच.

## भारुडांतील काव्य-तत्त्वज्ञानाचा मेळ

आंब्यांवरील भारुडात त्यांनी पाहिलेल्या आंब्यांचे कितीतरी प्रकार सांगितले आहेत. माका, हिरवा, सिंदूरवर्णी, (शेंदरी), गुलाबी रंगाचे, काळे, पांढरे, जांभळे, ढवळे हे झाले त्यांचे रंग; वाटोळे, लांबोळे, चापट, वळकुंबे, सरळ हे त्यांचे आकार; शेपू, कोथिंबिरी, बासाचे इत्यादी वासाचे; खर्बड, नाकाडे, लंगडे, केळे, कुहिरे, तुरके, इडे इत्यादी बाह्याकाराचे.

यातील लंगडे हा बनारसी आंब्याचा प्रकार त्यांना माहीत होता असे दिसते. या सर्व आंब्याची माहिती सांगता सांगता चटकन ते म्हणून जातात की *'भूमंडळा आंबे पूर्ण ।' खाऊन पाहतो तो कोण? भोक्ता जगदीश आपण, सकळां ठायी ॥*[६४]

उंदरावरील दोन भारुडांपैकी एक विनोदी आहे. उंदरावरून तूही वारंवार लवंडतोस आणि क्षणाक्षणा रागाही येतोस ही नीती नव्हे असे गणपतीलाही काही ते सांगतात. वृत्तीला गाय म्हटले आहे, आणि कृष्णाला गाई राखण्याची विनंती केली आहे. जागल्या म्हणजे जागे करणारा, दिवटा, पांगूळ इत्यादी व्यक्तिचित्रांचे वर्णन केले आहे. त्यांचे स्वभाववर्णन यथायोग्य केले आहे. 'जागल्या'वरील भारुडे सर्वांना जागे राहण्यासाठी सांगत आहेत. गस्त घालणारा 'हुश्शार, जागे रहा हो' असे सांगत रात्री हिंडत असतो. तो जागल्या. माया हा चोर आहे. तुम्ही जागे राहिलात तर ती तुम्हाला नागविणार नाही. नाहीतर सपशेल लुबाडले जाल. असा आशय आहे या भारुडाचा. कबीराचे असेच एक पद आहे.

जागल्यावरील बाकीच्या भारुडात अशाच सावधगिरीची सूचना देऊन सांसारिकांना मायामोहात न अडकण्यासाठी सावध केले आहे. हे सांसारिक सर्व साधक आहेत. 'झडपणी'त तर एक सलग रूपक आहे. भुताने झडपले की जावासी जांचणी कशी होते, आंगी घुमारते कसे, बोलो जाता सारासार, त्यासी कसा कळेनासा होतो, अशी स्थिती वर्णिली आहे. मग पंचाक्षऱ्याला बोलाविले जाते. तो शब्दांनी समजावतो. पोटी पस्तावा घालतो. 'निगमींची बीजे' कानी सांगतो आणि मग भवभयाचे निवारण करतो असे रूपकही सुंदर आहे. झडपलेल्याचे रूपकात्मक वर्णन कसे आध्यात्मिक आहे हे पाहाण्यासारखे आहे.

*'मायेचे घुमारे । सर्व आंगी भरले वारे । धरूनी उदंड शरीरे । लहान थोर नाचती ॥ भुतांपरते भूत । तयांवर ते महद्भूत । गुज जाणतील संत । महंत खूण सांगती ॥ पंचभूते नाचवितें । पंचभूते खेळविते । तया करितं भुतेखेते । एके ठायी नांदती ॥ एको विष्णो महद्भूत । पृथक भूते अनेक भूते । एके बोलिला भगवंत । गीते मंध्ये अर्जुना ॥ जे जे जयाला ध्याती । ते ते तया लोका जाती । संग त्यागे सुखी होती । महानुभाव सज्जन ॥ भूते भूत ते झाडिले । दासे आत्म निवेदिलें । पंचभूतिक सरलें । निवारले भवभय ॥*[६५]

काही ठिकाणी एकनाथांची ही आठवण होण्यासारखे प्रत्ययकारी वर्णन रामदासांच्या भारुडातून दिसून येते. 'सर्प' वर नाथांचेही भारूड आहे आणि रामदासांचे तुलनेसाठी नाथांच्या भारुडातील आशयही पाहण्यासारखा आहे.

साप चावला साप । अगा खागा अबाबाबा अरेरेरे । साप चावला साप ।

'स्वरूप मंदिरीं होते मी एकली' अकस्मात मायेच्या सांजवेळी अविद्येच्या बिळातून लोभमोहाचा दोन पट्ट्यांचा भुजंग सरकन बाहेर आला व त्याने करांगुलीला डंख मारला अशा लहरींनी देह तापला. विषय निंब कडू पण तो गोड झाला व भजनमूळ गोड असून कडू झाला. दारिद्र्याचा झेंडू आला व असत्य रक्ताच्या गुरूला आल्या । कामिनी कामाचे पित्त डोळ्यात आले, स्तुतिनिंदेने दात काळे झाले– सद्गुरू गारुडी बोलवा माउलीवो । गुरू गारुड्याने 'बोध वैराग्याचे पाजिले पाणी । विवेकांजन घातले नयनीं । अभेग स्वरूपाची विभूती अंगाला लावली, 'उतरला सर्प निवारली भ्रांति । एका जनार्दनीं आलिये प्रचीती वो ।[६६]

वाघ्या, बाळसंतोषा असे विषयही एकनाथांप्रमाणे रामदासांनी निवडले आहेत. सौरी म्हणजे वेश्या अथवा व्यभिचारिणी स्त्री. या सौरीवरील पाचही भारुडांत समर्थांनी शब्द अगदी

सडेतोड वापरले आहेत. कसलाच संकोच बाळगला नाही. 'रामदासकालीन परिस्थिती' या प्रकरणात रामदासांच्या तपश्चर्येच्या काळात त्यांना मानसिक संयम ठेवण्यास, लोभ-मोहापासून दूर राहण्यास किती कष्ट पडले असतील याचे वर्णन करताना 'उगिच राहे रांडे' हे भारूड दिले आहे. सौरीची भारुडे ही उपदेशासाठी दिली आहेत की त्यांच्या मनातील एकेकाळच्या संघर्षाची ती बाह्य अभिव्यक्ती आहे हे सांगता येत नाही.

**कूटस्थळे :** कबीराच्या पथात काही उल्टवासी म्हणून प्रकार आहे. वाकडे, विपरीत बोलून काही गूढता निर्माण करायची. आपण त्यांना कूटपदे म्हणतो. येशू ख्रिस्ताने जेव्हा जेरुसलेम शहरात प्रवेश केला त्या वेळचे वर्णन असे केले गेले आहे.

When fishes flew and forests voalked.

कबीराने असे विपरीत विचार काही ठिकाणी मांडलेले आहेत.

'नाव में नदियाँ डूबी है ।' नाव म्हणजे शरीर आणि नद्या म्हणजे षड्रिपु. ज्ञानेश्वरांचेही कूट अभंग प्रसिद्ध आहेत. रामदासांनीही भारुडात अशी कूट– गुंतागुंतीची रचना केली आहे. अंजन, उमाणा, खेळिया, ठकडे अशा काही भारुडांतून ही कूट स्थळे आलेली आहे. भारूड लोककाव्य असल्याने निर्भीडपणे लोकरूढ शब्दांचा वापर हा करावा लागतो. रामदासांची असे रूढ शब्द वापरले आहेत आणि त्यामुळे आपल्या भाषेला एक आगळे ओजस्वी प्रभावी रूप दिले आहे.

## काही हिंदी भारुडे

कानफाट्या, कुंटण, जागल्या पैकी एक जोगी, पांडे, बहुरूपीचे एक, बैरागी एक, इतकी भारुडे हिंदी भाषेत आहेत. ही भारुडे हिंदी भाषेतील कूळ पदांपेक्षा वेगळी आहेत आणि त्या दृष्टीने हिंदीत तो एक नवा प्रयोग आहे.

## अप्रकाशित लावणी व भारूड

एक अप्रकाशित लावणी बाड क्रमांक १२४४ वरून उतरून घेतलेली सोबत परिशिष्टात जोडली आहे. वास्तविक हा एक उपदेशपर फटका आहे. बाडात त्याला लावणी असे म्हटले आहे. यात काही पाठभेदही आहेत. 'सज्जना' याच्याऐवजी 'सजणा' असा शब्द घातल्याने लागलीच त्याला लावणीचे स्वरूप आल्यासारखे वाटते. अंतरंगात तो उपदेशपर फटकाच असल्याने लावणीचे शृंगारिक रूप त्यात दिसत नाही. फार तर 'आध्यात्मिक लावणी' असे म्हणता येईल.

'सोनार' हे अप्रकाशित भारूड बाड क्रमांक १७१/३ मधून घेतले आहे. हे भारूड ही इतर भारुडांप्रमाणे एक रूपक कथा आहे. सोनार ज्याप्रमाणे आपल्या दुकानातील केरकचराही गोळा करून त्यातून सुवर्णाचे कण कण गोळा करतो आणि आपले दुकान मांडतो त्याप्रमाणे आपण (रामदास) सोनार आहोत. देहाचे दुकान मांडले, पंचमहाभूतांचा हा देह– पंचरंगी आहे (कबीरानेही एके ठिकाणी या देहाला पंचरंगी चोला– वस्त्र म्हटले आहे) पण येथे आपली बागेसरी (शेगडी) पेटविली आहे. ती अधिष्ठानाची– ईश्वरी अधिष्ठानाची आणि ती पेटविण्यासाठी चार मुक्तींच्या विटा (अथवा चत्वारि वाणीच्या विटा) रचिल्या आहेत. त्रिगुणाच्या मुशीत अहंचा द्रवरस ओतला, ईश्वराकडे लक्ष या सांडशीने ही मूस धरली आहे. ज्ञानाचा अग्नी

चेतविला आहे. त्या रसाचा अलंकार करण्यासाठी 'सोऽहं'चा सुहाग (टाकणखार) लावला आहे. सुहागा-टाकणखाराचा उपयोग सोन्याला डाक लावताना करावा लागतो, नाहीतर डाक बसत नाही. इतक्यानंतर जो अलंकार बनेल त्याचे तुम्हांला पिसे (वेड) लागेल आणि इतकी कारागिरी करण्याचे कौशल्य रामदासांच्या माहेरी आहे. म्हणजे परंपरागत कौशल्य आहे हा भाव. हे सर्व सांगरूपक अगदी चपखळपणे भारुडात मांडले आहे. रामदासांची कविप्रतिभा येथे कुठे उणी पडलेली नाही किंवा निरीक्षणातही कोठे त्रुटी नाही, हे एक चांगले भारूड अप्रकाशित का राहिले कोण जाणे!

**डफगाणी :** याशिवाय दोन डफगाणी प्रसिद्ध आहेत. एक डफगाणे चाफळच्या राममंदिराचे वर्णन करणारे आहे. याचाच शेवट 'दास डोंगरी राहातो । यात्रा देवाची पाहातो' असा आहे. रामनवमीच्या उत्सवाचे वर्णन करून त्याचे वैभव कसे आहे, याबद्दलचा आनंद व्यक्त केला आहे. हे समर्थांचे आंतरिक समाधान आहे. पण डफावर गायिल्याकारणाने ते सर्वांना समाधानकारक झाले आहे.

हे वर्णन इतके चित्रात्मक आहे की चाफळला त्या काळी रथोत्सव कसा होत असेल याचे निराळे वर्णन करण्याची आवश्यकताच नाही. रामदासांनी हे वर्णन अगदी जिव्हाळ्याने केले आहे, हे सहज लक्षात येईल. हा जिव्हाळा हेच या डफगाण्याचे वैशिष्ट्य आहे. डफगाणे म्हणून लोकगीत म्हटले. पण वास्तविक हे अत्यंत आत्मनिष्ठ असे काव्य आहे. रामदासांना होत असलेले समाधान येथे पूर्णपणे व्यक्त झाले आहे. यात अलंकार कोणतेही नाहीत. तथापि रसवत्ता इतकी आहे की, रामदासांना झालेला आनंद व्यक्त झाल्याशिवाय राहातच नाही. संपूर्णपणे आत्मनिष्ठ (subjective) काव्याचे हे उत्कृष्ट उदाहरण आहे. या डफगाण्याव्यतिरिक्त आणखी एक डफगाणे आहे, हे सरळ शाहिरांच्या चढाओढीचे सवालजवाब चालले असता रामदास तेथे पोचले आणि त्यांनी या दोन्ही पक्षाच्या शाहिरांना निरुत्तर केले, प्रसंगाचे आहे. म्हणजे खऱ्या अर्थाने हे लोकगीत आहे. 'पृथ्वीचे वझन किती, किती आंगोळया गगन'[६७] असे हे सवाल आहेत; आणि अनंत ब्रह्मांडाची बेरीज किती? असा प्रतिसवाल विचारून रामदासांनी त्यांना निरुत्तर केले आहे. लावणीतून अध्यात्म पुढे येत गेलेच आहे. कदाचित हा आरंभ असेल. या डफगाण्याचे स्वरूप लावणीचे असल्याने लोकगीत म्हणून मानले पाहिजे.

## अप्रकाशित भारूड

### सोनार

*मी जातीचा सोनार । निज रूपाचा मी चोर ।। देही दुकान मांडिले । रज रज गोळा केलें ।।१।।ध्रु०।। आधिष्ठान बागेसरी । पाची रंग वाटा च्यारि ।।२।। त्रिगुणाची मूस केली । ज्ञानाग्नीने चेतविली ।।३।। लक्ष लाऊनी सांडस धरी । सोऽहं स्वाहागी ठेवीली वरी ।।४।। अहं वोतिला ब्रह्मरस । तुम्हां लागेल त्याचे पीसे ।।५ ।। रामदासाच्या माहेरी । सोनाराची कारागिरी ।।६।।*
बाड १७१/३

## अप्रकाशित लावणी

(समर्थांची गाथा या अनंतदास रामदासी यांच्या ग्रंथात क्रमांक १४५८ ला एक लावणी

दिली आहे. तिच्यात सहाच कडवी आहेत. खाली दिलेल्या अप्रकाशित लावणीत वरील गाथ्यातील लावणीची चार कडवी सारखीच आहेत. खालील लावणीत एकूण तेरा कडवी आहेत. म्हणून ही अप्रकाशित म्हणावयाची. ही बाड क्रमांक १२४४ तून उतरून घेतली आहे.)

**रामदास समर्थांची लावणी**

*ऐक सज्जना मनमोहना । संपति पाहता कोण्हाची । जाईल काया जाईल माया । उसणि आली पांचाची ॥धृ०॥ कौरव गेले पांडव गेले । वाणी वदला व्यासाची । छेपन कोटी यादव गेले । काया राहिली कृष्णाची ॥१॥ रावण ज्ञानी अभिमानी । लंका ज्याची सोन्याची । तेतीस कोटिबंदी घातले । धडिकडी हो त्याला जाची ॥२॥ सूर्यवंशी हो राम जन्मला । केवल माया भक्तांची ॥ हनुमंताने दहन केली । नगरी जाळिली पापाची ॥३॥ चापपाणी कशे वाणी । कुडि पडली त्याला रामाची ॥ रावणाची शिरें मोकळीं । काय हो त्याला टोची ॥४॥ हारा होरा निघोनि गेला । वेळ आली मृत्याची । लेक नातू अवघे गेले । वार्ता न कळे देहाची ॥५॥ दहा अवतार धरूनि हाजार । अभंग त्या मार्कंडयाची । चौदाकल्पे ऊन सोशिलें । छाया नाही गुपनेची ॥६॥ भृशुंडी ऐसे माहारुषी । रोम झडे त्या कल्पासी ॥ ऐसे ऐसे होऊनि गेले । काय कथा हो आणिकाची ॥७॥ मैनावती महासती । काया पाहाता पुत्राची । तनु साजिरी सुंदर गोरी । पिक दिसे हो आंतरिची ॥८॥ हा लोकसवें नर्का जातो । दृष्टि जाहली नयनाची । राज्य सांडुनि योगी जाला । दया त्याला सद्गुरूची ॥९॥ बाजी पठाना झाले ज्ञान । साक्षी त्याला हुंठाची ॥ कोण त्याचा देह चालवी । मूर्ति पाहीन मी त्याची ॥१०॥ राज्य सोडुनि वेडा जाला । शुद्धि नाही देहाची । बारा वरुषे रान हिंडता । भेटी रामचंद्राची ॥११॥ येक येति येक जाती । चौकी फिरे काळाची । ज्याचे गांठिसी पुण्य नाही । यम हो त्याला जाची ॥१२॥ सावध व्हावे भजन करावे । भक्ति करावी देवाची ॥ आता तरी गोष्ट ऐका । रामदास स्वामीची ॥१३॥धृ.*



# ४. अध्यात्मपर काव्ये

ह्या प्रकरणात सत्कार्योत्तेजक सभा, धुळे या संस्थेने केलेली 'श्री समर्थांची अकरा लघु काव्ये', देवांनी प्रसिद्ध केलेल्या 'श्री रामदासांची कविता खंड १ ला या ग्रंथातील 'षड्रिपु', 'पंचीकरणयोग', 'चतुर्थमान', 'मानपंचक', आणि 'पंचमान' ही पाच काव्ये, चित्रशाळा प्रेस पुणे या संस्थेने प्रसिद्ध केलेल्या 'श्री रामदासांची समग्र कविता' या ग्रंथातील 'अन्वय-व्यतिरेक' हे प्रकरण, धुळे येथील 'समर्थवाग्देवता मंदिर' येथील बाड क्रमांक १२४० मध्ये 'एकविसावा दशक' म्हणून असलेल्या हस्तलिखितातील समास ८, ९, १० व १० असे चार समास आणि एकवीस समासाच्या परिशिष्टात 'चतु:समासी' म्हणून ओळखले जाणारे चार समास अशा एकूण १९ अध्यात्मपर प्रकरणांचा विचार केलेला आहे. शेवटी सर्व काव्यांची मिळून संदर्भसूची दिली आहे.

ही सर्व प्रकरणे अध्यात्मपर आहेत. ह्या काव्यांतील तत्त्वज्ञानाचा विषय पुन:पुन: आला असला तरी त्या त्या काळात त्याचा विचार निराळ्या संदर्भात असल्याने पुन: केला आहे. तत्त्वज्ञान सारांशरूपाने सांगितले आहे.

### तत्त्वज्ञान हा ठेंगणा विषय

'पूर्वारंभ' हा काव्य तत्त्वज्ञानाची शिकवण देण्याच्या हेतूने निर्माण झाले असूनही ते काव्यात्मकतेने युक्त आहे असे स्पष्टपणे दिसून येते. अज्ञानी शिष्याच्या सर्व शंकांचे निरसन करून त्याला साधनमार्गाकडे प्रवृत्त करणे हा या काव्याचा हेतू. हा उपदेश आकर्षक पद्धतीने, आवश्यक तर अलंकारांचा उपयोग करून शिष्याच्या बुद्धीपर्यंत पोचवणे आणि हळूहळू त्याच्या अंत:करणाला तत्त्वज्ञान नेऊन भिडविणे अशी पद्धत या काव्यात अवलंबिली आहे. 'पूर्वारंभ' या काव्याचे स्थूल स्वरूप देवांनी खालीलप्रमाणे व्यक्त केले आहे.

"मला हा जन्म का झाला व मी या जन्म दु:खापासून कसा सुटेन, या शिष्याच्या प्रश्नापासून प्रकरणाचा आरंभ होऊन, शिष्याला स्वरूपज्ञान करून देण्यात त्याचा शेवट झाला आहे.. देव काही आपणाहून निराळा नाही. त्याची ओळख आपल्या अंतर्यामी न पाहता त्याच्या शोधार्थ शिष्य– अर्थात् मनाने– अष्टदिशा फिरला, वर अंतराळात गेला, खाली पाताळात गेला, पुन: वर आला, अति शिणला, पण स्वरूपाचा काही अंत लागला नाही, तेव्हा कष्टी होऊन बसला असता श्री सद्गुरुकृपेने अकस्मात् स्फूर्ती झाली."

*शिष्य बोले लडिवाळपणे । म्या संसार घेतला कोण्या गुणे । मज हे दु:ख भोगणे । किं निमित्त घडले । तरी हा जन्म कैसा तुटे । मज भगवंत कैसा भेटे । भवतारु बोहाटे । कोण्या गुणे दातारा* [१]

ही शिष्याची तळमळ रामदासांनी 'लडिवाळपणे', 'दु:ख भोगणे', 'दातारा' या शब्दांनी व्यक्त केली आहे. 'लडिवाळपणे' या शब्दातून गुरूबद्दलची भक्ती पितृभक्तीच्या तोडीची आहे हे दर्शविले जाते आणि सद्गुरूवाचून या संकटातून सोडविणारा कोणीच नसल्याने गुरूबद्दलचा

आदरभाव भक्तीत परिणत झाला आणि त्याच्या तोंडून 'दातारा' हे संबोधन निघाले. 'दु:ख भोगणे' या शब्दातही असेच औचित्य आहे. दु:ख हे भोगणे प्राप्तच आहे अशी अगतिकपणाची अवस्था 'भोगणे' या शब्दाने व्यक्त केली आहे. हे शिष्याच्या मनाचे शब्दचित्र आहे. या ठिकाणी अन्य उपमा-दृष्टान्तादी कोणत्याही अलंकाराची आवश्यकताच उरलेली नाही.

शिष्याने शंका विचारावी आणि गुरूने लगेच उत्तर देऊन ती निरसन करावी. पुन: शिष्याने गुरूच्या उत्तरातून निर्माण झालेला दुसरा प्रश्न विचारावा आणि गुरूनेही लगोलग समाधानकारक उत्तर द्यावे अशी प्रश्नोत्तरात्मक रचना करण्यात रामदासांचे कौशल्य दिसून येते. हा संवाद असल्याने यांत विसंगती काडीमात्र चालणार नाही. अनावश्यक शब्दाला येथे थारा नाही. जसा प्रश्न तसे उत्तर. प्रश्न स्पष्ट असला पाहिजे आणि उत्तरही नि:संदिग्ध, सुसंबद्ध आणि निश्चित असे पाहिजे. शंकेचे निरसन होण्याइतपतच विस्तृत; नसता पाल्हाळ नको. या काव्यातील प्रश्नोत्तरे सुटसुटीत, तरीही आशयघन आहेत. येथे शंकराचार्यांची आठवण होणे अपरिहार्य आहे.

समर्थांनी स्वरूपस्थितीचे लक्षण एका उपमेने पटविण्याचा प्रयत्न केला आहे.

'लवण अवघे सिंधु जले । तैसे स्वरूपी विराले ।..' आणि ही स्थिती सद्गुरुकृपेने लाभते असे सांगून हे प्रकरण संपविले आहे. शेवटी पुन: एकदा 'विनवी रामी रामदास । लडीवाळपणे ।' असा 'लडिवाळपणा' चा पुनरुच्चार करून रामदासांनी आपली वत्सलता गुरूच्या रूपाने प्रकट केली आहे.

अलंकार दर्शन- काही मोजक्याच अलंकारांचा उपयोग येथे केला गेला आहे.

रूपक : १) सद्गुरुवचन अंजन त्याला । माया भयानक न दिसे त्याला ।[२] २) जो गगनाची गवसणी । आणी गवसणीचाही धणी । धणीपणाची कडसणी । जेथे नाही ।[३]

उपमा : 'लवण अवघें सिंधु जाले । तैसे स्वरूपी विराले[४] ।

भाषाशैली : रामदासांची शब्दयोजना व भाषाशैली यांचाही या काव्यात परिचय होतो.

शब्दसंपत्ती : शब्द त्यांच्याजवळ स्वत:चा उपयोग करा म्हणून जणू काय धावत येतात आणि काही शब्दांवर तर त्यांचाच शिक्का आहे. रामदासांनी ते वापरले तेव्हा ते विशिष्टार्थ घेऊनच आले.

| | | |
|---|---|---|
| दुश्चित | – | बेसावध, बेफिकीर |
| वोहटणे | – | आटून जाणे |
| वाव | – | व्यर्थ |
| वेढा (वोढा) | – | आकर्षण, मोह |
| कडसणी | – | दोरी, बंधन |
| हिणसुधी | – | जाणीव हीन, अहंकारशून्य इ. |

ज्याप्रमाणे भावोत्कटता हा या काव्याचा विशेष गुण आहे त्याचप्रमाणे स्वरूपस्थितीसाठी मनाची जी धडपड चाललेली असते, त्याचे उत्कृष्ट वर्णन हाही या काव्याचा विशेष म्हटला पाहिजे.

## जुनाट – पुरुष

या लघुकाव्याचा विषय परब्रह्म, माया, ब्रह्मांडाची उभारणी असा तत्त्वज्ञानात्मक असून ते

तत्त्वज्ञान रूपकाच्या सहायाने एका कथेच्या द्वारे मांडले आहे. हे रूपक तसे पाहिले तर अगदी स्पष्ट आहे. यात दुर्बोध असे काही नाही. रूपक, उपमा, विरोधाभास आणि दृष्टान्त या अलंकारांचा सढळ उपयोग करून हे काव्य जवळजवळ संपूर्ण अलंकारमय करून टाकले आहे. हे काव्य तत्त्वज्ञानप्रधान असल्याने अलंकारांचा उपयोग, भावबळाचा आधार न घेता, विषय समजून सांगण्यासाठी केला आहे.

**कथावस्तू :** मूळ पुरुषाची –ब्रह्माची –माया ही कन्या. ही लहान, तिने स्वत: खेळ मांडला. हा खेळ 'खेळ' आहे. लुटुपुटूचा आहे. खोटा आहे (मायिक आहे) या मुलीला वास्तविक ओढ पित्याची आहे. खेळात ती 'काळ' पुत्राला जन्म देते (अर्थातच जन्म देणे हाही खेळच), आपणच आपला भ्रतार होते, आपल्या भ्रताराला ती आपणच जन्म देते, खेळाची उतरंड मांडते. 'काळ' पुत्र फार उनाड आहे. आपल्या आईचे खेळाकडे थोडेसे दुर्लक्ष झाले आहे असे दिसतानाच तो तिचा सारा खेळ उधळून लावतो असे अनेक वेळा होते. पित्याची आठवण काढावी तर खेळाकडे दुर्लक्ष होते. आणि मग काळ सारा खेळच मोडून टाकतो. खेळाकडे लक्ष द्यावे तर वडील दृष्टीआड होतात. त्यामुळे भांबावण्याचा प्रसंग येतो. म्हणून सगळा मोह बाजूला सारून पित्याकडेच धाव घेते. तेव्हा पिताही तिला जवळ घेतो.

'मग तयेसी भेटला । उभयतां आनंद झाला' पिता आपल्या पाठीशी उभा असल्याने आश्वस्त होऊन तिने पुन: खेळ मांडला.

## कथावस्तूचे सौंदर्य

मूळ विषय गहन तत्त्वज्ञानाचा असूनही मायेला लहान मुलगी मानून तिच्या खेळाचे रूपकार्थाने वर्णन करणे ही कल्पना हृद्य आहे. मायेच्या स्वाभाविक चंचलतेचे अत्यंत उचित अशा कन्यापिता रूपकाचे केलेले वर्णन भावपूर्ण आणि शब्दचित्रात्मक आहे. ते इतके प्रभावी आहे की जेव्हा रामदास शेवटी कन्या आणि पित्याच्या भेटीचे वर्णन करतात की 'मग तयासी भेटला उभयता आनंद झाला' तेव्हा कन्या-पित्याच्या– पिता-पुत्रीच्या भेटीचे दृश्य डोळ्यासमोर उभे राहून वात्सल्याच्या त्या रसमय समुद्रात रसिक डुंबून गेल्याशिवाय राहात नाही. बुद्धिस्पर्श हा काव्याचा हेतू असूनही भावस्पर्शाच्या बळाने बुद्धीला झालेला स्पर्श कळूनही येत नाही. हे सर्व रूपक प्रतिमा निर्माण करणारे आहे. खेळ खेळून लहान मुले झोपी जातात, दमतात. हे चित्र अगदी थोडक्यात वर्णिले आहे :

## अलंकार– सौंदर्य

सर्वच्या सर्व काव्यच रूपकालंकारात रचिले आहे. पण या रूपकातही अंतर्गत अलंकारांचा उपयोगही सुसंबद्ध रीतीने केला आहे.

दृष्टांत – १) ना तरी पवनाचेनि तारुं । लंघित जायसागरुं श्रवणे तैसा विश्वंभरु । पाविजेत आहे[५]

किंवा

हातीचे रत्न जळीं गळे । खडळ होतातें नाडळे । निवांत जळ निवटे । तरीच लाभे[६]

रूपक – १) सद्गुरु कृपेचे भातें । आंगी बाणलें पाहिजे[७]

उपमा – १) जैसा क्षुदिस्त । भोजनी तृप्त होय २) पिता तापसी जैसा वन्ही[८]

विरोधाभास – १) दृढ अर्थाचेनि संगे । नि:संगे होये

२) पुत्रतयेचा (कुमारीचा)

३) संतान वाढे लक्षवरी । परी ते टांईची कुमारी
नाव ठेविता उदरी । पिता आला
पिता उदरासी आला । परी तो नाही जन्मला
भर्तार स्वयें आपुला । होऊन ठेली[९] ...इत्यादी

## भाषाशैली व शब्दयोजना

या काव्यात समर्थांची भाषाशैली व शब्दयोजनाचातुर्य प्रत्ययाला येते. समर्थांचे शब्द खास त्यांच्या टाकसाळीतून बाहेर पडलेले असतात. ते ते शब्द त्याच अर्थाने तेथे आपले स्थान निर्माण करतात. त्यांच्याऐवजी दुसरे शब्द चालत नाहीत.

क्षुधिसा (भुकेलेला), बहुसाल (विपुल), ढम काहाणी, खडुळ (गढूळ), लिगटणे, वित्पत्ति, कडाफोडी, बोहरी, येकट, वेढा लावणे, विषय टकळा, विंगुंतणे, वास पाहाणे, झळंबणे, इत्यादी हे सारे शब्द समर्थांचे आहेत. हे न सांगताही समजण्यासारखे आहे.

भाषाशैलीच्या दृष्टीने खालील प्रयोग विचारणीय आहेत–

हे कथा –ही कथा

पवनाचेनि तारु –पवनामुळे

कांते –किंवा

असे कितीतरी वैशिष्ट्यपूर्ण प्रयोग रामदासांच्या भाषेची शैली म्हणून सांगता येतील.

## औषधी ज्ञान

'सद्गुरु कृपेचे भाते' या शब्दसमूहातील 'भाते' हा शब्द औषधी–द्योतक आहे. 'वाकेटीचे भाते' ही एक मुळी आहे व ती औषध म्हणून वापरली जाते. सद्गुरुकृपा हे रामबाण औषध आहे असे रामदासांना सुचवायचे आहे. येथे रामदासांचे औषधी ज्ञान व्यक्त होते.

## जुनाट पुरुषाचे विषयविभाजन

फक्त ५७ ओव्यांचे हे काव्य आहे. हे छोटेखानी काव्य 'काव्य' या नामाभिधानाला निश्चित पात्र आहे. तत्त्वज्ञान काव्य हातात हात घालून चालत असलेले दिसून आल्याने रामदासांच्या कवित्वाविषयी शंका उरत नाही. अलंकार-योजना, भाषासौंदर्य, कलापूर्ण रचना कौशल्य, प्रतिमासृष्टी निर्माण करण्याची क्षमता, चमत्कृतीपूर्ण विषयाची मांडणी या सर्व दृष्टींनी हे काव्य 'काव्य' या नामाभिधानाला पात्र आहे.

# अंतर्भाव

'अंतर्भाव' हे समर्थ रामदासांचे एक लघुकाव्य, आकाराने लहान पण गुणाने महान आहे. समर्थांचे काव्यगुण या काव्यात उत्कटपणे प्रकट झाले आहेत. शिष्याबद्दल त्यांची कळकळ,

त्यांचे अज्ञान दूर करण्याची त्यांना लागलेली तळमळ, तत्त्वज्ञानाचा आवाका समजून सांगताना उपमा, रूपक, दृष्टान्त आदी अलंकारांच्या सहाय्याने विवेचनाला आणलेला सोपेपणा आणि सौंदर्य, निश्चित रोखाने निश्चित मार्ग सांगून त्या मार्गाने गेल्यास निश्चितपणे फलप्राप्ती, ईश्वरप्राप्तीचा प्रयत्न आणून देण्याचा विश्वास अशा कितीतरी दृष्टीने 'अंतर्भाव' हे काव्य सरस वठलेले आहे. ज्ञानेश्वरांची आठवण व्हावी अशी भाषाशैली आणि प्रसादगुण यांचे दर्शन या काव्यात झाल्यावाचून राहात नाही.

तरी आता काय जी करावे ।

या काव्याचे एकूण सहा समास आहेत व एकूण ११९ ओव्या आहेत. यातील ४ ओव्या समासाच्या शेवटच्या ध्रुपदासारख्या आहेत.

इति श्री अंतर्भाव । जन्ममृत्यु समूळ वाव । रामदासां गुरुराव । प्रसन्न जाला ॥१०

एवढ्या सोडल्यास ११५ ओव्यांत हा ग्रंथ संपविला आहे.

पहिल्या समासाचा विषय शिष्याची शंका प्रभावीपणे मांडणे हाच होय. हाच या ग्रंथाता उपोद्घात.

### मायिक देहसंबंध

"स्वामी । आपण अंतर्ज्ञानी आहा. सर्व जाणताच आहा. तेव्हा मी आता काय करावे, समाधान कसे मिळवावे हे कृपा करून मला सांगावे ।"

शिष्याची ही आर्ततेची स्थिती समर्थांनी प्रभावीपणे रेखाटली आहे. संसारतापाने पोळलेल्या माणसाचे हे शब्दचित्र आहे– नव्हे– त्याच्या उद्वेगाच्या मन:स्थितीचे हे चित्त– मानसचित्र आहे. हे मनोविश्लेषण आहे. संसारदु:खात बुडून गेलेल्या व त्यातून वर निघण्यास वाट न सापडणाऱ्या सामान्य माणसाचा हा शिष्य प्रतिनिधी आहे. अर्जुन जसा 'शिष्यस्तेऽहं शाधिमां त्वां प्रपन्नम' असे म्हणत कृष्णापुढे अज्ञानी माणसांचा प्रतिनिधी म्हणून उभा आहे तसा.

दु:खाचे मूळ असणाऱ्या संसाराच्या दु:खातून कसे सुटावे हा मौलिक प्रश्न समर्थांनी उभा केला आहे. दुसऱ्या समासाच्या पहिल्याच ओवीत समर्थांनी शिष्याच्या दु:खाचे स्वरूप ओळखल्याचे सांगितले आहे. समर्थांनी येथे दृष्टान्तांनी हे पटविले आहे. कर्म सोडून सुटत नाही. शेतकऱ्याने शेत नांगरण्याचे सोडून दिले तरी पहिली थकबाकी देणे त्याला सुटत नाही तसे मागील कर्म भोगल्यावाचून कसे सुटणार? अशा प्रकारे शिष्याला हळूहळू साधनमार्गाकडे आकर्षित केले आहे.

## आत्माराम

'आत्माराम' या छोटेखानी ग्रंथाचे परीक्षण तत्त्वज्ञानाचा ग्रंथ व काव्य या दोन्ही दृष्टीने करणे शक्य असले तरी तत्त्वज्ञान म्हणूनच त्याला अधिक मान्यता मिळालेली आहे, हे विसरता येत नाही. या ग्रंथाचे पाच समास असून एकूण ओवीसंख्या १८३ आहे. 'त्याग-निरूपण', 'माया-निरूपण, 'ब्रह्म-निरूपण', 'साधन-निरूपण' आणि 'स्वानुभव-निरूपण' अशी पाच समासांची नावे असून ती विषयसूचकही आहेत. या ग्रंथाची शैली संवादात्मक आहे. शिष्याने विचारलेल्या प्रश्नांची उत्तरे देऊन शिष्याला स्वरूप साक्षात्कारापर्यंत नेऊन पोचविण्यासाठी या ग्रंथाचा अवतार आहे. "एकंदरीत आत्माराम हा मीपणा– अभिमान– अहंकार– देहबुद्धी– मी–

माझेपण आदी नष्ट करण्याकरिता व स्वरूपपद प्राप्त्यर्थ प्रवृत्त झालेला ग्रंथ होय.'' असे उद्गार श्री कल्याणसेवक महाराजांनी प्रस्तावनेत काढले आहेत.

## तत्त्वज्ञान

आत्मारामातील तत्त्वज्ञान साररूपाने असे आहे–

''जन्म-जन्मांतरींच्या आठवणी आणि संबंध या जन्मात राहात नाहीत. या जन्मातील संबंध तरी कुठे राहणार आहेत? तेव्हा असा विचार केला पाहिजे की– येथे 'केवळ माझे' असे म्हणता येण्यासारखे काही आहे काय? आसक्तीच जन्माला कारण होते. ती आसक्ती सोडून आपल्या मूळ ठिकाणी जाणे हे योग्य. आपली उत्पत्ती परमेश्वरापासून झाली असल्याने आपण तद्रूपच आहोत. परंतु याचा विसर पडल्यामुळे जन्ममृत्यूच्या भवसागरात आपण अडकलो आहोत. अभिमान सोडला की भवसागराच्या पैलतीराला पोचल्यासारखेच आहे. 'मी जीव' म्हणून ईश्वरापासून वेगळेपणा धरून बसल्यामुळेच संसाराचे तीव्र दुःख भोगणे प्राप्त होते. 'मी-माझे' ही माया आहे.

मायेने निर्माण झालेले सर्व नाशवंत आहे. नाशवंत जे जे आहे, ते ते सर्व टाकून दिले पाहिजे. 'अहं' हे मायेचे लक्षण आहे. नाशवंत ते ते सर्व मलीन आहे. लोखंडाच्या गोळ्यावर जर मळ साचला तर परिसाचा स्पर्श लोखंडाला होणार नाही आणि मूळचे लोखंड सुवर्णात रूपांतरित होणार नाही. मायेचे स्वरूप असे आहे. 'मी आहे' हे अस्पष्ट भान हेच मायेचे खरे स्वरूप. हीच माया पुढे सत्त्व, रज, तम हे त्रिगुणात्मक रूप धारण करते. तमोगुणापासून आकाशादी पंचमहाभूते निर्माण झाली म्हणजेच मायेपासून अष्टधा प्रकृती निर्माण झाली आणि यथावकाश ही सृष्टी निर्माण झाली. ज्ञेय, ज्ञान, अपदा, ध्याता, ध्येय, ध्यान इत्यादी त्रिपुटीला प्रथम अहंपणाची मूळ जाणीवच कारण असल्याने हा सर्व मायेचाच विस्तार होय. जीव, शिव आणि ईश्वर हाही मायेचाच विस्तार आहे.

मीपणा काढू गेले असता उलट मीपणच वाढत जाते. म्हणून उत्तम मार्ग म्हणजे मीपणाच्या वृत्तीचा ध्यासच लागू नये. तिची जाणीवच होऊ नये. 'अहं ब्रह्मास्मि' हीही जाणीवच असल्याने नाशिवंत होय. ती सुद्धा सोडली पाहिजे. ब्रह्मत्वाच्या अनुभवाच्या वेळी अत्यंत सूक्ष्म का होईना, जाणीव ही असतेच. तिच्यावाचून अनुभव येणेच शक्य नाही. तिचाही निःशेष लय झाल्यावर जी निरालंब, मनातीत, अवर्णनीय अशी परमशांत स्थिती उरते, तेच सत्यस्वरूप होय. हा अनुभवाचा रसास्वादही ज्याला समजतो तोच अनुभवातीत असा आत्मा होय. यासाठी साधन कोणते? अत्यादराने श्रवण, अध्यात्मनिरूपणाचे श्रवण. त्याचे मनन करता करता जी उन्मनी अवस्था होते ती निदिध्यासाने– सतत अभ्यासाने दृढ करणे, यामुळेच समाधान मिळते. असा व्यासंग नित्य केला असता दिवसानुदिवस वृत्ती शुद्ध, निर्मळ होत जाते. ग्रंथातील निरूपणाने श्रोत्याची वृत्ती संस्कारित होत होत तदाकार बनते. म्हणून विषयांचे वर्णनात्मक लौकिक साहित्य कामाचे नसून, भक्तिज्ञान वैराग्यवर्धक श्रेष्ठ अध्यात्मनिरूपणाचे ग्रंथच श्रवण करीत जावे.

जीवन्मुक्तांनी सुद्धा पाच भौतिक धात्वादी मूर्तींची उपासना केली आहे. पण त्यांना मोक्ष कसा मिळाला? या शंकेचे उत्तर समर्थांनी असे दिले आहे.

प्राण्यांचे जीव स्थूलदेह सोडल्यानंतरही वासना उरल्याने, सूक्ष्मदेहाने असतात, अतृप्त

वासनांच्या तृप्तीसाठी योग्य तो स्थूल देह ते धारण करतात. वासना अज्ञानामुळे संभवते म्हणून या सूक्ष्म देहाचे निवासस्थान त्याचे अज्ञानरूपी शरीर म्हणजे कारण शरीर होय. जे अज्ञान तोच कारण देह. आणि 'तो आत्मा मीच आहे' असे जे ज्ञान म्हणजे जे अज्ञानरूपी कारणाचेही कारण त्यालाच महाकारण देह असे म्हणतात. हे दोन्ही देह वृत्यात्मक असतात. स्थूल आणि सूक्ष्म देहांसारखे आकारात्मक नसतात. वृत्तीला आधारभूत मन तेच नाहीसे झाले तर परत वृत्तीच उत्पन्न होणार नाही आणि अर्थातच तो पुनरावृत्तीतून सुटला तो मुक्त झाला हे निश्चित होय.

भजन-पूजनामुळे जन्ममरणरूपी संस्कृतीचे मूळ जो अहंकार तोच नष्ट होतो. मी तेच आहे असे अद्वैतज्ञान प्राप्त झाल्यानंतर 'मी' व 'ते' हे अतिसूक्ष्म भिन्नत्वही जाऊन एकत्वाचा अनुभव आला म्हणजे ज्ञानाचे विज्ञान झाले. यालाच आत्मनिवेदन म्हणतात, अशा आत्मनिवेदनाची स्थिती प्राप्त झाल्यानंतर पुनरावृत्ती कोठली? म्हणून समर्थ म्हणतात, आत्म म्हणोनी देखणीयास मिठी । घालू आतां मोक्षाची सुटी । म्हणोनिया उठाउठी । आत्मनिवेदन करावे ।। ४-३१.

हे तत्त्वज्ञान आता किती रसाळपणे समर्थांनी सांगितले आहे. ते पाहावयाचे.

## अलंकार

एवढ्याशा छोट्याशा काव्यात तत्त्वज्ञान समजावून सांगण्यासाठी अलंकारांचा उपयोग योग्यपणे केलेला दिसतो. रूपक, दृष्टांत, अतियशोक्ती, विरोधाभास, उपमा या अलंकारांचा वापर या काव्यात केलेला आहे.

सद्गुरूंच्या स्मरणाने सद्‌गदित होऊन रामदास कृतार्थाचे उद्गार काढतात.

उदा. *स्वामी कृपेचा लोट आला । मज सरोवरी सामावला । पूर्ण जालियां उचंबळला । अनुभाव उद्गार ।।*[११]

आणखी एका ओवीत मायेला 'अंजन' म्हटले आहे हे अंजन गुप्त धनाचा ठेवा दाखविते. स्वस्वरूप हा तो ठेवा होय आणि माया हे ते अंजन.

*माया परमार्थाचे अंजन । मायेकरिता जोड निधान । मायेकरिता सावधान । साधक स्वरूपी ।।*[१२]

ही सारी रूपके उचित आहेतच पण सखोल, गंभीर अर्थ प्रकट करणारी आहेत. हे रामदासांचे वैशिष्ट्य आहे. याशिवाय ओघात आलेली संसारधर्म, भवरिपु सारखी रूपके उपयोजिली आहेतच.[१३]

**दृष्टान्त–** सद्गुरूच्या मुखातून निघणाऱ्या उपदेशाच्या उद्गारांना शिष्याने श्रवणपुटात सामावून घ्यावे व त्याचे मनन करावे असे सांगताना रामदासांनी दृष्टान्ताचा उपयोग करून आर्तता कशी असावी ते सांगितले आहे.

*चातकपक्षी वरीचा वरी । चंचु पसरुन थेंबुटा धरी । जीवन सकळहि अव्हेरी । भूमंडळीचे ।।*[१४]

अशी चातक पक्ष्याची आर्तता शिष्यात असली पाहिजे.

अग्नीमध्ये तापवून लाल झालेल्या कच्च्या लोखंडाच्या गोळ्याला घणाने ठोकले असता त्याचे मलीनत्व (गंज) नाहीसे होते, इतके की नंतर परिसाच्या नुसत्या स्पर्शानेही त्याचे लोखंडत्व समूळ जाऊन सुवर्णात रूपांतर होते. जर त्या गोळ्याचा मळ झडून गेला नाही, तर त्याच्या आतले शुद्धत्वही स्पष्ट होणार नाही. अशा स्थितीत परिसाच्या स्पर्शानेही त्याचे लोखंडपण जाणार नाही. म्हणून नाशवंत ते मलीन आहे असे समजून त्याचा त्याग कर.

अग्निसंगे लोहो पिटे । तेणे तयाचा मळ तुटे । मग परिसेसी झगडता पालटे । लोखंडपण तयाचे ॥[१५]

## उपमा

ज्याप्रमाणे परिसाच्या सामर्थ्याने तुच्छ लोखंडात सुवर्णाचे दिव्यत्व येते त्याप्रमाणे सद्गुरूंच्या अमृतमय प्रवचनांच्या अंत:स्पर्शाने त्यांच्यात नित्य विराजमान असलेला निजनिरतिशय शांतीच्या केवलत्वाचा अवर्णनीय भाव अकस्मात शिष्याच्या हृदयात उदित होतो. येथे परिसाची उपमा सद्गुरूंचे सामर्थ्य दर्शविणारी आहे.

*जे स्वामीच्या हृदइ होते । ते शिष्यासी बाणलेस अवचीते । जैसे सामर्थे परीसातें लोहोआंगी बाणे ॥*[१६]

## विरोधाभास

विरोधाभास अलंकारही दोन ठिकाणी आला आहे. ब्रह्म नाशिवंत नाही. शब्द नाशिवंत आहे. त्या शब्दातील नि:शब्द म्हणजे अविनाशी तेवढेच भावार्थाने ग्रहण करण्यास रामदास सांगत आहेत.

*जयाचेनि वेदशास्त्रपुराणे । जयाचेनि नाना निरुपणे । जयाचेनि स्वसुखा लाभणे । शब्दी नि:शब्द ॥*[१७]

तसेच ब्रह्माचा दाटपणा सांगतानाही विरोधाभासाचा उपयोग केला आहे. हा केवळ विरोधाभास नाही, तर विरोधाभास अलंकाराचाही आभास आहे. कारण ब्रह्म सर्व ठिकाणी इतके ओतप्रोत आहे की जे जवळही आहे व दूरही आहे. म्हणजे 'दूर असून जवळचे आहे' असा विरोधाभास येथे नाही.

*जे बहुता दुराघी दुरी । जे निकटचि जवळी अंतरी । दुरी आणि अभ्यंतरी । संदेहचि नाहीं ॥*[१८]

असे ब्रह्माचे सर्वव्यापकत्व अलंकाराच्या आधारे दाखविले आहे.

## भावसौंदर्य

केवळ अलंकारांचा उपयोगच रामदासांनी केला आहे असे नाही. वात्सल्याचा भाव सर्व काव्यात एकसारखा अनुसरून झालेला आहे.

रामदास म्हणतात– *तुवां आशंका नाही घेतली । परंतु मज तुझी चिंता लागली । कां जे तुझी भ्रांति फिटली । नाहीच अद्यापी ॥*[१९].

याशिवाय शिष्याला संबोधताना 'बापा', 'प्राणसखया' अशी योजलेली संबोधने वात्सल्यच दर्शवितात.

अशा प्रकारे भावनोर्मींचा विलास संपूर्ण काव्यात विस्तारलेला आहे. हेच काव्यत्व नाही काय?

## शब्दसामर्थ्य

समर्थांचे शब्दसामर्थ्य जबरदस्त आहे. शब्दासाठी त्यांना अडून बसावे लागत नाही. शब्द त्यांच्या स्वाधीन आहेत. एखादे वेळी शब्दरूप यमक, प्रास, यती यांच्या बंधनात बसेनासे

झाले तर ते त्या शब्दाला नीट करून घेतात. त्याच्याऐवजी दुसरा शब्द वापरत नाहीत. कारण त्या शब्दाच्या अर्थाची जी छटा तेथे उपयोगाची असते तिच्याऐवजी दुसरा शब्द घालणे म्हणजे अर्थहानी होय. अशा वेळी ते शब्दाच्या मूळ बाह्यरूपातच अनुकूल फेरफार करून घेतात.

चुंब (चोच), तुवां (त्वां), तां (त्वां), तरी (तर), प्रकुर्ति (प्रकृति), स्व-इच्छा (स्वेच्छा), सीध (सिद्ध), मुरालिया (मुरलीया-मुरल्यावर), दर्पु (दर्प), अक्षईपद (अक्षयपद) अशी रूपे करून ते त्या शब्दांचा उपयोग करून घेतात.

## आत्मविश्वास

आत्माराम या ग्रंथाचे महत्त्व त्यात व्यक्त झालेल्या आत्मविश्वासामुळे वाढले आहे. समर्थांना आत्मसाक्षात्कार झाला होता, त्याचा प्रत्यय आला होता हे नि:संदिग्धपणे या ग्रंथात प्रकट झाले आहे.

*आणि विश्वासी माझिया बोला*[२०] *ते जरी तुझे गुज दिधले । तरी मज काय देसी? अरे भूषण भिक्षेचे सांडले । आणि राज्यपद प्राप्त झाले । तरी तुझे काम गेले । सांग बापा ।।*[२१] *तो शिष्य म्हणे दिधले । स्वामी म्हणवी पद लाभले । उन्मनी अवस्थेचा प्रांतु । तें स्वरूप तुझें ।।*[२२]

अशा अनेक स्थळांवरून समर्थांचा आत्मविश्वास व प्रत्यय स्पष्टपणे दिसून येतो आणि याचमुळे मोक्षसाधनाचा निश्चित मार्ग सांगणारा हा ग्रंथ म्हणून याचे मूल्य आगळेच आहे.

# पंचसमासी

**सद्गुरुप्रेमी :** पहिल्या समासात सद्गुरूबद्दल अपार प्रेम व्यक्त झाले आहे. समर्थांचे गुरू प्रत्यक्ष श्रीरामच. या समासात श्रीरामाचे महत्त्व गाताना समर्थांच्या वाणीचाच ओघ लक्षात घेण्यासारखा आहे. रामाचे वर्णन करताना ते देहभान विसरतात याचा प्रत्यक्ष पुरावाच येथे मिळतो. ग्रंथाच्या आरंभी गणेश व शारदेचे वंदन करण्याची रामदासांची प्रथा आहे. विघ्नहर्त्या गणेशाचे नमन सर्वच प्राचीन ग्रंथांत आढळते. पण शारदेचे वर्णन येतेच असे नाही. परंतु रामदास गणेशवंदनानंतर लागलीच शारदा , सरस्वती, कुलदेवता यांना वंदन करतात.

## आत्मनिश्चय

दुसऱ्या समासाचे नाव 'आत्मनिश्चय' असे आहे. अज्ञान म्हणजे काय आणि ब्रह्मज्ञानाचे लक्षण काय याचे विवेचन या समासात केले आहे.

(१) *जेणे निरसे हे अज्ञान । त्या नाव ब्रह्मज्ञान ।*[२२ अ]

(२) *सस्वरूपी सावधपण । हेचि ज्ञानाचे लक्षण ।।*[२३]

असे ज्ञानाचे लक्षण सांगून अज्ञान म्हणजे काय हेही समजावून सांगितले आहे.

## साधनेची प्रतिष्ठा

तिसऱ्या समासात साधनेची प्रतिष्ठा प्रतिपादिली आहे. अज्ञानामुळे या संसाराच्या जाळ्यात गुरफटलेला जीव सहजासहजी ब्रह्मप्राप्तीसाठी प्रयत्न करण्यासाठी कसा धडपडेल? आणि हा मोह तरी थोड्या काळापुरताच होता काय?

*अनंत जन्मीचा काट जडला । अभ्यासचि पडोनि गेला । तो तितुकाही झाडिला । पाहिजे कीं ।*[२४]

तेव्हा साधनाची आवश्यकता आलीच. विवेक हा सहजासहजी कसा आठवेल? हे एक दृष्टान्ताने पटविण्याचा प्रयत्न केला आहे.

*मळीण वस्त्र धुतांधुतां । तेणे पावे ते शुद्धता । तैसा साधक तो भगवंता । साधने पावे ।।*[२५]

परंतु साधनाने सिद्धी प्राप्त झाली की मोह होतो. सिद्धी हे अंतिम ध्येय नव्हे.

*म्हणोनी जाणते पुरुषी । सोडूं नये साधनासीं । नाडू नये आपणासी । सीधपणे सर्वथा ।।*[२६]

असा इषाराही देऊन ठेवला आहे.

चौथ्या समासात सहज ओघाने आलेला विषयच चर्चिलेला आहे. साधन करावयाचे ते कसे? 'भक्तिसाधन' असे या समासाचे नाव आहे आणि भक्ती नवविधा आहे म्हणून श्रवण, कीर्तन, विष्णुस्मरण, पादसेवन, पूजन, अर्चन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन अशा नवविधा भक्तीचे विवरण या समासाचा विषय आहे. नवविधा भक्तीला नऊ पायऱ्यांची उपमा समर्थांनी दिली आहे.

## आत्मनिवेदन

दासबोधात बाराव्या दशकाच्या पाचव्या समासात १६ ते २२ ओव्यांपर्यंत आत्मनिवेदनाचे विवेचन आहे. आत्मनिवेदन तीन प्रकारचे आहे असे समर्थांनी मानले आहे. १. जड, २. चंचल, ३. निश्चल. मीपणासह माझे सर्व पदार्थ मी, माझे मन, शरीर व वाणी, तसाच सगळा प्रपंच हे सर्व देवाचे आहे अशी जी बुद्धी (निश्चयात्मक विचार) ते जड आत्मनिवेदन होय (यामुळे अंतःकरणात जड देहाचा अहंकार उरत नाही.) चंचल सृष्टीचा कर्ता जगदीश्वर असून सर्व प्राणी त्याचे अंश आहेत, सर्वत्र त्याचा तोच आहे. आपण म्हणजे मी किंवा जीवात्मा कोणी वेगळा नाही. सर्व कर्ता एक देव, आपण जीवात्मा याचा कोठेच ठिकाणा नाही असा विचार बाणणे हे चंचल आत्मनिवेदनाचे लक्षण आहे. चंचल हे स्वप्नातील पदार्थांप्रमाणे असून ते टिकत नाही. देव हा निश्चल निराकार (तेच माझे खरे स्वरूप आहे) हे निश्चल आत्मनिवेदन समजावे. आधी चंचलच मुळात नाही तेथे मी चंचल जीव कोठून राहणार? असा विचार हे निश्चल आत्मनिवेदनाचे लक्षण होय.''[२७]

## आत्मदर्शन

पाचव्या समासाचा विषय 'आत्मदर्शन' असा आहे. नित्य अनुसंधान कसे असते याची कल्पना स्वामी शिष्याला देत आहेत.

*वृत्ती गुंतली स्वानुभवे । जना तोचि भासे आघवें । सबाह्य व्यापिले देवें । ब्रह्मांड आवघें ।।*
*वृत्ति मुळाकडे पाहे । तंव रामचि दिसताहे । स्तब्ध होऊनिया राहे ।तंव रामचि दिसे ।।*

असे राममय झाल्याचे जाणवते. हे आत्मदर्शन होय.

**दृष्टांत :** आपले आराध्य दैवत परमगुह्य असूनही गुह्यातीत असल्याचे सांगून विरोधाभास निर्माण केला आहे. तर कोठे मनुष्य अशुद्धतेपासून शुद्धतेपर्यंत कसा पोचतो हे दृष्टान्ताच्या आधारे स्पष्ट केले आहे.

उदा. मळीण वस्त्र धुता द्युता । तेणे पावते शुचिता ।

### उपमा

समाधानी माणसाच्या लक्षणाचे सूचन एका उपमेने किती चपखलपणे रामदासांनी दाखविले आहे हे पाहण्यासारखे आहे.

*समाधानी तो आगळा । तेथे भक्तीचा जिव्हाळा । जैसा ते गुहाची कळा । आंगण सांगे ।।*[२८]

### रूपक

*'शब्दमंथन शब्दे वेलें । अर्थ नवनीत प्रगटले । मथनकर्त्यासि भक्षिले । तया नयनीजे ।।*[२९]

यात रूपकाचा वापर केला असूनही अर्थ कूट असल्याचेही स्पष्ट केले आहे.

असे हे रूपक कूटार्थयुक्त असूनही कल्पना सहज लक्षात यावी अशा रीतीने रचना केली आहे.

## सप्तसमासी

### एकविसावा दशक?

'सप्तसमासी' हे एक लघुकाव्य म्हणून संग्रहित केले असले तरी त्याचे सातही समास स्फुट आहेत, त्यांचा एकमेकाशी कोणताही संबंध नाही. ते सातही समास स्वतंत्र आहेत असे नानासाहेब देवांनी समर्थ हृदयात म्हटले आहे.[३०] परंतु यातील प्रत्येक समासाच्या शेवटी 'इति श्री दासबोधे गुरुशिष्य संवादे' असे म्हटले असल्याने एक निष्कर्ष काढावयास हरकत नाही की हे सर्व समास दासबोधात घालण्यासाठीच लिहिले गेले आणि नंतर दासबोधाची जेव्हा वीस दशकांत जुळणी झाली त्या वेळी हे स्फुट समास बाजूला पडले. मग हे एके ठिकाणी वरून कोणी तरी 'सप्तसमासी' असे नाव दिले असावे म्हणून या काव्याला एक काव्य असे म्हणता येत नाही. या सातही समासात आणखी तीन समास जोडून त्या दहाही समासांना 'एकवीसावा' दशक असे नाव कोणीतरी दिले असावे असे दिसते. म्हणजेच आणखी तीन समास हेही स्फुट स्वरूपात कोठल्याही दशकात समाविष्ट न झाल्याने या दहाही समासांचा एक दशक आणि तो एकविसावा दशक असे त्या संग्रहकर्त्याने म्हटले असावे. 'एकवीसावा दशक समर्थांनी कधीच लिहिला नव्हता'[३१] असे विधान देवांनी केले आहे. याचा अर्थ या दशकाचे कर्तृत्व रामदासांचे नव्हते असे देव मानतात असा घ्यावयाचा नाही. देवांनाही हा अर्थ अभिप्रेत नसावा. हे सर्व दहा समास लिहिले आहेत रामदासांनीच, पण त्यांचा समावेश दासबोधात केला नाही इतकेच.[३२]

### प्रकाश निरूपण

पहिला समास ३२ ओव्यांचा असून 'प्रकाश निरूपण' असा त्याचा विषय आहे. ब्रह्म 'स्वयंप्रकाश' आहे असे म्हणतात तो कसा असा शिष्याचा प्रश्न आहे. त्याला उत्तर देताना रामदास म्हणतात,

*'ब्रह्मजे कां सनातन । तेथे प्रकाश नाहीं ।।*[३३]

मग 'प्रकाश' असे का म्हणतात ही शंका उद्भवते, त्याला उत्तर देताना समर्थांनी सांगितले आहे की,

*अंतरी जेजे कळत जाते । त्यास प्रकाश ऐसे म्हणजेते ।*[३४] *उजेडा सारखे वाटतें । परी ते नव्हें ॥*

पदार्थ प्रकाश दृष्टीला दिसतो.[३५] आत्मप्रकाश मनाला भासतो, आत्मप्रकाश म्हणजे ज्ञानस्फूर्ती-ज्याला जगज्योती म्हटले जाते, म्हणून त्याचा काही ज्योत असा अर्थ नव्हे. हे समजावून सांगताना श्री समर्थांनी एक दृष्टांत दिला आहे, तो त्यांच्या स्वत:च्या चरित्रातीलच आहे.

**सामर्थ्यविद्या :** दुसऱ्या समासाचा विषय आहे 'सामर्थ्यविद्या.' पुरुष हा स्वत:च पाचाचे पंचवीस अंश करून स्वत:च त्यात साक्षित्वे वर्तत असतो. असा या समासाचा आरंभ आहे. या समासाला आरंभी सृष्टीची उत्पत्ती कशी झाली व त्यात चैतन्याने कसे सामर्थ्य निर्माण केले हे सांगत असताना सांख्य तत्त्वज्ञानच समर्थ सांगत आहेत असे वाटते. 'पाचाचे पंचवीस अंश', 'देहपुरामध्ये पुरुष' यावरून सांख्याचा आधार घेऊनच सृष्टीची निर्मिती रामदास सांगत आहेत. या समासाचा विषय एवढाच, सुटसुटीत आहे.

## मानवाची व्याख्या

'बंद' निरूपण हा तिसऱ्या समासाचा विषय आहे. बंद या शब्दाचा अर्थ आहे नियम, शिस्त, मर्यादा, नियंत्रण, संयम, बंधन इत्यादी. या बंदाचे महत्त्व मनुष्याच्या जीवनात फार आहे. यामुळे रामदास समाजाला सज्जनपणाचे, भक्तीचे धडे देत आहेत.

*बरें जाणत्याने ऐसे न करावे । समजोन सन्मार्गी भरावें । सारासार विचारें तरावे । सावधान ।*[३६]

## विवेक प्रलये शोध

चवथ्या समासाचा विषय अनादि-निरूपण असा आहे. आत्मा अनादि आहे याचा विचार करताना मायेचा विचार करावाच लागतो.

मात्र रामदासांनी येथे एक सावधपणाची सूचनाही दिली आहे. केवळ शब्दज्ञान उपयोगी नाही. प्रचीतीही पाहिली पाहिजे, नाही तर सर्व व्यर्थ होय. ते म्हणतात– *'नाना पदार्थ नाना काया । ते हे जगदीश्वराची माया । पंचभूते तीन गुण । अष्टधा प्रकृती हे सगुण ।*[३७] *नाना पदार्थ द्रश्य संपूर्ण ।माया जगदीश्वराची ॥'*[३८]

यात जीवाचा माया हा प्रकार वर्णन करून मूळ मायेचे स्वरूप सोपे करून दाखविले आहे. माया सर्वच खोटी आहे आणि ब्रह्म शाश्वत आहे असा हा विचार थोडक्यात समजावून सांगितला आहे. या समासात काव्यालंकाराला कोठे स्थान नाही.

## वीट नाही तोचि संग

पाचव्या समासात नि:संगाचे निरूपण केले आहे. कसलाच संग नसावा म्हणजे मनाने नसावा. उपाधी टाळता येत नाहीत. म्हणून उपादीत असूनही उपाधीत नसावे.

*'उपाधीमध्येचि असावे । परी विवेके निघून जावे ।'* यालाच नि:संग म्हणावयाचे. हाच कर्मयोग.

हा विषय सांगतानाही सुभाषितवजा ओव्यांचे चरण समर्थांच्या प्रतिभेतून कसे ओघाने

बाहेर पडतात ते दिसून येते.

*विरंग नव्हे तोचि रंग । वीट नाही तोचि संग ।*[३९]

संगाची व्याख्याच पहिल्या ओवीत केली आहे. ही सुभाषिताच्या पद्धतीचीच आहे.

*साबण सांडुनि लाविली जैसी । तेणे शुद्धता कैची वस्त्रासि ।*[४०]

हा दृष्टान्तही सुभाषिताचे सौंदर्य व्यक्त करणारा आहे.

*सांगाती तितुका मोजिला । आपणांसि चुकतचि गेला । ताळा पडेनासा जाला । येत त्रिमित्य ।*[४१]

या सुंदर दृष्टान्ताने मीपणाचा संग कसा मोडला पाहिजे हा निःसंग होण्याचा मार्ग सांगून समास संपविला आहे.

सहाव्या समासाचा विषय आहे 'विद्यमान तत्त्व' सृष्टीची उत्पत्ती कशी झाली आहे याचा तपशील न सांगता सर्व ठिकाणी जाणिवेचे तत्त्व कसे व्यापून राहिले आहे व त्यातूनच जडाची निर्मिती कशी झाली आहे या संबंधीचा विचार या समासात मांडला आहे.

## सृष्टीचा पसारा

प्रश्न असा उपस्थित केला गेला आहे की जर निर्गुण निराकार ब्रह्मच सर्व ठिकाणी संचले आहे, त्याला विकार झाला नाही, तर हा सृष्टीचा पसारा कशामुळे झाला? त्याचे उत्तर असे की

मूळ जाणीवयुक्त ब्रह्म-संकल्प, मूळ माया, अष्टधा प्रकृती, त्रिगुणांची साम्यावस्था हे सर्व जाणीवरूपच. पंचतत्त्वे, त्रिगुण यामुळे जडसृष्टी निर्माण झाली. ब्रह्मांडामधील सूक्ष्म लक्षण ते हिरण्यगर्भ देवतामय. त्यापासूनच ब्रह्मा, विष्णू आणि हर इत्यादी तेहेतीस कोटी देवतांची उत्पत्ती. हे सर्व देव वायुरूप असतात. ते नाना प्रकारचे देह धारण करतात, मोडतात. लहान-थोर सर्व प्राणी हा जाणीवरूपच. आपआपल्या कर्मानुसार-वासनेप्रमाणे ही भूतसृष्टी उत्पन्न होते. म्हणजेच सारांशरूपाने बोलावयाचे झाल्यास जे विद्यमान तत्त्व सर्व जगतात आहे ते जाणीवरूपच. या समासाचा मुख्य हेतू तत्त्व सांगण्याचाच असल्याने काव्यात्मकतेच्या दृष्टीने याचा विचार करावा अशी याची रचना नाही.

सातवा समास 'सारासार निरूपणा'चा आहे. सर्व शिकवणीचे सार यात आले आहे. सार कोणते आणि असार काय याचा विवेक या समासात स्पष्ट केला आहे. आपले वय व्यर्थ जाऊ नये हा विवेक पाहणारे स्वहिताचे साधन करतात. इहलोक आणि परमार्थ या दोहोंचा विवेक पाहिला पाहिजे. निर्गुण आणि सगुण यांच्या विवेकातून सिद्धान्त शोधून काढावा. जन्ममृत्यूची कटकट कायमची मिटवून टाकावी हा विचार म्हणजेच सारासार.

हा सगळा समासच अगदी ओघवत्या भाषेत सुटसुटीत व आवश्यक तेवढ्याच अलंकारांनी सिद्धांत समजावून देण्यासाठी लिहिलेला दिसतो. आपल्या वयाला नदीला काढण्यात आलेल्या कालव्यांची उपमा देऊन त्याला विवेकाचा बांध कसा आवश्यक आहे, हे पटविले आहे.

उदा. *नदीचें उदक वाहात गेले । ते निरर्थक चि चालिलें । ते चि जरी बंधोन काढिले । नाना तळी कालवे ।।*[४२] *उदक निधेने वर्तविले । नाना जिनसी पीक काढिलें । पुढे उदकेचि जालें । पीकें सुवर्ण ।।*[४३]

या सर्व विचारात आपले आयुष्य प्रवाहासारखे आहे हे साम्य तंतोतंतपणे हेरून रामदासांनी

त्याचा उपयोग तात्त्विक विचार पटविण्यासाठी केला आहे. अशा प्रकारे रामदासांनी आपल्या उपदेशाचे जणू सारच या समासात सांगितले आहे.

### भाषाशैली

नवव्या समासाचा विषय देह आणि आत्मा यांचा संयोग झाल्यानेच दृश्य कार्य होते. सर्व प्रकारचे कार्य त्यामुळेच संभवते. 'देह पडतां आत्मा विझाला' असे आत्म्याचे स्वरूप आहे. येथे विझाला याचा अर्थ देह सोडून गेला एवढाच घेतला पाहिजे. आत्म्याची स्थिती जो जाणतो तोच ज्ञानी. 'आत्मा कर्ता देह तत्त्वता कळले पाहिजे' एवढाच विचार या समासाचा विषय आहे. मात्र पहिल्या चार ओव्यांत हा विचार सांगून झाल्यानंतर देहात्मयोगाने कोणकोणती कार्ये घडतात याचे वर्णन नादानुसारी शब्दांच्या अनुवृत्तींनी केले आहे.

दहावा समास ब्रह्मनिरूपणाचा आहे. निर्विकल्प समाधी म्हणजे काय हे थोडक्यात आरंभीच सांगितले आहे. पंचीकरणाने तनुचतुष्टयाचे निरसन करायचे आणि आत्मनिवेदनाने निर्विकल्प दृढबुद्धी झाली की हीच निर्विकल्प समाधी होय असे सारांशरूपाने समजावून दिले आहे. हे अनुभवायला 'पाहता पाहता कळू लागे तत्त्वता' असा निर्वाळाही दिला आहे. यासाठी मी- पण घालविले पाहिजे. यानंतर परब्रह्म निश्चल व निर्विकारी कसे आहे हेही स्पष्ट केले आहे. अशा रीतीने या समासात ब्रह्म निरूपण तात्त्विकतेने केले आहे. याशिवाय महंत शिकवण नावाचा आणखी एक समास (दहावा) एकवीसाव्या दशकातील असल्याचा वर उल्लेख आलाच आहे. या समासात फक्त बावीस ओव्या आहेत. या समासाचे नाव 'महंत शिकवण' असे असूनही 'निर्विकल्प समाधी संपूर्णमस्तु' असाही शेवटी उल्लेख आहे.

### आत्मचरित्र?

या समासात महंताने बहुचक चुकवावे, एकान्त साधावा, पर्वतस्थळी राहावे, मठ करावा, मारुतीची स्थापना करावी. त्याचा जप करावा, सिद्धी प्राप्त होईपर्यंत साधना करावी. तोपर्यंत कोणालाही भेटू नये इ. उपदेश केला आहे. हा समास रामदासांच्या स्वतःच्या आचरणाला इतका तंतोतंत लागू पडतो की या समासात त्यांनी आत्मचरित्र तर सांगितले नाही ना? अशी शंका येते. यातील ओव्यांचा उद्देश काय असावा हे विचार केल्यास समजण्यासारखे आहे.

### एकविसाव्या दशकाचे महत्त्व :

सप्तसमासी आणि त्याला जोडलेले चार समास मिळून तो एकविसावा दशक होतो. त्याची रचना, त्याची भाषा, त्यात सांगितलेले तत्त्वज्ञान, रामदासांची छाप अगदी स्पष्टपणे ओळखू येणार या दृष्टीने एकविसाव्या दशकाचे महत्त्व काही कमी नाही.

## सगुण - ध्यान

हे ११९ ओव्यांचे एक समासी छोटे काव्य आहे. देवांनी या काव्याचे खालीलप्रमाणे विषय विभाजन केले आहे.

१ ते ४० श्रीरामाच्या सगुण मूर्तीचे साद्यंत आणि विस्तृत वर्णन

४१ ते ५० मंडपाचे वर्णन

५१ ते ७८ थाटामाटाचे व जमलेल्या मंडळीचे आणि त्यांच्या कार्यक्रमाचे वर्णन

७९ ते १०४ कीर्तन, सभा, आरती यांचे वर्णन.

१०५ ते ११९ रामनामाची अपूर्व महती.

पहिल्या ओवीत कुळदेवतेला म्हणून वंदन केले आहे. लीलाविग्रही भगवंत अर्थात श्रीराम आपल्या दासाला संकटांत सांभाळत असतो असा त्याचा महिमा वर्णन करून त्याला वंदन केले आहे. तुळजाभवानी हे समर्थांचे कुलदैवत.[४४] येथे श्रीरामचंद्र हे कुलदैवत असल्याचा उल्लेख आहे आणि हनुमंत आमची कुळवल्ली असाही उल्लेख केलेला आढळतो.

## रघुनाथ ध्यान

श्रीरामाचे ध्यान आरंभ करण्यापूर्वी श्रीरामाचे गुणवर्णन, पराक्रम वर्णन व सौंदर्यवर्णन करून रामाचे अलौकिकत्व वर्णन केले आहे. एकवचनी, एकबाणी, एकपत्नी, धार्मिक, पुण्यपरायण, (शांत), मार्तंड कुलदीपक, चातुर्यनिधी, साधुजनांचे भुवन असे रामाचे गुणगान केले आहे. श्रीराम अजिंक्य आहे, राक्षसांचा निर्वाण आहे, कर्ता समर्थ येकु, त्रिंबक परम कठीण भग्न केले बळे, असे रामाच्या पराक्रमाचे थोडक्यात निवेदन केले आहे. लावण्य सुलक्षण, लावण्याचा जनक, सौंदर्याचा जनक, राजीव नयन असे सौंदर्य वर्णन करून ध्यानाची पूर्वतयारी जी श्रद्धा ती निर्माण केली आहे. यानंतर प्रत्यक्ष ध्यान आरंभिले आहे. श्रीरामाचे लावण्य काय वर्णावे? रूप जणू आनंदाच्या रसातून ओतून काढले आहे. भिवयांची वक्रता सुरेख दिसत आहे. नासिका सरळ, सतेज, ललाट नेपाळातील कस्तुरीने शोभायमान केलेले-झालेले. तेथे तीन आडव्या रेषाही शोभायमान झालेल्या. कपाळावर केशरी ऊर्ध्वपुंड्र आणि त्यावर कस्तुरी लावलेली. त्यावर सुरंगी अक्षतांची त्रिपुटी शोभायमान होत होती. रत्नजडित कुंडले, आकर्ण विशाल नेत्र, इत्यादी अवयवांचे सौंदर्य रामदास आकंठ पिऊन घेत आहेत असे वाटते.

हे वर्णन मधून मधून अलंकारांनी शोभायमान झाले आहे.

## मानसपूजा

तेरा समासांचे हे काव्य. प्रत्येक समासाच्या शेवटी एक ओवी आहे. इति श्री मानसपूजा। मने पूजावा वैकुंठराजा । साधके अगत्य आत्मकाजा । श्रवण करावे ।। यावरून रामदासांना मानसपूजेचे महत्त्व किती वाटत होते हे दिसून येते. ही मानसपूजा असल्याने पूजासामग्रीत न्यून असण्याचे कारण नाही. 'अलंकारार्थे अक्षतान् समर्पयामि ।' असे म्हणण्याचे कारण नाही. मनाजवळ सर्व काही आहे. त्यामुळे वैभवसंपन्नता, विपुलता, यांची कल्पना करायला कोणती हरकत आहे? समर्थांनी किती व्यापक कल्पना करून मानसपूजा सांगितली आहे हे पाहण्यासारखे आहे. श्री देवांनी विधान केले आहे की, 'कोणच्या मनात कधीही न आलेली न येणारी अशी ही भव्य आणि व्यापक मानसपूजा आहे. ताह्मनात स्नान करणाऱ्या किंवा काचेच्या आड चौकटीत बसणाऱ्या देवाची ही पूजा नसून एखाद्या सिंहासनाधिष्ठित राजाचे वैभव जसे असावे त्याहून शतपट वैभवशाली अशा ब्रह्मांडनायकाची ही पूजा होय. या काव्यात ती मनाने केलेली असेल, पण मला वाटते, अशी पूजा श्रीसमर्थकाळी चाफळास श्रीरामाची प्रत्यक्ष होत असावी.[४५]

काही बाडांतून या सर्व समासांना नावे दिलेली आढळतात. ती नावेही समर्पक व विषयद्योतक अशी आहेत. १. स्थळ, २. पार्पत्य, ३. स्वयंपाकिणी, ४. सामग्री, ५. पात्रे, ६. फलाहार, ७. स्वयंपाक, ८. देवार्चन, ९. वाढणे, १०. भोजन, ११. समारंभ, १२. सायंकाळपूजा आणि १३. विसर्जन.

## स्वरूप

मानसपूजा ही सगुणरूपाचे ध्यान करूनच करावयाची. पूजेसाठी चांगल्या स्थळांची कल्पना करावयाची. सर्व व्यवस्था करणाऱ्या पारपत्यनामक अधिकाऱ्यांचीही कल्पना करावयाची, स्वयंपाकिणींना स्वयंपाक करावयाची विविध सामग्री, पदार्थांचे वैविध, देवार्चन; देवाला नैवेद्य वाढणे, भोजन, समारंभ आणि सायंपूजा आणि नंतर विसर्जन या सर्वांची कल्पना करून ही मानसपूजा करावयाची. अर्थात ही सर्व कल्पना करीत असतानाही पूजा चालूच असते. कारण पूजेची सामग्री आपण पूजेसाठी गोळा करीत आहोत ही भावना मानसपूजेत असते. त्यामुळे जेवढी जेवढी कल्पना करावी तेवढी तेवढी पूजाच आहे हे उघड आहे.

## हेतु

ही मानसपूजा आत्मकाजासाठी करावी असे समर्थांनी स्पष्टपणे सांगितले आहे :
*इति श्री मानसपूजा । मने पूजावा वैकुंठराजा । साधवे अगत्य आत्मकाजा । श्रवण करावे ।।*
प्रत्येक समासाच्या शेवटी ही सूचना दिली आहे.

## सांस्कृतिक संकेत

मानसपूजा या काव्यात सांस्कृतिक संकेतही आलेले आहेत. हे अपरिहार्यच होते. पूजेचा प्रकार परंपरागत असल्याने त्यात सांस्कृतिक आकार हा परंपरागत रूढीने येणे स्वाभाविकच आहे. घरापुढे तुलसीवृंदावन असणे, सडासंमार्जन, रांगोळ्या, पाणपोई घालणे, चौक, कारंजे, उद्याने, सभामंडप, गोशाळा, चित्रशाळा, स्वयंपाकगृह, भोजनशाळा, इत्यादींचा उल्लेख त्या वेळचे सांस्कृतिक जीवन दर्शन घडवितो. चवथ्या समासात भोजनातील पक्वान्नांची यादी तत्कालीन पद्धती दर्शविते. डांगरकुटे, मेतकूट, सांडगे, कोशिंबीर, माइनमुळे इत्यादी. अनेक स्वयंपाकिणीचा अंग धुऊन स्वयंपाक सोवळ्याने करणे, पाने पुन:पुन: धुणे आणि धुवायला लावणे आणि चांगली पुसून मग सोवळ्यात घेणे इ. प्रथा समर्थकालीन असल्याचा अंदाज सहज घेता येतो. दूध, तूप, दही, ताक, लोणची, रायती, इ. पदार्थ यांचा नैवेद्य तयार करणे, यात एका सांप्रदायिक परंपरागत पद्धतीचाही उल्लेख आलेला आहे. तो म्हणजे देवाला नैवेद्य तयार केलेल्या सर्व अन्नाचा दाखवायचा. केवळ एका पानावर सर्व पदार्थ वाढून तेवढाच नैवेद्य दाखवायचा नाही. *'जितुकी अन्ने सीध केली । तितुकी देवापुढे ठेविली ।।*[४६] तसेच देव हा वासाचा धनी असतो. नैवेद्य दाखवायचा याचा अर्थच त्याचा वास देवाला द्यावयाचा. *'देव वासाचा भोक्ता । सुवासेचि होये तृप्तता ।*[४७]' ताटात पदार्थांची वाढावयाची जागा (स्थान) निश्चित असे.

*'जितुकी काही भक्षे केली । तितुकी यथान्वये वाढिली ।*[४८]

या सर्व तपशीलवार वर्णनाच्या आधारे मानसपूजेचे वैभव तर प्रकट होतेच, पण त्याचबरोबर उत्कट भक्तिभावही व्यक्त होतो.

## जनस्वभाव किंवा बहुधा गोसावी

फक्त ७० ओव्यांचे हे लहानसे प्रकरण आहे. यात मोठे तत्त्वज्ञान सांगितलेले नाही की एखाद्या सिद्धांताचे विवरणही केले नाही. काव्य या दृष्टीने या प्रकरणाचे मूल्यमापन केले तर काही उत्कृष्ट दर्जाचे काव्य आहे असे म्हणता येणार नाही. मात्र समाजात गुरू म्हणून वावरणाऱ्यांचे पितळ रामदासांनी या प्रकरणात तपशीलवार माहिती देऊन उघडे केले आहे.

## निर्गुणध्यान

श्रीरामचंद्राचे सगुणध्यान रामदासांना एकवीस समासीच्या १५ व्या समासात वर्णिले आहे. निर्गुणध्यान हा शब्दच विरोध दर्शवितो. निर्गुणाच ध्यान कसे करणार? एकरूप होऊनच ते ध्यान होऊ शकेल, पण त्याला ध्यान म्हणता येणार नाही. तरी पण निर्गुण ध्यान या प्रकरणात समर्थांनी श्रीरामाला निर्गुणरूपात पाहिले आहे. म्हणजेच श्रीरामाच्या विविध अवयवांच्या ठिकाणी निर्गुणाची कल्पना केली आहे. जीवशिवाचे ऐक्य किंवा सगुण-निर्गुण ऐक्य किंवा आत्मस्वरूपाचे दर्शन आणि त्यानंतरची स्थिती ही या काव्यात प्रारंभी वर्णिली आहे. जोगा, जंगम, सूफी पंथियांचा एके ठिकाणी उल्लेख आला आहे आणि ते या मार्गानेच पावन होतील असे स्पष्टपणे सांगितले आहे. सगुण ध्यान आणि निर्गुणध्यान ही दोन्ही तुलनेने पाहिला तर सगुण ध्यान आपणास जवळचे वाटते. पण आध्यात्मिक उंचीच्या दृष्टीने निर्गुणध्यान श्रेष्ठ आहे हे या काव्यामुळे प्रतीत होते. हाच या काव्याच्या प्रभावीपणाचा पुरावा होय.

### एकवीस समासी

'एकवीस समासी' याला 'जुना दासबोध', 'रामदास' आणि 'दासबोध' अशी नावे आहेत. त्यांपैकी जुना दासबोध हे नाव वीस दशकी नवा दासबोध लिहिल्यानंतर पडले असावे असे देव मानतात. आज हा 'जुना दासबोध' अथवा 'एकवीस समासी' या नावाने प्रसिद्ध आहे. हाच समास 'माधवी' या नावाने बाडांक १२४० मध्ये दिला आहे. मात्र बाडात फक्त ६२ ओव्या आहेत व 'इति श्री माधवी ग्रंथ संपूर्ण' असे म्हटले आहे. ६४ ते ८२ ओव्या या एकवीस समासीत अधिक आहेत.

### रचनेचा काळ

'एकवीस समासीची' रचना 'पंचवटीत शके १५५२ या सुमारास म्हणजे कवीच्या पूर्ववयात झाली हे निश्चित'[४९] पांगारकर या प्रकरणाचा रचना काळ समर्थ कृष्णातीरी आल्यानंतरचा म्हणजे शके १५७२ असा मानतात. पांगारकरांच्या मराठी वाङ्मयाचा इतिहासाच्या तिसऱ्या खंडात ही रचना १५७०-७१ मध्ये झाली असा उल्लेख आहे.[५०]

'प्रपंच' विचारासंबंधी एकवीस समासीत जो उल्लेख आहे तो प्रपंच वाईट असल्याबद्दलचा आहे. कर्ममार्गपर नाही. म्हणून हा ग्रंथ पूर्ववयात झाला असे अनुमान कदाचित केले गेले

असेल. परंतु वीस दशकी दासबोधात सुद्धा प्रपंच हा चांगला आहेच असे आलेले नाही. म्हणून याच्या रचनेच्या काळासंबंधी आणखी कोठला तरी पुरावा उपलब्ध होईपर्यंत निश्चित मत कोणतेच मानता येत नाही. मात्र वीस दशकीच्या आधीचा हा आहे यात शंका बाळगण्याचे कारण नाही.

## विषय विवेचन

आत्मस्थितीचे वर्णन, रघुनाथध्यान, वक्ता-श्रोता लक्षण, सगुण ध्यान, निराभिमान शांती, शिकवण, प्रारब्ध-प्रयत्नवाद, संतस्तवन, मीपण निरसन, पूर्ण समाधान रघुनाथ चरित्र आणि त्याचे महत्त्व, गुरुशिष्य संवाद, दृश्य उच्छेद, एकंकार निरसन, सत्संग महिमा, शुद्ध ज्ञानावरण आणि अनिर्वाच्य ब्रह्म असे या ग्रंथाचे विषय आहेत. निर्गुणब्रह्म, त्यापासून मायोत्पत्ती आणि सृष्टीची उत्पत्ती हा विषय आहे. पण त्याचबरोबर सगुण महिमाही वर्णन केलेला आहे. श्री रामचंद्राचे चरित्र सांगताना, 'श्रीरामजयरामजयजयराम' या मंत्राचे महत्त्व सांगितले आहे. हा मंत्र मलविसर्जनाच्या वेळी सुद्धा करावा अशी मोकळीकही देऊन ठेवली आहे. संतसंगतीचे महत्त्वही सांगितले आहे. प्रपंच हा वैरीच आहे. पण प्रपंचात जो पोहून निघाला तोच परमार्थाचा खरा अधिकारी झाला असे निश्चितपणे सांगितले आहे. प्रारब्ध-प्रयत्नवादात प्रयत्नाचे महत्त्व मोठ्या मार्मिकपणे पटवून दिले आहे. यावरून समर्थांचे कर्मयोगी विचार प्रथमपासून तसे होते असे मानले पाहिजे.

## महत्त्व

वीसदशकी नवा दासबोध निर्माण झाल्यानंतर जुन्या दासबोधाचे काय महत्त्व? असा प्रश्न साहजिकच उद्भवतो. परंतु जे १७ समास नव्या दासबोधात समाविष्ट केले नाहीत त्यांचे स्वतंत्र महत्त्वही आहे. श्रीराम चरित्राच्या समासात रामाचे वर्णन अत्यंत बहारीचे असून ते ध्यान समर्थांचे नित्याचे ध्यान असले पाहिजे. याच समासात जपाचे महत्त्व आणि त्याची फलप्राप्ती याविषयीचे निर्भीड विचार परंपरागत विचारांहून वेगळे असे साहसाने मांडलेले दिसतात. संत लक्षणे तपशीलवार सांगितली आहेत आणि त्यांचे महत्त्वही आगळे आहे. तुलसीदासांनी केलेली संत-महंत लक्षणे येथे आठवावीत, इतकी ही लक्षणे व्यवच्छेदक आहेत. वक्ता-श्रोतालक्षणेही ज्ञानेश्वरांची आठवण करून देतात. एकंकार निरसनात प्रपंची भेद असणारच. 'प्रपंची अभेद हा विनोद' असे म्हटले आहे. म्हणजे दृश्य हे मायावी असले तरी ते भेद निर्माण करणारच. ज्ञानाचे त्या भेदाचे निरसन केले पाहिजे. असा भेदाभेदाचा विचार फारच सूक्ष्मपणे मांडला आहे. यामुळे या एकवीस समासीचे तत्त्वज्ञान, काम्य, उपदेश या दृष्टीने महत्त्व आहे.

# चतु:समासी (एकवीस समासीची पुरवणी)

एकवीस समासी म्हणून जे समास आहेत त्याचे चार समास वेगळे मिळतात. ते बाड क्रमांक २३५ ते ३४३ मध्ये 'चतु:समासी' या नावाने दिलेले आहेत. वास्तविक 'एकवीस समासी' या नावाने व म्हणूनच याचा विचार करावयास हवा. परंतु हे चार समास स्वतंत्रपणे एक प्रकरण म्हणून मिळत असल्याने त्याचा विचार स्वतंत्रपणेच पण एकवीस समासीनंतर केला आहे.

पहिल्या समासात प्रपंच दुःख जितके जितके अधिक होईल तितका तितका ईश्वराच्या रंगात रंगण्यास अधिकारी होतो.

दुसऱ्या (म्हणजे चौथ्या बाडक्रमांकात दिलेल्या क्रमाप्रमाणे) गुरुशिष्याला खऱ्या स्वरूपाचा कल्पना देत आहेत. शिष्याला ज्ञान झालेसे वाटते पण ते खरे ज्ञान नव्हे, असे गुरू सांगत आहेत.

*अनुभव अनुभवी विराला । अनुभवेवीण अनुभव आला । हाहि स्वप्नीचा चेइला । नाहींस बापा ।।*[१]

तिसऱ्या (म्हणजे पाचव्या) समासाचा विषय खालीलप्रमाणे आहे :

*भ्रातांचे मूळ छेदक ज्ञान खडग, भव प्रपंच बाधक उडे आत्मज्ञाने देहभावचि नाही जया, पाप पुण्य कैचे तया ।।*

अशा दृष्टीने जीवमुक्ताची लक्षणे सांगितली आहेत.

चौथ्या (म्हणजे सहाव्या) समासाचा विषय खालीलप्रमाणे आहे :

पंच प्रलयाची लक्षणे प्रथम सांगितली आहेत. निद्राप्रलय, मरणप्रलय, द्विविध पिंडीचे प्रलय, जनक्षय, महालय इ. लिंगदेह नष्ट झाल्याशिवाय जन्म चुकत नाही किंवा

*भगवत् भजनाविण काहीं । शब्दज्ञाने सार्थक नाहीं ।*[२]

याप्रकारे पुनःपुनः स्वरूप ज्ञान, जीवमुक्त लक्षण, ज्ञान, अज्ञान हेच विषय विवरले आहेत.

## चतुःसमासी : एक संकलन

या बाबतीत एक विचार येतो तो असा– रामदास हे सदासर्वदा फिरत असत. भिन्न भिन्न मठात महंत आणि शिष्यांना ते भेटत असत. शिष्य व महंत त्यांना शंका विचारत असत. व समर्थ तोच विषय त्यांना पुनः पण नवीन काव्य रूपाने समजावून देत असत. म्हणून एकाच विषयावर अनंत समास त्यांनी लिहिले-सांगितले आणि म्हणून तत्त्व एकच असले तरी शैली मात्र वेगवेगळी झाली. पुनरुक्ती होणे अपरिहार्य होते. चतुःसमासाचे स्वरूप हे असे आहे.

## षड्रिपु-निरूपण

परंपरागत विचारात षड्रिपू म्हणून काम, क्रोध, लोभ, मोह, मद आणि मत्सर यांचा समावेश केलेला आढळतो. परंतु रामदासांनी षड्रिपूंच्या यादीतून लोभ आणि मोह यांची हकालपट्टी करून त्यांच्या जागी दंभ आणि प्रपंच यांची योजना केली आहे. रामदासांची विचार करण्याची पद्धत कशी स्वतंत्र आहे. लोभ आणि मोह हे दोन्ही प्रपंचात अंतर्भूत होतातच असा त्यांचा विचार असावा. त्यांचे व्यवहाराचे निरीक्षण अत्यंत सूक्ष्म असून दंभ हा विकार लोकात बळावलेला त्यांनी पाहिलेला असावा आणि तो षड्रिपूंत मानला जाऊ नये याचे त्यांना वैषम्य वाटले असावे. लोभ हा प्रत्येक माणसाच्या ठायी असतो. अनेक गोष्टीत मोहही माणसाला होतो. पण लोभ आणि मोह हे दोन विकार केवळ प्रपंच या एकाच गोष्टींमुळे होतात हे तर खरेच. तसे काम, क्रोध, मद, मत्सर, आणि दंभ यांचे नाही. प्रपंचत्याग केलेल्या संन्याशाला काम-क्रोधाने, मदमत्सराने आणि दंभाने ग्रासलेली अनेक उदाहरणे पुराणातून मिळतात. त्यामुळे

या विकारांना षड्रिपुंतून वगळण्याचे कारण नाही. आणि माणसाचा सर्वांत मोठा शत्रू जो प्रपंच याचा समावेश समर्थांनी अगदी उचितपणे केला आहे.

## प्रपंच हा रिपूच

प्रपंच हा रिपूच आहे असे समर्थांना निश्चितपणे म्हणायचे आहे. प्रपंचाचा वैरी या नात्याने ते असा उल्लेख करतात :

१) *प्रपंच साहवा वैरी परत्र अंतरा दुरीं । २) अवघा तोचि तो जाला । तेणे देव दुरावला ॥ ३) देव तो राहिला दूरीं । ऐसा वैरी प्रपंच हा ॥ ४) घातला मागुती जन्मा । ऐसा वैरी प्रपंच हा ॥ ५) प्रपंचे भुलला प्राणा । व्यर्थ आयुष्य वेचलें । देव ना धर्म ना काहीं । ऐसा हा साहवा रिपु ॥*

प्रमुखत: देव आणि धर्म हे प्रपंचात दूर राहातात आणि माणूस प्रपंचाच्या गुंतावळ्यातच गुंतून राहतो. हा समर्थांच्या बाबतीत खरा आक्षेप आहे. प्रपंचाचे महत्त्वही दासबोधात गायिले आहे. प्रपंच हा रिपू असला तरी तो सहजासहजी सुटत नाही. तो केलाच पाहिजे. मग तो अधिक नेटका केला तर काय बिघडले? परंतु त्यात सापडू मात्र नये. संसार हा मुळातच नासका आहे, तो नेटका करण्याचा प्रयत्न करावा पण नेटका करीत असताना तो फिकाच होत जातो याचीही जाणीव ठेवावी असे रामदास निक्षून सांगतात. ते प्रपंच टाकायला सांगत नाहीत.

## शिकवण

या षड्रिपु निरूपणात समर्थांनी हे सर्व रिपू सोडावेत असा उपदेश केला असला तरी काम वासनेच्या बाबतीत 'विधीने विषयी घ्यावा' अशी सवलत तेथे ठेवली आहे. प्रपंचाच्या बाबतीत दासबोधात प्रपंच नेटका करण्याबद्दल उपदेश आहे. बाकीचे रिपू मात्र टाळलेच पाहिजेत असा आग्रहपूर्वक उपदेश केला आहे.

# पंचीकरण योग

याचे योग (समास) पाच आहेत. प्रथम शाखेला नमन करून– तो जगज्येती म्हणून– मग विषयाकडे समर्थ वळले आहेत. माया आधी झाली. (ब्रह्मापासून) व मग सारी सृष्टी झाली हा विचार सारांश रूपाने मांडला आहे. कल्पना, वासना, काया, माया, ही सर्व मायेचीच नावे आहेत. परंतु लोक अज्ञानामुळे मूळ परब्रह्माला जाणत नाहीत. पहिल्याच योगातील हा विचार सुंदर दृष्टान्ताने मांडला आहे. दुसऱ्या योगात लौकिक कर्मांचा तपशील सांगितला आहे. स्नान, संध्या, टिळे, माळा, मुद्रा, गोपीचंदने, सोवळे, पूजन, मंत्र, तंत्र, वेदपारायणे, चर्चा, होमयागादिक, इत्यादी आणि यात 'आधी देवासी पाहाणे' हे कसे महत्त्वाचे आहे ते सांगितले आहे. तिसऱ्या योगात –वारिदेहांचे निरसन करावे व मग आत्मस्थिती बाणते हे सांगून अष्टधा प्रकृतीचे वर्णन केले आहे. चौथ्या योगात पंचमहाभूतापासून प्रत्यक्ष सृष्टीची रचना कशी झाली आहे हे स्पष्ट केले आहे. अन्नापासून जीव होतात वगैरे उत्पत्ती सांगितली आहे. आणि पाचव्या योगात निजध्यासे, आत्मनिवेदनाने याचा प्रयत्य येतो, ज्ञान होते असे सांगितले आहे.

## चतुर्थमान

चतुर्थमान हे प्रकरण मुख्यत: आध्यात्मिक आहे. तथापि काही उपदेशात्मक भाग रामदासांनी आपल्या नेहमीच्या आकर्षक भाषेत सांगितला आहे. या काव्याचा विषय चार भागांत वाटला आहे. मान म्हणजे परिमाण, प्रमाण, समास असा पांगारकरांनी दिला आहे. चार समासांत हा विषय सांगितला गेला आहे. प्रथम मानात 'राम तो जाणिजे आत्मा । सर्वांतरात्मा तोचि तो' । असे श्रीराम व परब्रह्म यांच्यात अव्दैत कल्पिलेले आहे. ब्रह्मा, विष्णू, महेश तोच आहे. तोच नाना तऱ्हेचे देह धारण करतो. हा तपशील आणखी देताना समर्थ म्हणतात– *बाळ तारुण्य वृद्धात्मा । नर नारी नपुसकुं । कुरूप सुंदरु जाला । पापात्मा पुण्यवंत तो । त्यावीण दुसरा कैचा । नाना देहे धरावया ।।*[१३]

### विनोद

हाच विचार थोड्या विनोदाने पण व्यापकपणे त्यांनी असा समजावून दिला आहे:

*सुंदर वियारा होतो । हांसतो आपआपणा । अशक्य शक्त तो होतो । कुटितो आपआपणा । नरनारी देहे होतो । भोगितो आपआपणा ।*[१४]

व्दितीय मानात हे परब्रह्म मायेच्या रूपाने कसे नटले, स्वत: कसे विभागले गेले हा विचार सोप्या रीतीने समजावून सांगितला आहे. सृष्टी आणि परमात्मा यांचे ऐक्य शब्दांनी कसे सांगायचे? शब्दांने फक्त शब्दज्ञान होते.

इथे 'मौन्य-शब्दे' या शब्दात विरोधाभास असला तरी ती एक अवस्था असल्याचे दिसून येते.

### दृष्टांन्त

एक दोन दृष्टान्तांनी हा विचार स्पष्ट केला आहे:

१) *वायोने वितुळे मेघ । ज्ञाने ज्ञानी वितुळला ।*[१५] २) *कर्पूर जाळीतो वन्ही । दोघां होते बरोबरी । जाणावें काय बोलावे । आत्मनिवेदना पुढे ।।*[१६]

तृतीय मानात षड्रिपूंचा त्याग अथवा त्यावर विजय कसा मिळवावा, अभ्यास वाढवावा इत्यादी उपदेश सुंदर भाषेत आणि काही अलंकारांनी युक्त असा केला आहे. या तिसऱ्या मानाची रचना प्रथम दोन मानांपेक्षा अधिक काव्यात्मक आहे. प्रभावी भाषेत कामक्रोधादिकांवर विजय कसा मिळवावा ते सांगितले आहे.

अहंतेचा परिणाम मोठ्या परिणामकारक शब्दात व्यक्त केला आहे.

*अहंता लागली पाठी । करंटा म्हणता रडे ।*[१७]

चतुर्थ मानात निर्गुण परब्रह्माचे अमर्यादित्व मांडले आहे. मायेचा निर्माता असून मायातीत असणे, जन्ममृत्यूच्या पलीकडचा असणे इ. सर्व गुणांचा विचार यात केला आहे.

## मानपंचक

'मानपंचक' हे काव्यसारासारविवेकाच्या निरूपणावर आधारलेले आहे. याचे पाचही समास सारासारविवेक सांगतात. तथापि पहिल्याच समासात रामराज्याचे वर्णन आहे. त्याचा विचार पुढे 'सुकृतयोग, रामराज्याचा हा समास व आनंदवनभुवनी' ह्या सर्वांचा साकल्याने विचार

करावयाचा असल्याने या पहिल्या समासाचा विचार येथे केलेला नाही. या सारासारविवेकाचा सारांशरूपाने विषय असा आहे- उपासना कोणती करावी, कोणता देव कसा हा विचार प्रथम करावा. हे ओळखताना समर्थांनी सावधगिरीची सूचना म्हणून अलंकारांनी समजावून सांगितला आहे. आधी कर्म करावे. कर्ममार्गे उपासना करावी. विधियुक्त कर्मे करावीत म्हणजे जे फळ मिळते तीच उपासना. चौथ्या मानात आपण रघुनाथाची कास धरली आणि सुख पावलो असा प्रत्ययाचा बोल सांगितला आहे. ही रामउपासना ब्रह्मांडव्यापिनी असल्याचा निर्वाळाही रामदासांनी येथे दिला आहे. रामच सर्व करतो, घडवितो. सुखदु:ख देतो, पण ही सर्व कर्तव्यता तेथे । येथे शब्दची खुंटला । असे सांगून तर्कटाला थाराच दिला नाही. आणि पाचव्यात कसे वागावे यासंबंधी थोडक्यात उपदेश केला आहे. ज्याला दु:ख सांगायला जावे त्याच्यापाशीच त्याचे दु:ख आपल्यापेक्षा दुप्पट असते. म्हणून 'दु:ख वाटून ते घ्यावे । काढावे ऐसीयापरी ।' देहदु:खे औषधाने बरी करावीत. न्याय अन्याय सोसावा, क्षमा करीत जावे. आधी प्रपंच शोधावा यालाच प्रबोध म्हणतात.

संत-असंत, देव-दैत्य यांना ओळखले पाहिजे. त्यांना एकच मानू नये. हे सांगण्यासाठी एक दृष्टांत सांगितला आहे.

*देव दैत्य भले पांही । संतासंत भूमंडळीं । अमृत-विष हे एक । कदापी मानितां नये ।।*[५८]

योग्य आचाराचाच अवलंब केला पाहिजे, अयोग्य नव्हे, योग्य-अयोग्य, देव-दैत्य, संत-असंत हा भेदभाव जगात असणारच.

*भेद ईश्वरे करून केला । तो न वचे याच्या बापाला । मुखामध्ये घांस घातला । तो अपाना घालावा ।* १७-४-२७ हा विचार एका दृष्टान्ताने स्पष्ट केला आहे.

*भेदाभेद क्रिया देहां । लागला हे सुटेचिना । जेथील विषयो तेथे । विपरीत करितां नये ।। मुखेचि सेवितां अन्ने । अपानी घातला नये ।।*[५९]

पिंड-ब्रह्मांड, जीव-शिव एकच आहे हे विवरता विवरता कळू लागते. त्याचा प्रत्यय आला की मग त्यांच्यात अभेद राहातच नाही. ते दोन्ही एक होऊन जातात.

*पावकु शुद्ध कपुरि । येकचि होत जातसे । देव भक्त अंतरात्मा । येकचि होत जातसे ।।*[६०]

## उपमा

खरे-खोटे हे लोक समानत्वाने पाहातात. पण हे चूक आहे. यासाठी उपमा देतात.

*खरे-खोटे समानत्वें । मानिता लोक ते कसे । गर्भांध वर्तता जैसे । तैसे ते आत्मघातकी ।।*[६१]

'मानपंचक' सर्वच व्हायचे असल्याचा निर्वाळा पांगारकरांनीही दिला आहे.[६२]

## पंचमान

पहिल्या मानात भिन्न भिन्न देवतांच्या ध्यानांची फलिते सांगितलेली आहेत. गणेश आणि शारदा यांच्या ध्यानाने मूर्खही भला होतो, ईश्वर-गिरिजा यांच्या ध्यानाने सुखसंपदा प्राप्त होतात, शेषशायी श्रीहरी ध्यानधारणा घडवितो. इत्यादी सर्व देवतांच्या ध्यानाने कोणकोणती प्राप्ती होते ते सांगितले आहे आणि श्रीरामाच्या ध्यानाने मात्र बंद-मोचन होते हे वैशिष्ट्यपूर्णपणे सांगितले आहे. यावरूनही रामदासांनी श्रीरामाचीच उपासना का घेतली याचा उलगडा होतो.

वास्तविक त्यांना बालपणीच श्रीराम साक्षात्कार झाला होता आणि त्यांच्या कुळात एकवीस पिढ्या सूर्योपासना व श्रीरामउपासना होती. तरीपण ज्ञानेश्वरादी संतांच्या वाङ्मयाच्या अभ्यासाने आणि बारा वर्षे कडकडीत तपश्चर्या केल्यानंतर भक्तिमार्गाने जाण्यासाठी त्यांना श्रीकृष्ण, विठ्ठल अशी देवता सहजपणे निवडता आली असती. नव्हे, लोकसंग्रह करण्यासाठी त्यांना ते अधिक सोयीचे झाले असते. परंतु तसे न करता श्रीरामाचीच उपासना त्यांनी निष्ठेने चालू ठेवली,

## अंतरात्म्याचे स्वरूप

दुसऱ्या मानात अंतरात्मा-विवरण आहे. देहामध्ये असणारा अंतरात्मा हा वायुरूप असून हाच सर्व देहांतरी वसणारा देव आहे. एका दृष्टीने पाहाता तो वायू आहे तर एका दृष्टीने पाहाता तो देव आहे. इतक्या सोप्या रीतीने अंतरात्म्याचे स्वरूप वर्णन केले आहे. आणि हे ज्याला कळेल त्याला सर्व कळले आणि हेच ज्याला समजणार नाही त्याला काहीच समजणार नाही असे खडखडीतपणे सांगूनही टाकिले आहे.

## वायुरूप योनी

याच मानात कल्पनारूप, कामनारूप वायुरूप पिशाच्च यांनी, भुते यांच्या अस्तित्वाचे कारणही व्यक्त केले आहे. ही वायुरूप भुते शरीरहीन असल्याने त्यांना आपल्या दैहिक वासना तृप्त करून घेता येत नाहीत म्हणून ते कोणाच्या तरी शरीराचा अंगीकार करतात. ब्राह्मणमुखाने त्यांची तृप्ती होते असा उपाय त्यांच्या वासना तृप्तीत सांगितला आहे. यानंतर तारुण्यात काही कळत नाही– उमजत नाही –पण 'वृध्दाप्य केव्हा अंगावर अचानक आदळते तेव्हा मात्र दुःख ब्रह्मांड कोसळे' असे अत्यंत मार्मिक शब्दात परिस्थितीचे यथार्थ वर्णन केले आहे. ही हातोटी रामदासांच्याच काव्यात दिसून येते.

## गुरुशिष्यलक्षण

तिसऱ्या मनात गुरुशिष्यलक्षण सांगितले आहे. तसे म्हटले तर गुरुशिष्य लक्षण रामदासांनी भिन्न भिन्न प्रसंगी अनेक वेळा सांगितले आहे. पण या मानात पहिल्याच ओवीत प्रत्यक्ष परमेश्वरत्व पावलेले साधू कसे असतात त्याचे अगदी थोडक्यात वर्णन केले आहे.

*धन्य ते योगिये साधु । पावले परमेश्वरा । आपुले हित तें केले तरले तारिले जना ॥*

ही लक्षणे स्वतः रामदासांना लागू पडतात आणि त्या दृष्टीनेही ते परमेश्वराचे — परमेश्वरच– असे मानण्यास प्रत्यवाय नसावा– शक्तिपाताने कुंडलिनी जागृत करणारा योगी हा परमेश्वराहून वेगळा नसतो असे विवेकानंदांनीही श्रीरामकृष्ण परमहंसासंबंधी उद्गार काढले आहेत.

## सारासारविवेक

चौथ्या मानात सारासारविवेक सांगितला आहे. या समासात 'विवेकी जाणते घेती । सारासार विचारणा ।' हा विचार प्रत्येक ओवीत सांगितला असून त्यांच्याशी बाकीच्यांची तुला

केली आहे. भाविक नामस्मरण करतात, मंत्र, जप, ध्यान, तीर्थयात्रा, व्रते, दाने, याग, पुरच्चरण, होम, पूजा, राजस-तामस कर्मे, नवस-सायास असे अनेक भाविक आणि त्यांच्या उपासनापद्धती सांगून विवेकी मात्र सारासारविचार करून या अनुभवाचे महत्त्व वर्णिले आहे आणि पुन: एकदा मानाच्या अखेरपर्यंत ओघवती वाणी भिन्न भिन्न साधनांसंबंधी आपले विचार परखडपणे मांडले आहेत. यात आणखी एक वैशिष्ट्य आहे. देह दंडन व निरोध हा निरर्थक असतो. चित्तशुद्धीचीच अधिक आवश्यकता असते, हा विचार पुन:पुन: सांगितला आहे.

**चित्तशुद्धीचे महत्त्व :** 'मानपंचक' हे सारासारविवेकाला वाहिलेले प्रकरण आहे आणि या अध्याय प्रकरणातील हा सारासारविवेक त्याचीच विकसित विचाराची पुरवणी आहे.

पाचव्या मानाचा विषय पुन: 'संसार विचार' हाच आहे आणि येथे ज्ञानाचे महत्त्व सांगून पुन: 'मानपंचका'तील श्रीरामाचे महत्त्व येथे पुन: गाऊन श्रीरामकृपेने हे ज्ञान होते म्हणून रामउपासना हा धन्य होय असे उद्गार काढले आहेत. मानपंचक व पंचमान हा दोन्ही काव्ये साकल्याने वाचल्यास एक विचार सुव्यवस्थितपणे (form) मांडल्याचे स्पष्ट होते. पंचमानाची रचना करताना समर्थांनी काही प्रयोगही केल्याचे दिसते. एकाच ओवीत मांडलेला विचार प्रत्येक ओवीत पुनरावृत्त करून तिच्या उरलेल्या भागात अन्य विचारांशी तुलना करायची आणि एकाच महत्त्वाच्या विचाराचा वारंवार उच्चार करून (hammering) तो पटवायचा हा तो प्रयोग होय.

या प्रकरणाच्या शेवटच्या ओवीत 'दासबोधी समाप्यते' असे शब्द आहेत.

*येकसे बत्तिसां श्लोकां । साधके पाहाणे बरें । आध्यात्म शोधणे सवें । दासबोधा समाप्यते ॥*

याचा अर्थ प्रा. न. र. फाटकांनी असा केला आहे, 'या सबंध प्रकरणाला दासबोध अशी संज्ञा दिल्याचे 'दासबोध समाप्यते' या शब्दावरून वाटते.[६३] पण हा विचार चुकल्याचे त्यांनाच उमगले आहे. तेच पुढे म्हणतात, 'कदाचित अध्यात्म शोधणे सवे या आधीच्या शब्दामुळे जे अध्यात्म शोधायचे ते दासबोधात समाप्त पावले आहे असाही तर्क करता येतो. पण दासबोध म्हणजे जुना एकवीस समासी वा वीस दशकाचा सातवा दशक, की सगळे वीसदशकी हा प्रश्न शिल्लक राहतोच.[६४] सर्व वीस दशकी दासबोधात अध्यात्म आहे. त्या सातव्या दशकातही आहे. एकवीस समासीमध्येही आहे.

हे सर्व प्रकरण आध्यात्मिक आहे.

## अन्वय-व्यतिरेक

समर्थांनी अन्वय व्यतिरेक हा विषय थोड्या वेगळ्या पद्धतीने हाताळला पण वास्तविक याचा विषयही ब्रह्म-माया-प्रकृती-जीव-सृष्टी इत्यादी आध्यात्मिकच आहे. परंतु वेगवेगळ्या पद्धतीने समर्थांनी तो विषय आपल्या शिष्यांना समजावून दिला आहे.

### वामनपंडितांचे मत

'आवरणभंग' व्यतिरेक ज्ञानात होतो आणि 'विक्षेप भंग' अन्वय ज्ञानाने होतो. मातीत घर नाही, तंतूत पट नाही, सुवर्णात अलंकार नाही, असे जे पाहणे यास 'व्यतिरेक' म्हणतात व घरात माती आहे, पटात तंतू आहे; अलंकारात सुवर्ण आहे, असे पाहणे त्यास 'अन्वय'

म्हणतात याप्रमाणे ब्रह्मात जग नाही, असे जे पाहणे त्यास 'व्यतिरेक' व जगात ब्रह्म आहे असे जे पाहणे त्यास अन्वय म्हणतात. म्हणजे ब्रह्मात जग नाही पण जगात ब्रह्म आहे असे जे जाणणे याचे नाव ज्ञान व याहून इतर जे चौदा विद्या चौसष्ट कलादी सर्व हे अज्ञान.

## रामदासांची कल्पना

*अष्ट देहांची-भवणी । त्यास बोलिजे वचनां । अन्वय ऐसे ॥ उद्भवाचा संहार । ज्ञान प्रलय निरंतर । त्यासि बोलिजे साचार । व्यतिरेक ऐसे ॥*[६५]

म्हणजेच ब्रह्मापासून माया-प्रकृती आदींची रचना कशी झाली हे सांगणे म्हणजे अन्वय आणि दृश्याचा निरास करता करता शेवटी परब्रह्मच एकटे एक असे आहे हे दाखविणे म्हणजे व्यतिरेक अशी रामदासांची व्याख्या आहे. या प्रकरणाचे एकंदर ११ समास आहेत. पहिल्या तीन समासांत अन्वय पद्धतीने तत्त्वज्ञान सांगितले असून पुढील आठ समासांत व्यतिरेक पद्धतीने सांगितले आहेत. हा सर्व विषय अर्थातच सृष्टीच्या उत्पत्तीचा व संहाराचा असून शेवटी ब्रह्म हे एकच एक कसे आहे हे स्पष्ट केले आहे. यातील विषय रामदासांच्या वाङ्मयात अनेक ठिकाणी आलेला असला तरी प्रामुख्याने तो पुढील ठिकाणी आलेला आहे.

१) दासबोध दशक ८, २) दासबोध दशक १२ समास १, २, ३) दासबोध दशक १७ समास १, ८, ९.

हा सर्व विषय पंचीकरणाचा आहे. तो खालीलप्रमाणे निरनिराळ्या कोष्टकात मांडता येतो.

## कोष्टक १ :

(१) स्थूलदेह ५ ५ = २५ तत्त्वे

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| पंचमहाभूते | आकाश | वायो | तेज | आप | पृथ्वी |
| | काम | चळण | क्षुधा | शुक्लिन | अस्थी |
| त्यांचे गुण | क्रोध | वळण | तृषा | श्रोणीत | मांस |
| | शोक | प्रसारण | आलस्य | लाळ | त्वचा |
| | मोहो | निरोध | निद्रा | मूत्र | नाडी |
| | भय | आकोच | मैथुन | स्वेद | रोम |

(२) सूक्ष्म देह ५ ५ = २५ तत्त्वे

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| पंचमहाभूते | आकाश | वायो | तेज | आप | पृथ्वी |
| अंत:करण पंचक | अंत:करण | मन | बुद्धी | चित्त | अहंकार |
| प्राणपंचक | व्यान | समान | उदान | अपान | प्राण |
| ज्ञानेंद्रियपंचक | श्रोत्र | त्वचा | चक्षु | जिव्हा | घ्राण |
| कर्मेंद्रियपंचक | वाचा | पाणी | पाद | शिस्न | गुद |
| विषयपंचक | शब्द | स्पर्श | रूप | रस | गंध |

(२) कारण देह - अज्ञान

(४) माहाकारण देह - ज्ञान

(५) पिंडातील तत्त्वे ८ ४ = ३२

| व्याख्या | १ | २ | ३ | ४ |
|---|---|---|---|---|
| १. चत्वार देह | स्थूल | सूक्ष्म | कारण | महाकारण |
| २. चत्वार अवस्था | जागृती | स्वप्न | सुषुप्ती | तुर्या |
| ३. चत्वार अभिमानी | विश्व | तेजस | प्राज्ञ | प्रत्यगात्मा |
| ४. चत्वार स्थान | नेत्र | कंठ | हृदय | मूर्धना |
| ५. चत्वार भोग | स्थूल | प्रविक्त | आनंद | आनंदविभास |
| ६. चत्वार मात्रा | अकार | उ कार | म कार | अर्धमात्रा (ईश्वर) |
| ७. चत्वार गुण | तम | रज | सत्त्व | शुद्धसत्त्व |
| ८. चत्वार शक्ती | क्रिया | द्रव्या | इच्छा | ज्ञान |
| (६) ब्रह्मांडातील देह | | | | |
| चत्वार देह | विराट | हिरण्यगर्भ | अव्याकृत | मूळप्रकृती |
| (७) चत्वार मुक्ती | सलोकता | सजीवता | सरूपता | सायोजता |

(८) एकंदर तत्त्वे

| | | | | |
|---|---|---|---|---|
| पिंडातील | ८ | ४ | = | ३२ |
| सूक्ष्मदेह | ५ | ५ | = | २५ |
| स्थूलदेह | ५ | ५ | = | २५ |
| अज्ञान (कारण देह) | | | = | १ |
| ज्ञान (महाकारण) | | | = | १ |
| | | | | ८४ तत्त्वे |

ही सर्व कोष्टके दासबोधाच्या आधारावर तयार केलेली आहेत व येथे 'दासबोध ओवीसूची' या पुस्तकातून घेतली आहेत.[६६]

## विचारसरणी

**अन्वय :** मूळ ब्रह्म निर्गुण निराकार आहे. तेथे जाणणे नाही की नेणणे नाही. उमजणे नाही की मरणे नाही, येणे नाही की जाणे नाही. हे ब्रह्म कसले आहे? याचे स्वरूप थोडक्यात असे सांगता येईल की 'उपाधीविण जे आकाश । तेचि ब्रह्म निराभास ।' या निर्गुण ब्रह्माचे ठिकाणी स्फूर्तिरूप अहंकार झाला आणि त्या अहंकारापासून पंचमहाभूतांचा विस्तार झाला. हे स्फुरण जाणीवरूप आहे. या जाणिवेअंती वायुस्वरूप निर्माण झाले. जे जाणीवरूप स्फुरण त्यास 'ईश्वर' असे नाव पडले. हा पंचमहाभूतांचा विस्तार, चत्वारदेहांचा विस्तार इत्यादी मिळून प्रकृती झाली. हीच अष्टधा प्रकृती आणि मूळ ब्रह्म तो पुरुष. मिळून सृष्टीतील जड आणि चेतन विश्व. ही माया त्रिगुणात्मक होऊन विस्तारली. म्हणून हिला गुणक्षोभिणी असे म्हणतात. चत्वार देहाच्या बत्तीस क्रिया, सुषुप्ती, जागृती, स्वप्न व तुर्या अवस्था इत्यादी हा सर्व विस्तार नंतरचा. अशा प्रकारे मूळ ब्रह्मापासून विस्तार हा 'अन्वय' पहिल्या तीन समासांत सांगितला.

**व्यतिरेक :** जे जे उभारलेले आहे ते ते सर्व नाशवंत आहे. म्हणजे अशाश्वत आहे व ते सर्व पुन: मूळ ब्रह्मातच विलीन व्हावयाचे आहे असे म्हणण्यापेक्षा जे दिसते ते सर्व स्वप्नवत् आहे, मिथ्या आहे.

पुढील समासात लिंग देहावेगळा आत्मा कसा आहे ते सांगितले आहे.

हा विचार थोड्या वेगळ्या पद्धतीने समजावता येतो. 'मृत्यू' हा सर्वपरिचित आहे. तो कोणाच्यात हातात नाही. म्हणजेच जी जी चेतन वस्तू आहे ती ती मरणारच. म्हणजे नाश पावणारच. म्हणजे तो जेव्हा जन्मला तेव्हा काही कारणाने जन्मला आणि नष्ट झाला. म्हणजेच हे जन्मणे आणि मरणे याला कारण असणारे जे तत्त्व ते काही तरी आहे व ते शाश्वत आहे. हे जन्मणे आणि मरणे अशाश्वत म्हणून स्वप्नवत म्हणजेच मिथ्या. हाच व्यतिरेकाचा विचार.



# ५. रामदासांच्या स्फुट काव्यांचा अभ्यास

## करुणाष्टके, धाट्या, सवाया.

करुणाष्टके म्हणजे करुणरस-पर काव्ये. यात आठ-आठ पदे अथवा कडवी आहेतच असे नाही आणि करुणाष्टके म्हणून जो या ग्रंथाचा भाग आहे त्यात करुणरसपर कविताच आहेत असेही नाही, तर त्यांत विविध प्रकारचे विषय आलेले आहेत. धाट्या आणि सवाया हे काव्यप्रकार आहेत आणि या तीनही प्रकारची रामदासांची कविता या ग्रंथात संग्रहित झालेली आहे. विविध विषयांवरील स्फुट रचना या ग्रंथात समाविष्ट झाल्याने त्यासंबंधीचे सलग विवेचन करणे अर्थातच कठीण आहे, पण याच विविधतेवरून रामदासांचे विचार, त्यांचे भावबळ, त्यांची भक्तिभावना, त्यांचे निरीक्षण, लोकस्थिती, आत्म-चरित्रात्मक काही अंश, अशा अनेक गोष्टींच्या बाबतीत रामदासांचे खरेखुरे दर्शनही या ग्रंथात होते.

सामान्यपणे 'करुणाष्टके, धाट्या, सवाया' या ग्रंथातील एकूण २५९ कवितांची विषयवारीने वर्गवारी केली आहे (विषयापुढे पद्य क्रमांक घातले आहेत).

### करुणाष्टके

श्री. शं. कृ. देव यांनी प्रस्तावनेत करुणाष्टकांचे स्वरूप विशद केले आहे : "करुणाष्टके म्हणजे करुणाघन परमेश्वरास, आपल्या इष्ट उपास्य दैवतास, दीनदयाळ सद्गुरूस परोपरीने प्रेमभराने आळवणारी कविता. आपल्या अवगुणांची आठवण होऊन अनुतापयुक्त जे छंदोबद्ध उद्गार मुखावाटे बाहेर पडतात, ती करुणाष्टके होत. ज्या कवितेत पश्चात्ताप आहे, संसाराची असारता आहे, विवेकयुक्त वैराग्य आहे, मोक्षाची अपेक्षा आहे, सद्गुरूंचा धावा आहे, तिला करुणाष्टक म्हणावे"[१]

*जन्मासि येता उघडेंचि यावे । सेवी जिवें सांडुनि सर्व जावें ।।*[२] ६०-२

अशा रीतीने प्रपंचाची नश्वरता दर्शविणारी,

*शुभाशुभ होणार काही कळेना । पुढे प्राप्त ब्रह्मादिकां ही टळेना*[३] ।।२४

अशी मनुष्याची पराधीनता प्रकट करणारी, ........... संसाराची रडकथा प्रत्ययास आणून, प्रपंच व परमार्थ दोन्ही करावयास सांगणारी, स्वत:च्या अवगुणांची आठवण होऊन मनाला कष्टी करणारी, जनसंसर्गाचा वीट आणणारी, लोकांना शिकवणारी.... अशी कविता करुणाष्टके होत."[४] देवांनी केलेली ही व्याख्या फारच व्यापक आहे. मन:संवेदनांना वाट करून देणारी कविता म्हणजे करुणाष्टके. अगदीच संकुचित शब्दार्थाने पाहिल्यास करुण-आर्त स्वर व्यक्त करणारी कविता म्हणजे करुणाष्टके होत. तथापि देवांनी यासंबंधी असे म्हटले आहे की, 'हे रडणे निरुत्साह, हताश करणारे नव्हे, ते धीर देणारे, रडणाराची चित्तवृत्ती प्रसन्न करणारे, त्याच्या ठिकाणी आत्मविश्वास उत्पन्न करणारे, त्याला परमार्थाच्या वाटेवर आणून सोडणारे असते.[५] मग याला करुण-रस कसे म्हणायचे? याचाच अर्थ असा की आर्तता ही भगवद्भेटीची

आहे, मोक्षाची आहे, दु:ख आहे ते ती भेट लवकर मिळत नाही म्हणून आणि तोपर्यंतचे ते दु:ख करुण-रसाचेच मानले पाहिजे. हा करुणरस व्यावहारिक लाभासाठी नसून उच्च कोटीच्या आनंदासाठी तळमळण्यातून निर्माण झालेला आहे.

## रामदासांची कथात्मक कविता

रामदासांची कथात्मक कविता तशी फार नाही. रामायणाची कांडे हीच त्यांची अशा पद्धतीची मोठी रचना. बाकी सारी रचना स्फुट स्वरूपाची. तथापि करुणाष्टकात चार-पाच पदे कथात्मक स्वरूपाची आहेत. ही अगदी लहान आहेत. यापैकी एक 'बाहेगावचा मारुती' हे पद्य आहे. फक्त १० श्लोकांचे हे काव्य आहे. यात बाहे गावाच्या मारुतीचा इतिहास दिला आहे. रघुनाथाने देवांना बंदीतून मुक्त केल्यानंतर ते अयोध्येला जायला निघाले. वाटेत कृष्णातीरी स्नान-संध्या करण्यासाठी थांबले. परंतु अकस्मात कृष्णेचे पाणी वाढू लागले म्हणून मारुतीने तो प्रवाह आपल्या बाहूंनी अडविला. या एका प्रवाहाचे दोन प्रवाह झाले व मध्ये जेथे श्रीराम संध्येस बसले होते ती जागा बेट बनली. एवढाच प्रसंग आहे.

दुसरे कथाकाव्य अहिल्योद्धाराचे आहे (७४) याच कथेवर अहिल्याशिळा (९६) हेही काव्य रचिले आहे. पहिल्यात २० श्लोक आहेत आणि दुसऱ्यात ६. दुसरे काव्य कथेचे सूत्र सांगणारे आहे. म्हणजे त्यात फक्त प्रसंग सांगितला आहे आणि पहिल्यात अहिल्येची मन:स्थिती आणि तिची चिंता आणि भक्ती या भावना व्यक्त झाल्या आहेत. 'मनामाजि ते जाहली दु:खवेळा', 'सदा सर्वदा लोचनीं वाट पाहे', 'बहूसाल ते कष्टली दिव्य बाळा', 'कधी राम येईल आनंदवेळा', 'सदा सर्वदा चिंतिते पाय चित्ती', 'समर्था मनी सांडि माझी नसावी' अशा कितीतरी ओळींनी अहिल्येची वेदना बोलकी केली आहे. भावाभिव्यक्तीत समर्थांचे सामर्थ्य काही आगळेच आहे, हे यावरून स्पष्ट होते.

आणखी एक काव्य प्रसंग वर्णनाचे आहे. 'लंकेत मारुती (१५८)'[६] यात लंकेत मारुतीने काय काय केले याचे मोठे सुरम्य वर्णन आहे. एका दृष्टीने ही लहानशी कथाच. मारुतीचे पुच्छ राक्षसांनी कसे बांधून टाकले. कर्करूनि बांधले, ते चर्वडीत चेंदले, पण ते फुटेचिना, तुटेचिना म्हणून 'लटलटीत कांपती समस्त भगले करी' मग मारुतीनेही दैत्यनाश केला. दैत्यांना 'काटकाट काटिले', 'हातपाय मान भाग वोढिते पछाडितें', 'आडचणीत आडकऊनि पीळणेच काढिते' असे मोठे सुरेख आणि नित्याच्या बोलीभाषेतील वर्णन प्रत्ययकारी आहे. शब्दशक्ती रामदासांचे वैशिष्ट्य, वर्णनकौशल्य रामदासांचे, ओघवती आणि चित्रमय भाषा ही रामदासांची विशेषता, भावाभिव्यक्तीतील सहजता हा रामदासांचा गुण आणि सर्वांत महत्त्वाचा गुण म्हणजे त्यांचा वर्ण्यविषयाशी झालेली तादात्म्य अवस्था आणि आपलेपणा. हे सर्व काव्य-गुण रामदासी काव्यात आढळतात आणि इतके असूनही 'रामदासांच्या रचनेत काव्य नाही' अशी ओरड ऐकायला येते, याचे आश्चर्य वाटते.

## आचार-निष्ठा

श्री समर्थांचा आचारावर केवढा भर । आचारशून्य मनुष्य कितीही ज्ञानी असला तरी तो नष्ट समजावा–

या आचाराबाबतीत समर्थांच्या वाङ्मयात अनेक वाक्ये, विचार अनेक ठिकाणी प्रकट

झाले आहेत. दासबोधातही अशी स्थळे कितीतरी ठिकाणी आहेत. त्यांचा सगळा भर विवेक, आचार, विचार, उपासना, वैराग्य आणि आत्मनिवेदन यावर आहे.

## आत्मचरित्रपर उल्लेख

करुणाष्टकातील काही पद्ये आत्मचरित्रपर आहेत, हे स्पष्ट दिसून येते. 'हरिपद' (७५) या २० छंदांच्या पद्यात त्यांचा 'स्व-भाव' व्यक्त होतो आणि तो आत्मचरित्रपर मानावा लागेल.

संगीताची आवड, संगीत जीवनाची (सुव्यवस्थित) उपेक्षा, लोक समर्थांचा हेवा– मत्सर करीत, घडीघडीने काळ हा लय बिघडतो, माझ्या मनात कधीच विपरीत येत नाही. हरीकडे लय लागलेला असतो– ही सर्व आत्मस्थिती समर्थांनी या पद्यात वर्णन केली आहे. 'मज दया करि रे करुणालया', 'घडी घडी बिघडी वय काळ हा' यातील वेदना हा सर्व आत्मकथनाचाच भाग आहे. 'उदासीन हे वृत्ति कोठे न लागे' यातील दुःख व आर्तता यांचा विचार 'करुणास्तोत्रा'त आला आहे.

## आर्तता

रामदासांच्या इच्छा-आकांक्षा काही वेळा काव्यांतून स्पष्टपणे प्रकट झालेल्या आहेत, काही वेळा उद्वेगजनक उद्गारावरून त्यांना काय हवे होते आणि काय नको होते यावर प्रकाश पडतो. 'रघुनायका मागणे हेचि आता' (६७) या पद्यात 'तुझे रुपडे लोचनीं म्या पहावें', 'मज संकटी सोडवावे समर्था' अशी मागणी मागितली आहे. निंदक (७६) मध्येही 'तुटों दे तुटों दे तुटो दे उपाधी' म्हणून उपाधी तुटून जाऊ दे म्हणून त्रिवार मागणी केली आहे. 'भवाचा वीट' आल्यामुळे 'मना चाल उठी बना दुर्गमातें' म्हणून दुर्गम अशा मनात चलण्याची मनाला विनवणी ते करताना दिसतात (७९) 'दुःखानळे मी संतप्त देहीं । तुजवीण रामा विश्रांती नाहीं ।' असे म्हणून 'सर्वोत्तमा कै मज भेटि देसी' असा आर्त प्रश्न त्यांनी विचारला आहे. (११०) 'रघुवीर भजनाची मानसी प्रीति लागो' (१४) अशी इच्छाही प्रकट केली आहे.

## रामकृष्णावतारांचे प्रयोजन

रामाचे ब्रह्मस्वरूप मानून रामावताराचे प्रयोजन त्यांनी अनेक वेळा सांगितले की, राम हाच उत्पत्ती-स्थिती-संहारकर्ता आहे, तो लालावतारी आहे. पण तो 'बहु चिंतितां शोक संताप हारी' (५८) असल्याचा निर्वाळा समर्थ देत आहेत. 'मऊ पुष्पे कुपे जयाला' असा राम वनाला शीघ्र पायी जायला निघाला तो कशासाठी? अहिल्योद्धार, सीताशोध, रावणवध, देवांना बंदींतून सोडविणे, भक्तांना मुक्त करणे, सौख्य देणे. 'राम रणीं' रजनीवर मारी (१८८) हेच रामावताराचे प्रयोजन आहे. 'राम हा जनसज्जनविश्राम (२१४)' आहे. थोडक्यात सांगायचे तर 'सीतानाथ समर्थ यासि तुळणा ब्रह्मांड देतां नये' (२३५) ही रामाची थोरवी आहे आणि राम आणि कृष्ण यांच्यात भेद नसल्याची ग्वाही समर्थांनी आधीच देऊन ठेविली आहे. 'राक्षस मातले, रावणाने देवांना बंदीत टाकले, स्वधर्माचा लोप झाला, अनाचार वाढला. म्हणून अनाथांच्या हांकेसरशी राम धावून आले.'

रामदासांचा आत्मविश्वास जबरदस्त आहे. जितकी त्यांची रामनिष्ठा प्रखर आहे, तितकाच

त्यांचा रामाविषयीचा, त्याच्या कृपेविषयीचा विश्वासही प्रखर आहे. रामाचा दास हा स्वतंत्रच असणार, तो पराधीन असूच शकत नाही, असे उद्गार त्यांनी काढले आहेत.

रामाची भक्ती करणारा हा रामदासी आणि अशा रामदासांचा संप्रदाय तो रामदासी संप्रदाय.

## करुणाष्टकांची काव्यात्मकता

करुणाष्टकात काव्यात्मकतेची वाण नाही. रामदास हे कवी नाहीत असे समजणाऱ्यांना 'करुणाष्टके' आव्हान देत आहे की रामदासांत कवीचे, कवित्वाचे कोणते गुण उणे आहेत ते त्यांनी दाखवून द्यावे. अलंकार, भाषाशैली, रसवत्ता, भावोत्कटता, प्रतिमासृष्टी, वर्णनशैली, आकर्षण, माधुर्य, ओज, भक्तिरस सर्व गुणांचे दर्शन करुणाष्टकांत झाल्याशिवाय राहणार नाही. (१) उपमा, रूपक, दृष्टान्त, विरोधाभास हे अर्थालंकार आणि अनुप्रास हा शब्दालंकार इतक्यांचा करुणाष्टकात आढळ होतो.

### उपमा

उदा. (१) *चकोरासि चंद्रोदई सूख जैसे । रघुनाथका देखता सूख तैसे ।*[७]
(२) *दिसे भ्रांतिचे सर्व आभाळ जैसे*[८] (५९)
अशा उपमा काव्यसौंदर्य वाढवितात.

### रूपक

१) 'परमार्थाचे भोजन' (६) या सर्व सहा श्लोकांच्या पदात सर्व रूपक आहे.

असे हे रूपक परमार्थाच्या भोजनाचे आहे. २) देह आणि कर्म यांचा दुपदरी दोर वळला आहे, कर्मामुळे देह आणि देहामुळे कर्म असा हा दोर आहे.

३) त्याचप्रमाणे 'उभी सुंदरी सांग पां कोण आहे' (८६) हे सर्व रूपक मायेवरील आहे. 'निशीभ्रांतिवेळा सर्वकाळी दिसणारी जी अंतराळी निर्माण झाली, जिच्या हाता आकाशीचे धनुष्य आहे, सोन्यामोत्यांचे अलंकार ल्याली आहे, गळ्यात हार असा श्रृंगार केला आहे, रज्जू-सर्प हाती घेऊन जनाला दाखवीत आहे, ब्रह्मादिक जिच्यावर मोहित झाले आहेत, अशी ही माया सुंदरी आहे[९], हे सांगरूपक अत्यंत सुंदर आहे.

### शब्दकौशल्य

रामदास हे शब्दप्रभू आहेत, हे पुन:पुन: सांगितले तरी वावगे होणार नाही. नवीन शब्द सहज रचना करता करता ते घडवून टाकतात आणि ते शब्द त्या ठिकाणी अशा चपखल अर्थाने बसतात की त्यांच्याऐवजी दुसरे शब्द चालणारच नाहीत. ते शब्द आपल्याबरोबर अर्थाचे वजन घेऊन येतात.

### वर्णनकौशल्य

वर्णनकौशल्य ही रामदासांची विशेषता आहे. काही वेळा सामान्यांना समजेल अशा भाषेत तात्त्विक विचार मांडण्याची रामदासांची हातोटी आगळी वाटते.

(१) गोपाळकाला (४८) या पद्यात हंडी कशी बांधली जाते, बालगोपाल कसा प्रयत्न करतात, शिंके तुटून मडके कसे फुटते आणि मग काही कसे आपटतात, याचे वर्णन हृद्य आहे.

(२) देवाला तुम्ही सत्वर उमगा, जर उमगला नाही तर 'सगळाच शिमगा' हे वर्णन प्रभावी आहे (५०)[१०]

(३) लोकांच्या तऱ्हा (८३) या काव्यात नवीन नवीन शब्दांबरोबर लोकांच्या तऱ्हांचे एकेका शब्दात हुबेहूब वर्णन केले आहे. ही शैली तर भाषाप्रभुत्वाचे उत्कृष्ट उदाहरण आहे. एका शब्दात लोकांच्या स्वभावाचे मार्मिक वर्णन करणे कौशल्याचे काम आहे. 'किती येक ते आचकले बचकलेसी, कर्करीता, कुर्कुरीती', 'ठगाणा बोलणारे', 'वादक (वाद घालणारे), उद्धट, लंपट, चोरटे, द्वाड, लबाड, डाईक सर्वकाळ, देवताळे, भुताळे, प्रसंगी गचांड्या, बुक्क्याचा मार, मग प्रसंगी तये घोर जाली रुदंता, मुले-लेकुरे भोवती तोंड घेती'[११] असे यथार्थ वर्णन अत्यंत संक्षिप्त शैलीत केले आहे.

## रसवत्ता

बीभत्स, हास्य आणि वीर या रसांची निष्पत्ती चार-पाच पद्यांत झाली आहे. पण मुख्य रस ब्रह्मरस किंवा समर्थांच्याच भाषेत हरिरस आहे. भक्ती आणि वात्सल्य या रसांना साहित्यात नवरसांहून वेगळे स्थान प्राप्त झाले आहे. म्हणून माणूस दुसऱ्यावर प्रेम करतो ते सापेक्ष आणि सशर्त असते, पण आत्म्यावरचे प्रेम सापेक्ष नसते, तेच खरे प्रेम होय. म्हणून ज्याला आत्मसाक्षात्कार झाला त्याचे आत्म्यावरील प्रेम हे जगातील कोणत्याही वस्तूवरील प्रेमापेक्षा उत्कट असणारच. म्हणून जेव्हा संत कवी बाह्यजगातील वस्तूंची, स्त्रीची, स्त्रीसौंदर्याची, कामवासनेची, प्रेमाची निंदा करतात आणि राम, कृष्ण, विठ्ठल आदी देवांची बेफाट स्तुती करतात ती कृत्रिम समजून चालणार नाही. ते त्यांचे प्रेम खरे प्रेम असते. तेथेच त्यांना रस असतो. अन्य जग नीरस असते. म्हणून रामदास अशा रसाला 'हरिरस' असे म्हणतात. सर्व संताच्या वाङ्मयावरून या रसाला 'ब्रह्मरस' असे म्हणणे संयुक्तिक होईल.

## छंदोरचना

करुणाष्टकात रामदासांनी विविध छंदांचा उपयोग करून रचना केली.

# पदपदांतरे

प्राचीन पदांची लक्षणे खालीलप्रमाणे मानता येतात

(१) स्फुट व गेय रचना
(२) देवदेवतापर म्हणजेच पारलौकिक विषय
(३) कलापूर्ण रचना (त्यात गेयतेचा अंतर्भाव होतो)
(४) भक्तिभाव अगोचर असतो, पण तो गोचर होण्यासाठी धडपडत असतो.
(५) बव्हंशी भक्तीची प्रेरणा
(६) जीवनातील विविध भावसंबंध पण त्यातूनही आत्मसमर्पणाची (Complete

—) भावना प्रधान असल्यामुळे 'माउली' या शब्दाने हा भावसंबंध प्रकट होतो. म्हणजेच देव-भक्त संबंध हा माता-पुत्र संबंधासारखाच उत्कट असतो.

(७) प्राचीन मराठी पद अथवा गीत हे कशाचे तरी नाट्य असते.

## प्राचीन पदांचे महत्त्व

'प्राचीन मराठी पदांचे महत्त्व विविध प्रकारचे आहे. ही पदे गेय असल्याने छंदोदृष्ट्या अतिशय महत्त्वाची आहेत. मराठी छंदांचा ऐतिहासिक दृष्टीने अभ्यास करण्यासाठी प्राचीन पदांचा फार उपयोग होणार आहे. कित्येक पदांवरून त्या त्या वेळच्या समाजस्थिती वगैरेंवर प्रकाश पडतो. पदांच्या म्हणण्याच्या धाटणीवरून महाराष्ट्रांतील पूर्वीच्या संगीत-पद्धतीचा अदमास बांधता येणे शक्य आहे.'[१२] 'भोळी ग मी भोळी' या एकनाथांच्या पदावरून त्या काळी स्त्रिया न्हाताना केसांना लोणी लावीत असत, असे दिसते.

## पदांचे वर्गीकरण

मराठीतील प्राचीन पदांचे वर्गीकरण स्थूलमानाने खालीलप्रमाणे करता येईल :

(१) कवीचा आत्माविष्कार असलेली पदे.
(२) देवतापर पदे.
(३) गोपी गीते.
(४) पौराणिक प्रसंगावरील पदे.
(५) गुरुस्तवनपर पदे.
(६) कीर्तन-भजनातील विशिष्ट पदे.
(७) भूपाळ्या.
(८) आरत्या.
(९) प्रासंगिक पदे.
(१०) विविध

## रामदासांची पदपदांतरे

रामदासांची पदे (पदपदांतरे) प्राचीन पदांत समाविष्ट होत असल्याने प्राचीन पदांची जी वैशिष्ट्ये-लक्षणे वर सांगितली आहेत, त्या वैशिष्ट्यांनी युक्त अशीच आहेत. रामदासांच्या पदांचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. रामदास हे संगीतज्ज्ञ असल्याने त्यांनी आपल्या पदांची रचना रागदारीत केली आहे. प्रत्येक पंचकाच्या वर रागाचे नाव लिहिले आहे. उदाहरणार्थ– 'पूर्णपंचक-मारू', 'दयाळपंचक-मारू', 'मारू वैराग्यपंचक' अगम्यपंचक राग केदार' अवस्थापंचक मठताल', 'हुशारपंचक-गौडी दुताल', 'राग-कामोद पंचक' इ. यावरून काही त्या काळच्या नवीन रागांची व तालांची माहिती मिळण्याचा संभव आहे.

## विवेचन

**संगीतप्रेम :** पहिलेच पद आरंभपंचकातील नृत्यासंबंधीचे आहे. *'आरंभी नाचतुसे ।*

*श्रीगणाधीश आरंभी नाचुतसें ।'* म्हणून तालाचे बोल या पदात दाखविले आहेत.

*'द्राम द्राम धि किटक द्राम धिकिटक द्राम द्राम धिकिटक द्राम धिकिटक थोंगा तग थोंगा थेमा ।।*[१३]

असाच ताल तीन कडव्यांत व्यक्त केला आहे. कदाचित सृष्टीच्या आरंभाचा तर हा नाच नसेल? रामदासांचे तालज्ञानही या पदात व्यक्त झाले आहे.

## आत्मचरित्रात्मक ग्रंथ

*बहु श्रवणें घटेल आता होऊनियां ठेलों । सिद्धपणाचा ताठा आंगी घेऊनी बसलों ।* या पदात रामदासांनी आपले अंतरंग व्यक्त केले आहे. सिद्धावस्था प्राप्त झाल्यानंतर मनात कदाचित अहंकार वाटला असेल. आत्म-निरीक्षण-परीक्षण अगदी कठोरपणे केले असल्याचा हा पुरावा आहे.

हीच मनाची तळमळ ६७ व्या पदातही व्यक्त झाली आहे.

*दीन दयाळा राघवा पाव रे बेगी । दीन अनाथ पतीत, उगुणी, भजन नेणे काहीं........ ऐसा भवरोगी'*[१४]

'तारुण्य गेले कडे वृधात्म आले' या १०२ व्या पदात[१५] किंवा 'संसारी शिणलों बहुत कष्टलो' या १०३ व्या पदात[१६] किंवा 'मज अत्यंत संसारें गांजिले हे रामा... येकला येक्ट जालो रामनरिं ......' या १०८ व्या पदात रामदासांनी आपल्या मनाचे दुःख व्यक्त केले आहे.

रामदासांची आर्त कविता विपुल आहे आणि त्यात कारुण्य उत्कटेतने व्यक्त झाले आहे.

**अनुभूती :** बहुतेक सर्व पदांत ही साक्षात्काराचीच अनुभूती व्यक्त झाली आहे. १५ व्या पदात[१७] त्यांनी एक अनुभवाचा उद्गार काढला आहे आणि तो त्यांचा पुनः पुनः उच्चार करून निश्चयार्थाने सांगितला आहे.

*राम राम राम राम राम चि विश्राम धाम । देव देव देव देव चिंतितो महादेव । सार सार सार सार पाविजे पैलपार । धन्य धन्य धन्य धन्य होइजे सकळ मान्य । रामा रामदासी भाव । अभावासी कैचा ठाव ।।*

यात रामदासात अभावाला ठाव नाही. तेथे भावच भाव आहे आणि हा भाव कोठे 'राम' हाच विश्रामधाम आहे. महादेवही ज्याचे चिंतन करतो तो राम. तोच पैलपार नेणारा आहे. तोच सर्वांचे सार आहे. त्याचे नाव घेऊन सहज धन्य होऊन जाता येते. या पदात शब्दरचना साधी असूनही भावउत्कटता साधली आहे.

**(५) भक्तीची दृढता :** भक्तिभावाची दृढता तर रामदासांच्या प्रत्येक पदात दिसून येते. यातील भक्ती न सोडण्याचा दृढनिश्चय वाखाणण्यासारखा आहे. ब्रह्म फक्त संतांनाच दिसते. पाषांडासी तर्कसुद्धा न घडे येथ– आणि रामदासांना ते पावले असा निश्चित विचार त्यांनी पदक्रमांक ३०[१९] मध्ये व्यक्त केला आहे.

अनेक दृष्टान्त देऊन रामदासांनी आपण ब्रह्म पाहिले आहे असे आत्मविश्वासपूर्वक दृढतेने सांगितले आहे.

*उगवता तरणा आनंदे नळणा । धेटुला पाहुणा न घडे तेथे । देखितां निशापती चकोर तृप्त होती । वायेसांची पंगती न घडे तेथे । स्वानंदयुक्त द्रवे सोमकांत । गुंडासी सांगात न घडे तेथे । कोकिळेचे गाणे सकळां समाधान । श्रोता मंदामान न घडे तेथे । रत्नांचे परीक्षणे डोळ्यासीच*

*पाहाणे । जाता अंधा पाहाणे न तेथे । रामदासी ब्रह्म येक संतासी देख । पाषांडासी तर्क न घडे तेथे ।*[२०] (पद)

याच पदात अर्थगौरवही प्रकट झाला आहे. रत्नांची परीक्षा डोळसालाच होते. पण हा डोळा वेगळा आहे. आपण सर्वच डोळस आहोत. पण ते डोळे तज्ज्ञाचे.

## रामदासांची हिंदी कविता

संवत् १९८६ च्या दहाव्या अंकात काशी नागरी प्रचारिणी पत्रिकेच्या[२१] अंकात श्री भीमराव भालेकर यांचा एक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यात मराठी संत कवींनी हिंदी भाषेतही कविता लिहिल्याचा उल्लेख आहे.

महानुभाव पंथ (जयकृष्णी) के संस्थापक श्री चक्रधर महाराज का रचनाकाल शके ११९४ है । इस पंथ के अनुवर्ती संत महात्मा अपनी शिष्यपरंपरा को अपने धार्मिक सिद्धान्तोंका बोध कराने के लिए हिंदी में रचना करते रहे । श्री चक्रधरजी, उमाम्बर दामोदरने ईशभक्तिविषयक विभिन्न रागरागिनियोंकी कविताएँ रची जो उत्कृष्ट कोटिकी रचनाएँ मानी जाती है । ज्ञानेश्वर और मुक्ताबाई की हिंदी कविता का पाठ आज भी महाराष्ट्र में होता है । भानुदास- जनार्दनस्वामी, दादू पिंजारी, एकनाथ, तुकाराम, कान्होबा, जनी जनार्दन की (हिंदी) रचनाएँ हिंदी साहित्यमें अमूल्य निधि है । इब्राहिम शाह का 'नवरस' हिंदी विषयक अनुपम ग्रंथ है । जयराम, रघुनाथ व्यास, रघुनाथ कवि, ठाकूर, चतुरद, लछीराम, श्याम गुसाई, शिवदास केहरी, गंग, गयं, ददेव, सुखलाल, रामानुज, दुर्ग ठाकुर, सुविंद्धराव, विश्वंभर, भाटकी रचनाएँ आज उपलब्ध है । महानुभावपंथी कृष्णमुनि, चक्रमणि व्यास, विधिचंद्र शर्मा की रचनाएँ मिलती है । 'अवतार रासी', 'ब्रह्मविद्या प्रकाश' आदिग्रंथ प्रसिद्ध है ।

भूषण, गंगेश, श्री गोविंद आदि विविध कवियोंकी रचनाएँ उपलब्ध है । शिवकालीन नाथपंथीय संत मानसिंह नाथस्वामी के अतिरिक्त नाभा, सेनानाई, शेख सुलताना, शेख फरीद, काजी मुहम्मद, जिंदा फकीर, सैयद हुसेन, बहादूरकब्जा लतीफ शाह, सुलतान कादर आदिकी रचना ।' त्यातील अनेक नावे महाराष्ट्रीय वाटत नाहीत परंतु हे सर्व कवी महाराष्ट्रात राहात असावेत. त्यांची जी हिंदी कविता आहे असे या लेखात म्हटले आहे ती सर्व कविता प्रकाशित असल्याचे दिसत नाही. भूषणला मराठी कवी कसे मानता येईल? 'जिंदा फकीर' हे नाव रामदासांनी धारण केले होते. त्यासंबंधी पुढे विवेचन येईलच. तथापि त्यासंबंधी संशोधन होण्याची गरज आहे.

डॉ. विनयमोहनशर्मा यांनी आपल्या प्रबंधात[२२] (हिंदीको मराठी संतोंकी देन) रामदासांच्या फक्त चार-पाच हिंदी पदांचा उल्लेख केला आहे. याच चार-पाच पदांच्या आधारे ग. वा. तगारे यांना समर्थकृत हिंदी पद्यरचना[२३] या नावांचा लेख लिहिला आहे. त्यातही समर्थांची हिंदी कविता एवढीच असल्याबद्दल आश्चर्य व्यक्त करण्यात आले असून त्यांची आणखी हिंदी कविता असण्यासंबंधी तर्क व्यक्त केला आहे. प्रा. न. र. फाटक यानाही रामदासांच्या दोनच पदांच्या आधारे 'समर्थांची हिंदी कविता' या नावाचा लेख 'रामदास आणि रामदासी[२४]' या मासिकात प्रसिद्ध केला आहे. रामदासांच्या हिंदी कवितेसंबंधी एक संक्षिप्त परिचयात्मक लेख प्रस्तुत लेखकाने सांगली कॉलेजच्या[२५] मध्ये प्रकाशित केला आहे. 'मराठीके संत कवि रामदास की हिंदी रचनाएँ' या विषयावर त्यांचे हिंदी भाषण पुणे आकाशवाणीवर दि. २० जून १९७१

रोजी प्रक्षेपित करण्यात आले.

रामदासांच्या हिंदी कवितेसंबंधी मराठी साहित्यात एवढेच समालोचनात्मक वाङ्मय आढळते.

## हिंदी पदसंख्या

समर्थांचा कविता समुद्र अफाट आहे. हिंदी पदांची संख्याही एक हजारावर आहे. ही सर्व कविता धुळे येथील समर्थ वाग्देवता मंदिराच्या दप्तरात प्रकाशनाची वाट पाहात आहे. धुळ्याचे श्री ग. म. पाठक यांनी या एक हजारावर असलेल्या हिंदी रचनांची आपल्या प्रबंधासाठी निवडही केली आहे. या सर्व हिंदी कवितेचा अभ्यास एका स्वतंत्र प्रबंधाचा विषय असल्याने येथे फक्त प्रकाशित हिंदी पदांचाच विचार केला आहे.

## प्रसिद्ध झालेली हिंदी कविता

धुळ्याचे कै. नानासाहेब (शं. श्री. देव) देव यांनी रामदास आणि रामदासी ग्रंथमालेतून समर्थांची कविता प्रसिद्ध केली आहे. त्यापैकी ग्रंथमालेचा पंचवीसावा भाग 'समर्थकृत पदपदांतरे' यांचा आहे[२६] या ग्रंथात समर्थांची पदे, आरत्या, भूपाळ्या इ.चा समावेश आहे. उद्धवस्वामींच्या हस्तलिखितावरून नकलून घेतलेली कविता पूर्वार्ध व उत्तरार्धात समाविष्ट असून गिरिधरांच्या हातची पदे वेगळी छापली आहेत. त्यामुळे काही कविता पुनः पुनः छापली आहे. या ग्रंथात हिंदी कविता एकूण १३५ आहेत. तसेच कै. श्री अनंतदास रामदासींना अनेक ग्रंथांच्या आधारे श्री समर्थांच्या अभंगांचा गाथा[२७] प्रसिद्ध केला आहे. त्यात हिंदी पदांचे सहावे प्रकरण स्वतंत्र आहे. या प्रकरणात पद क्रमसंख्या १६५९ ते १७३७ पर्यंत हिंदी पदे आहेत. शिवाय इतर पृष्ठांतूनही काही हिंदी कविता विखुरली आहे. 'पदपदांतरे' या ग्रंथात येऊन गेलेली पदे सोडल्यास 'गाथेत' नवीन पदे २८ आहेत.

याशिवाय 'श्री समर्थ सांप्रदायक दैनंदिन उपासना'[२८] या नावाची एक पुस्तिका समर्थ सेवा मंडळाने प्रकाशित केली आहे. याच ग्रंथाची कदाचित सुधारून वाढविलेली आवृत्ती म्हणून के. भि. ढवळे प्रकाशन क्रमांक ३० म्हणून 'श्री समर्थ सांप्रदायिक नित्यनैमित्तिक उपासना मार्ग प्रदीप[२९]' या नावाचे एक पुस्तक प्रसिद्ध केले आहे. या दोन्ही पुस्तकात अन्यत्र प्रकाशित न झालेली ६ पदे आहेत. आणखी एक हिंदी रचना देवांनी प्रकाशित केलेल्या 'करुणाष्टके, धाट्या, सवाया, या ग्रंथात ११४ क्रमांकाने 'दुनिया' या नावाने छापल्या आहेत.

**नाममुद्रा :** रामदासांनी आपल्या हिंदी कवितांत अनेक कविनामे (मुद्रा) धारण केली आहेत. रामदास, रामदास प्रभु, दास, दासजन्य, रसिक, हरिजनदास, भगत, रामको दास, रामको घेरा, फकीर, बंदा फकीर, दास फकीर, बंदा कमीन, जसवंत, सेवक, भक्त, बंदे खुदा दास फकीर आणि रामी रामदास अशी अनेक नावे आपल्याला आढळतील. कवितेतील नाम ज्या प्रकारचा असेल, अथवा कवितेची भाषा उर्दूप्रधान अथवा संस्कृतनिष्ठ – शुद्ध हिंदी अशी जशी असेल त्याला अनुसरून नावे धारण केलेली दिसतात. जेथे दरबारी असेल तेथे दरबारी नाव 'जसवंत' धारण केलेले आढळून येते. ज्या कवितेत अल्ला-ईश्वर अभेदाचा विषय असेल तेथे बंदे खुदाई अथवा दास फक्कर (फक्कड) आणि जेथे भावप्रवण आर्तता, प्रार्थना, विरहव्याकूळ अवस्था व्यक्त करावयाची असेल तेथे दास, दासजन्य, भक्त, सेवक अशी नावे घेतलेली आढळतात. नावाची अशी निवड करण्यातही औचित्य दिसून येते आणि स्वतःच्या

रचनेला औचित्याबाहेर जाऊ न देण्याची सावधगिरी रामदासांनी बाळगिली आहे असे त्यांच्या सर्व हिंदी पदांत घेतलेल्या टोपणनावांवरून व अन्य गोष्टीवरून दिसून येते.

## श्रीरामाचे रूपसौंदर्य व समर्थांना झालेला सगुण साक्षात्कार

श्रीरामाचे रूपसौंदर्य, कर्तृत्व, भक्तासंबंधींचे प्रेम यांनी रामदास भारावून गेले आहेत. रूपसौंदर्याचे वर्णन त्यांना अनेक ठिकाणी केले आहे. हे वर्णन केवळ काल्पनिक आहे असे वाटेत नाही. रामदासांना श्रीरामाचा रूप साक्षात्कार - सगुण साक्षात्कार झाला असावा असे त्यांच्या कवितेतील वर्णनावरून वाटते. काही ठिकाणी तर त्यांनी तसा निर्वाळाही दिला आहे. या पदातून दोन गोष्टींची कल्पना येते. एक तर श्रीरामाचे दर्शन घडल्याने रामदास स्वत:ला धन्य समजतात आणि दुसरे म्हणजे त्यांना दर्शनाने झालेला आनंद उत्कटपणाने त्यांनी वर्णिला आहे. केव्हा केव्हा कृष्ण रूपानेही ही सगुण रूपाची भेट झालेली दिसते. काही वेळा नादब्रह्माचा साक्षात्कार मुरलीखाच्या रूपाने झालेला आहे. काही वेळा साधकाला प्रत्यक्ष लाल धूसर धूळ किंवा चंद्राच्या प्रकाशाचा शीतल तेज:पुंज अशा रूपाने साक्षात्कार होतो तसाही रामदासांना झालेला दिसतो आणि मग श्रीरामाचे कर्तृत्वही त्यांना पुन:पुन: स्मरते. रावणाच्या बंदीवासातून सर्व देवतांची सुटका करण्याचे महत्त्वाचे कार्य श्रीरामांनी केले. ते काम इतर कोणाही देवतेने केले नाही याचा अभिमान रामदासांना आहे.

## श्रीराम-महिमा

श्रीरामाचे कर्तृत्व अभिमानाने सांगणारी पदे ही रामदासांच्या श्रीरामाबद्दलच्या अपार श्रद्धेचे दर्शन घडवितात.

*तीनों लोकनमो कंटक, रावण उसकुं कीया खेव । तेतीस कोटी बंद छुरावे । सब देवत को देव ।*[३०]

किंवा

*कौन है रे ऐसा? कौन है रे ऐसा? नाथ सीधा रे शीला तारे । बंद खलास करे । वैकुंठ के घर ज्यज्योद्धानगर अमर दास करे ।।*[३१]

या सर्व ठिकाणी श्रीरामाबद्दलचा अभिमान स्पष्टपणे प्रकट झाला आहे.

## श्रीरामाचे सर्वव्यापकत्व

श्रीरामाचे हे सगुण रूपदर्शन रामदासांना झाले असले तरी श्रीराम हा ब्रह्मांडव्यापी - सर्वव्यापी ब्रह्म असल्याचाही अनुभव त्यांना मिळालेला आहे. याला निर्गुण साक्षात्कार असेही नाव काहीजण देतात.

सब घटमें हे रे खुदाई१४८

यांसारख्या अनेक पदांत निर्गुण ब्रह्माचा अनुभव रामदासांनी घेतला हे स्पष्टपणे दिसून येते.

## भेटीची व्याकुळता

भक्ताला सगुण साक्षात्कार झालेला असो किंवा निर्गुण ब्रह्माचे सर्वव्यापकत्व पटलेले -

अनुभवाला आलेले असो - दैहिक जागृती याला काही सुटत नाही. अखंड समाधी अवस्था अनुभविली तरी काही काही वेळा शारीरिक गुणधर्म हे जागृत होतात आणि ईश्वर साक्षात्काराच्या अवस्थेतून भक्त शारीरिक भानावर येतो. त्या वेळी आधीच भोगलेल्या दर्शन साक्षात्काराच्या आनंदाचे स्मरण होऊन भक्ताला विरह वेदना सतावते. साधनेच्या प्रथमावस्थेत ईश्वरदर्शनाची लागलेली तळमळ आणि दर्शनानंतरच्या विरहाचे दुःख यात अंतर आहे. रामदास याही अनुभवातून गेले आहेत.

उदा.– *शामसुंदरकुं आनी मिलावो । सो आनंदकी घरी ।।*[३२] *अथवा शामबीन तनमनधन जायेना ।*[३३] या सर्व पदांत हा विरहवेदना व्यक्त झाली आहे.

## सगुण-निर्गुण अभेद

येथे अशा शंका उद्भवण्याचा संभव आहे की एकदा निर्गुण ब्रह्माचे सर्वव्यापकत्व अनुभवल्यानंतर सगुणरूपाचा मोह, मग ते रूप कितीही साजिरे गोजिरे असे ना का, का व्हावा? परंतु निर्गुण ब्रह्माचा अनुभव सर्वकाळ टिकत नाही. तो जर तसा टिकला असता तर मग विरहाचा प्रश्नच उपस्थित होत नाही. तसा अनुभव पुनः पुनः लाभावा म्हणून तर सगुणाची उपासना प्रार्थना करावयाची. तुलसीदासांना किंवा सूरदासांना सुद्धा राम आणि कृष्ण यांनी सर्वव्यापकत्व मानले आणि पुनः सगुण रूपावरच भक्ती केली. मात्र सगुण निर्गुण एक आहे हे त्यांना पटले होते. रामदासांनाही ते पटले होते.

या ठिकाणी कबीराची आठवण झाल्याशिवाय राहात नाही. हिंदू आणि मुसलमान दोघांनाही कबीर असे फटके मारतो की दोघांचा एकांगी भाव हा मूर्खपणा आहे असे पटावे. रामदास तेवढ्या कडक शब्दात बोलत नाहीत, तथापि भाव तोच आहे. 'ईश्वर एक आहे, समजणाराच समजेल' यातील समजणाराच समजेल याचा अर्थ बाकीच्या मूर्खांना नाही समजणार, त्याला जातीचे पाहिजे, हाच भाव आहे. हिंदू काय मुसलमान काय, सगुण काय निर्गुण काय, योगी काय किंवा भक्त काय, तो आपले चित्त शुद्ध करून ईश्वरभक्ती करील आणि सर्वत्र समभावाने पाहील तोच खरा भक्त होय.

*मुदल गवाया बे पांडे, मुदल गवाया बे । हीसेब कातेब बाकी झाडी । सोनहीं पाया बे । साव्या छचोरी झ्युटा अमळ कीने बताया बे । अंतक बेट पांडे पछयार सादील गवाया बे । रामको च्येरा कहत हमारा राम न पाया बे ।*[३४]

किंवा

*आलेख ज्यागे झ्युटी माया भागे ।*[३५]

अशा काही पदांवर कबीराच्या भाषेची छाप पडल्याचे दिसून येते. निर्गुणसंबंधी विचारधारा, योग, भक्ती समाजाचे या संबंधातले अज्ञान, जनसाधारण ज्या मार्गाने जात आहेत, त्याचे वैयर्थ्य, कर्मकांडात भावापेक्षा बाह्याचाराला आलेले महत्त्व इत्यादी बाबतीत रामदासांची मते कबीराच्या मतांशी जुळतात.

**तुलसीदासांशी तुलना :** रामदासांच्या काही पदांवर तुलसीदासांची छाप आहे.

*ज्याको ज्यानकी नाथ प्यारो । भरत त्यजाये ज्यननी अपनी । पीता त्यजीये प्रहलाद । बंधु त्यजाये बभीखन आपनो । रामचरण के काज ।*[३६]

## उपदेश-मुख्य उद्देश

रामदासांची हिंदी कविता पुष्कळशी उपदेशपर आहे. तिच्यात काव्याकरिता काव्य रचना असा प्रकार नाही. साधारणजन अज्ञानी आहे. त्याला सावध करणे, बाह्याचाराच्या ढोंगापासून परावृत्त करून हृदयात भावजागृती करणे, रामनामाकडे त्याला प्रवृत्त करणे, विश्वाची वास्तविक स्थिती काय आहे, त्याची अशाश्वतता पटवून देणे हा त्यांचा उद्देश आहे. पण हा उपदेश देत असताना त्यांच्या हृदयातील तळमळ ज्या उत्कटपणे व्यक्त होते ती उत्कटताच त्यांच्या कवितेला भावसौंदर्य मिळवून दिले.

## विषयांतील विविधता

त्यांच्या हिंदी कविता रचनेत विविध विषय सामावले आहेत. श्रीरामाचे वर्णन, श्रीरामाचे कार्य आणि त्याचा महिमा, श्रीकृष्णदर्शन, श्रीकृष्णकार्य आणि कृष्णमहिमा, गोपांच्या मन:स्थितीचे वर्णन, रामनाममहिमा, रामाचे सर्वव्यापकत्व घराघरात त्याची व्याप्ती, रामाला पाहण्याची त्यांना लागलेली तळमळ, निराशा, उदास अवस्था, सगुण-निर्गुण भेद-अभेद, कर्मगती योग, पापी माणसाची लक्षणे, तन्मय अवस्था, उपदेश, संगीतप्रेम, मुरलीमाधुरी, ईश्वर-अल्ला-अभेद, विश्वाची अशाश्वतता, हनुमानाच्या कार्याचा गौरव शबरीच्या प्रेमाचा गौरव अशा अनेकविध विषयांवर हिंदी पदे आधारली असून ती सर्व भावप्रवण आहेत. 'काव्य या अर्थाने इतर संतकवींच्या काव्याहून कोणत्याही बाबतीत उणी नाहीत.

## रामदासांची हिंदी भाषा

रामदासांची हिंदी भाषा बरीचशी मराठीच्या प्रभावाने किंवा कबीर, सूरदास, तुलसीदास यांच्या भाषेच्या अनुकरणाने तितकीशी शुद्ध नाही. परंतु हे विधान करताना काही गोष्टी विचारात घेणे आवश्यक आहे. १. रामदासांची कविता (हिंदी अथवा मराठी) ज्या बाडातून संग्रहित झाली आहे. ती बाडे लिहिणारे लेखक हिंदी भाषेशी परिचित होतेच असे नाही. काही शिष्य तर अशिक्षित आणि समाजातील खालच्या थरांतीलही होते. त्या शिष्याने कवितेची नक्कल करीत असता स्वत:च्या चुका केल्या असण्याची शक्यता फार आहे. 'जन' हा शब्द 'ज्यन' असा लिहिणे हे अशामुळेच घडले असावे. अशा चुकांचा दोष रामदासांच्या माथी मारला जाऊ नये. एकच शब्द एकाच पदात निरनिराळ्या पद्धतीने लिहिला गेला आहे. तेव्हा हा दोष रामदासांचा असे कसे म्हणता येईल?

२. रामदासांनी सर्व भारतभर संचार करून देशाची परिस्थिती पाहून घेतली. त्यामुळे एके ठिकाणी स्थिर राहणाऱ्यांची भाषा आणि भ्रमंती करणाऱ्याची भाषा यात फरक पडतोच. तुलसीदास, कबीर, सूरदास, मीरा यांच्या भाषेची छाप रामदासांच्या कवितेवर दिसते. याचे कारण हेच होय. त्यामुळे त्यांची हिंदी भाषा एकसूत्री वाटत नाही.

३. नामांची विभक्ति रूपे, क्रियापदांची रूपे, काही शब्दांची मूळ रूपे, जशी रामदासांच्या कानावर पडली तशीच त्यांनी वापरली. भाषेचा अभ्यास मुळात व्याकरणाच्या आधारे करून त्यांनी हिंदी रचना केली नाही. त्यामुळे भाषेचे स्वरूप एक राहिलेले नाही.

४. बोली भाषेचा मोकळेपणा, हृदयग्राहित्वाचा गुण, परिणामकारकता, ओघ, हे गुण

त्यांच्या भाषेत अवश्य आढळून येतात.

५. रामदासांनी भाषेपेक्षा भावाच्या उत्कटपणाकडे व परिणामाकडे अधिक लक्ष दिले असल्याने त्यांची हिंदी भाषा ही काहीशी अशुद्ध - अपरिमार्जिता राहिली.

६. तीनशे वर्षांपूर्वीची सर्व भारतभर प्रचलित असलेली हिंदी भाषा आजच्या हिंदी भाषेहून वेगळी असणार हे उघड आहे. तेव्हा रामदासांच्या भाषेला अशुद्ध म्हणण्यापूर्वी त्यांच्या काळातील हिंदी भाषेचे (महाराष्ट्रातील व महाराष्ट्राच्या बाहेरचे) स्वरूप काय होते याचा अभ्यास केल्यानंतरच त्यासंबंधी निर्णय घेणे उचित ठरेल.

७. तथापि उत्तर भारतातील समकालीन कवींच्या भाषेपेक्षा रामदासांची हिंदी भाषा अशुद्ध अधिक आहे हे मान्यच करावे लागेल.

तथापि रामदासांची कविता त्यामुळे हीन ठरत नाही. ती भावबळाने श्रेष्ठ आहे. अनुभवाने संपन्न आहे, सगुण-निर्गुण साक्षात्कारामुळे तिला परतत्त्वाचा स्पर्श झाला आहे. ती उत्कृष्ट काव्यात सहजपणे सामावू शकेल यात शंका नाही.

## देवताविषयक अभंग व पदे

'श्री समर्थांचा गाथा' या ग्रंथात देवताविषयक पदांचे अभंगांचे वर्गीकरण करूनच ते अभंग छापलेले आहेत.

| | |
|---|---|
| १. गणपती – ४,५ | पदे १००९ ते १०१४ |
| २. श्रीराम – ६ ते २२ | पदे १०१९ ते १०२२ |
| ३. मारुती – २३ ते ३६ | पदे ११९३ ते ११२३ |
| ४. श्रीकृष्ण – ३७ ते ३८ | पदे ११२४ ते ११३२ |
| ५. विठ्ठल – ३९ ते ६० | पदे ११४६ |
| ६. शंकर – ६१ ते ६५ | पदे ११५२ ते ११५९ |
| ७. देवी – ६६ ते ६९ | पदे ११६० ते ११६६ |
| ८. खंडोबा – ७० ते ७१ | पदे ११६७ ते ११७२ |
| ९. शारदा – — | पदे १०१५ ते १०१८ |
| १०. व्यंकटेश – — | पदे ११४७ ते ११४८ |
| ११. नरसिंह – — | पदे ११४९ ते ११५० |
| १२. सूर्य – | पदे ११५१ |
| १३. भैरव – — | पदे ११७३ |

## रामदासांचा देवताविषयक दृष्टिकोन

रामदास हे निर्गुणप्रेमी, मुक्तीकडे धाव घेणारे ब्रह्ममाया विवरून सांगणारे संतकवी असले तरी सगुण भक्तीचा प्रचार त्यांनी कटाक्षाने केला आहे. एवढेच नव्हे, तर 'रामकथा ब्रह्मांडापलाड भेदून न्यावी' असे त्यांनी मोठ्या कळकळीने उपदेशिले आहे. श्रीरामाबद्दलची त्यांची भक्तिभावना इतकी कडकडीत आहे की त्यांना पंढरपुरास विठ्ठलाच्या मूर्तीतसुद्धा रामाचे दर्शन झाले. सवाया म्हणण्याची जी पद्धती आपण पाहिली म्हणजे 'रामनाम' घेत असता बसायचे नाही, उठून उभे राहायचे, कारण रामाबद्दलचा आदर उभे राहिल्यानेच व्यक्त होतो. केवळ व्यक्त करण्याचाच

हा भाग नाही, तर आतूनच तसे वाटत असले पाहिजे. परंपरेने चालत आलेली सवाया म्हणण्याची ही पद्धती समर्थांच्यापासूनच चालत आल्याने समर्थांच्या मन:स्थितीची कल्पना त्यावरून येते. श्रीरामाच्या सगुण रूपाबद्दल मूर्तीबद्दलचा हा आदर त्यांनी श्रीकृष्ण, – शंकर इ. देवतांबद्दलही दाखविला आहे. कारण या सर्व देवता सगुण अवतार धारण करणाऱ्या देवता आहेत, अशी त्यांची श्रद्धा होती. त्या त्या देवतेने आपआपल्या अवतारात जे काही कार्य केले त्याबद्दलची रामदासांच्या मनात कृतज्ञतेची भावना आहे. त्या त्या देवतेने समाजात दुष्टांचे दमन अथवा नाश केला आहे आणि सज्जनांचा प्रतिपाल केला आहे. या गोष्टीबद्दल रामदासांना अभिमान आहे. कारण रामदासांना देवतांचे (सगुण) महत्त्व याचसाठी आहे. अध्यात्माच्या दृष्टीने मोक्ष हे ध्येय आहे. पण रामाने बंदीतून देवांची मुक्तता केली म्हणून राम हे त्यांचे प्रिय दैवत. कुलपरंपरेने जे काही चालत आले असेल ते असेलच. त्याच अर्थाने त्यांनी इतर देवतांचीही स्तुती अथवा त्यांना वंदन-स्तवन केले आहे. कीर्तनाच्या वेळी त्यांनी हे देवताविषयक अभंग गायले. पदे म्हटली आणि सर्व देवतांच्या कार्याविषयी आदरयुक्त भक्ताचा भाव त्यात निर्माण केला. पण प्रधानत: श्रीरामाबद्दल त्यांची आत्मीयता अधिक आहे.

## गणपती

गणपतीबद्दलच्या त्यांच्या अभंगांत त्याचे विघ्न निवारण करण्याचे सामर्थ्य आणि विघ्न आले की निवारायचेच ही इच्छा यांचे श्रद्धापूर्वक वर्णन केले आहे. ही परंपरागत समजूत त्यांनी जोपासली आहे. पण केवळ संकटनाशक हेच रूप मानले नाही. तर गणपती हा विद्येचा विस्तारक आहे. हे त्यांना अधिक महत्त्वाचे वाटले आहे. *साधनाचे मूळ । जेणे लाभे फळ । तोचि हा केवळ । गजानन ॥*[३७] असे त्याचे महत्त्व रामदासांनी वर्णिले आहे.

## श्रीराम

श्रीरामासंबंधीचे महत्त्व रामदासांनी अधिक भक्तिभावाने वर्णिले आहे. यात आश्चर्य नाही. 'ध्यान लागले रामाचे । दु:ख हटले जन्माचें ॥' रामाचे चरण पदांबुज त्यावर रामदासांचा वृत्तिरूपी मधुकर, रामवदन हा मंचक (चंद्रमा) आणि रामदासांचे नेत्र हे चकोर पक्षी (सुखी झाले), रामाची तनु मेघ (श्याम), रामदासांचे चित्त हे चातक, रामाची कीर्ती हा सुगंधतरंग, रामदासांची वाणी (वैखरी) ही कोकिळा रामी रामदासांच्या अंतर्यामी राम प्रगटले. असे सुरेख अलंकारयुक्त आणि भक्तियुक्त वर्णन अभंग (७) मध्ये केले आहे.[३८]

## मारुती

मारुतीच्या अभंगातूनही मारुतीच्या कर्तृत्वाचे स्तवन आहे. सूर्यमंडळ गिळण्यापासूनचे वर्णन आहे. मारुती हा चिरंजीव असल्याचा उल्लेख 'रामदासी नाही जन्मा' या शब्दांनी केला आहे. मारुतीच्या उपासनेने भय दूर होते. सर्व कार्ये सिद्ध होतात, दुस्तर तापत्रय निवारले जाते हे विचार आत्मविश्वासाने सांगितले आहेत. तसेच 'नाव मारुतीचे घ्यावे । पुढे पाऊल टाकावे ।' असा उपदेशही केला आहे. तो अवघा-मुहूर्त-शकुन असल्याचा निर्वाळाही दिला आहे.

## श्रीकृष्ण

गाथेतील ३७ वा[३९] अभंग श्रीकृष्ण चरित्र सांगणारा आहे. कंसवधानंतर 'सुखे राज्यवरी यादवेसी' येथपर्यंत सर्व हकीगत यात आली आहे. यादवांना शाप होता त्यामुळे सर्व यादव 'आटले' ते काळी उद्धव उपदेशिला' आणि शेवटी 'उपदेसिला दास श्रीकृष्णें आपुला । अवतार जाला पूर्ण आता' असा शेवट आहे. आणि ३८ व्या[४०] अभंगात श्रीकृष्णाच्या जन्माचे वर्णन आणि लागलीच रिटासुर, शकटासुर इ. राक्षसांच्या वधाचे वर्णन आहे. पण यापुढे कृष्णाचे कर्तृत्व वर्णिले आहे.

## विठ्ठल

विठ्ठलाच्या अभंगात रामदासांची रामकृष्ण एकत्वाची भावना अधिक स्पष्टपणे प्रकट झाली आहे. 'राम जाला पंढरीराणा (४८)[४१]' 'रामदास म्हणे धरा भक्तिभाव । कृपाळुराध्य पांडुरंग ।'[४२], 'रामी रामदासी पाहिले । विठ्ठल आत्मयां देखिले ॥४६॥[४३]', 'राम तो विठ्ठल जाला । रामदासासी भेटला ॥४७॥[४४] अशा अनेक अभंगांतून रामदासांनी राम आणि विठ्ठल यांचे द्वैत मोडले आहे. पंढरपुरी गेल्यावेळी रामदासांना विठ्ठलाचे रूप हे रामरूपच आहे वाटले आणि 'येथे उभा का श्रीरामा' हे पद त्यांनी म्हटले हे प्रसिद्धच आहे. पांडुरंग हा जन्ममृत्युपाश तोडणारा आहे असे रामदासांनी म्हटले आहे.

देवताविषयक सर्व अभंगांत व पदांत रामदासांनी त्या त्या देवतेविषयी भक्तिभाव उत्कटपणे व्यक्त केला आहे. देवतांचे वेगळेपण मानूनही त्यांनी सर्वांचे एकत्व आग्रहाने प्रतिपादले आहे. रामदासांना व्यापक दृष्टीचा, उदारमतवादी, उदात्त भावांचा कवी म्हटले पाहिजे. वैष्णव-स्मार्त, राम-कृष्ण-विठ्ठल-शंकर-विष्णू इ. देवतांच्या आराधनेमुळे जी विभिन्नता समाजात वाढली होती, ती घालवून देऊन सर्व समाजातील लोकांचा समबुद्धी – समभाव जागृत करणे आणि तेही त्यांना पटवून देऊन हे रामदासांचे महत्त्वाचे कार्य आहे. अभंगांतून आणि पदांतून त्यांनी हे कार्य केले आहे. यात काव्यशक्तीपेक्षा भावांचे ऐक्य, आणि समाजातील भिन्न भिन्न स्तरांतील लोकांची एकता हे कार्य त्यांना करावयाचे होते. कीर्तन या संस्थेचा उपयोग त्यांनी या कार्यासाठी करून घेतला.

## विरहार्त पदे

देवदेवतांच्यासंबंधी भक्तिभाव दर्शविणाऱ्या पदांत त्या त्या देवतेचे महत्त्व किंवा मोठेपण गाइले आहेच. त्या त्या देवतांचे ऐक्य किंवा एकरूपता ही पदांतून व्यक्त कली आहे. पण याहीवेगळा विरहभाव दाखविणारी पदे अधिक भावपूर्ण आहेत. हा विरह अर्थातच दर्शन न झाल्यामुळे आहे. हा भक्तांचा विरह आहे.

## व्यक्तिचित्रे

पदांतून व्यक्तिचित्रेही बहारदार रंगविलेली आहेत. मंदोदरी रावणाला विनवीत असल्याचे पद मंदोदरीचा स्वभाव व्यक्त करणारे आहे. यात मंदोदरीने काळाची पावले बरोबर ओळखली आहते. पण रावणाला ते कळले नाही. मंदोदरी घाबरलेली आहे. ती स्वप्नात काळसर्प पाहते.

सर्वनाश पाहते. सीता एकदाची देऊन टाका आणि रामाला आपलेसे करा असा योग्य सल्ला मंदोदरी रावणाला देते. पण त्याचा काही उपयोग होत नाही. हे एक उत्कृष्ट भावचित्र आहे - स्वभावचित्रही आहे. अहिरावण-महिरावण वधाच्या वेळी मंचक-भंग झाला हे पाहून रामाला आनंद झाला. पण 'साध्वीहृदय तेव्हाचि गडबडे' असे वर्णन करून तिच्या शब्दात तिचा संताप आणि निराशा रामदासांनी वर्णिली आहे.

*आता येथे तुजविण कैसा राहिला माझा प्राण । नाही राम ना रावण । राहू मी कोठे । त्रिजटा बोले जानकीसी । वत्से जासी अयोध्येसी । आता माझी गती कैसी । होईल गे सीते ।*[४५]

अंजनीचेही भाव एका पदात व्यक्त केले आहेत. लंकेहून अयोध्येस येताना हनुमंताने अंजनी माता दाखविली. चौघांनी नमस्कार केला. रामचंद्र म्हणाले की, माते, तुझ्या मुलाने थोर उपकार केला. सीतेचा शोध त्याने केला, लंका जाळली, लक्ष्मणाला शक्ती लागली तेव्हा द्रोणाचल आणून त्याला वाचविले, अहिरावण-महिरावण आमचा घात इच्छित होते तेव्हा भवानीरूपाने त्यानेच आम्हाला वाचविले. माझे सारे रामायण याच्यामुळे घडले. आपल्या मुलाची ही स्तुती ऐकून अंजनी म्हणाली, 'हा कशाला माझ्या उदरी आला? गर्भातूनच का नाही गळून गेला? स्वत: असतानी रामाला का कष्टविला. माझ्या दुधाचे सामर्थ्य काय कमी आहे. कळीकाळाची नरडी मुरडण्याचे सामर्थ्य एका माझ्या दुधात असताना रावणासारख्या घुंघट्र्याची काय कथा? एका क्षणात रावणाचा वध करून जर सीतेला ताबडतोब सोडवून आणले असते तर 'माझ्या पुत्रा, उल्हास होता' असे म्हणून तिने आपली दुग्धधारा सोडली. ती धार 'शिळा उदरी खोचुनि गेली । त्रिखंडे तेव्हां ।' त्या वेळी सीतेने तिला सांगितले की, 'उगीच त्याच्यावर रागावू नको, कारण रामांनीच त्याला तशी आज्ञा केली नव्हती.[४६] अंजनाचे हे स्वभावचित्र आकर्षक नाही असे कोण म्हणेल?

## अभंग आणि पदे यातील काव्य

अभंग आणि पदे यातील काव्य सहृदयाला चटका लावील असे आहे. केवळ देवतांचे मोठेपणच त्यात व्यक्त झाले आहे असे नाही, तर त्यांचे ब्रह्माशी एकरूपत्व दाखवून दिले आहे आणि शिवाय सगुणरूपातील त्यांच्या जीवनातील काव्यात्मक प्रसंग, स्वभावपरिपोष, प्रेम, विरह, शौर्य इत्यादी भावांचे रसपूर्ण वर्णन या अभंगांतून आणि पदांतून दिसून येते. शब्दालंकारांचा उपयोग तर पदोपदी प्रत्ययाला येतोच. पण अर्थालंकारांचाही उपयोग विपुल नसला तरी लक्षात येण्यासारखा आहे. याहीपेक्षा वर्णनकौशल्य, शब्दयोजना, भाषाशैलीचा प्रभाव, शब्दचित्रात्मकता इ. अनेक दृष्टींनी हे देवताविषयक अभंग व पदे काव्यात्मक झाली आहेत यामुळे पुन: एकदा रामदासांचे कवित्व सिद्ध होते.



# ६. रामदासांचे अभंग आणि ओवी वाङ्‌मय

'अभंग' हा वस्तुत: एक छंदप्रकार. याचे चार चरण असतात. हे अक्षरवृत्त आहे. याचे चार प्रकार आहेत. प्रा. वा. ल. कुलकर्णी यांचे 'अभंगा'बद्दलचे विचार लक्षणीय आहेत. ते म्हणतात, 'अभंग हा केवळ एक छंदप्रकार नसून तो काव्यप्रकारच आहे. ज्ञानेश्वर-निवृत्तिनाथापासून तुकोबा-बहिणाबाईपर्यंत मराठी कवींनी आणि संतांनी त्याला ही योग्यता प्राप्त करून दिली आहे.[१]

रामदासांचे अभंग बरेचसे विखुरलेले आहेत. समर्थांचे ग्रंथभांडार संकलित करून संपादिलेले जे ग्रंथ आहेत त्यात थोड्या फार फरकाने हे अभंगवाङ्‌मय संकलित केले आहे.

(१) श्री रामदासांची कविता प्रथम खंड (देवांनी संपादन केलेली). यात चौदा ओव्या शतके दिलेली आहेत. हे वस्तुत: अभंगच आहेत आणि अनंतदास रामदासी यांनी संपादिलेल्या 'समर्थांची गाथा' या ग्रंथात ओव्या शतके क्रमश: ६१०, ६११, ६७४, ८५२, ५१०, ७८७, ८२७, ४२१, ७६६, ७६५, ३९८, १९५, १७ आणि ३७ या क्रमाने छापलेली आहेत. याशिवाय 'स्फुट ओव्या' म्हणून याच ग्रंथात दिलेल्या आहेत. हेही अभंगच आहेत. हे एकूण ३२८ आहेत. या ओव्याही अभंग म्हणून गाथेत छापलेल्या आहेत. (२) श्री ल. रा. पांगारकर यांनी संपादिलेल्या 'श्रीसमर्थ ग्रंथ भांडार' या ग्रंथात 'अभंगाची पंचके, अष्टके, दशके' या शीर्षकाखाली अडतीस अभंग पंचके व स्फुट अभंग म्हणून बावीस अभंग छापले आहेत. ही पंचके देवांच्या ग्रंथात नाहीत. याशिवाय 'स्फुट ओव्या ऊर्फ अभंग' म्हणून १२७ अभंग व पंचीकरणाचे अभंग असे दोन्ही मिळून ३८८ अभंग दिले आहेत. (३) चित्रशाळेने प्रसिद्ध केलेल्या व श्री कुकडे यांनी संपादिलेल्या 'श्री रामदासांचे समग्र ग्रंथ' या ग्रंथात स्फुट अभंग म्हणून ३८ अभंग पंचके, स्फुट अभंग २२ आणि पंचीकरणाचे अभंग २१६ असे छापले आहेत. (४) श्री अच्युत चिंतामण भट यांनी संपादिलेल्या 'श्रीसमर्थ रामदासांचे समग्र ग्रंथ' या ग्रंथात चित्रशाळेच्या ग्रंथाप्रमाणेच ३८ अभंगपंचके, स्फुट अभंग २२ व पंचीकरणाचे अभंग २१५ आहेत. (५) श्री गंगाधर गोविंद गोंधळेकर यांनी संपादिलेल्या 'श्री समर्थ रामदासांचा समग्र ग्रंथ' या ग्रंथातही चित्रशाळेने प्रकाशित केलेल्या अभंगाप्रमाणेच सर्व अभंग छापलेले आहेत. (६) श्री अनंतदास रामदासी यांनी 'श्री समर्थांचा गाथा' प्रकाशित केला आहे. परंतु या ग्रंथात श्रीसमर्थाव्यतिरिक्त श्री कल्याणकृत पदेही छापलेली आहेत.

यापैकी ९२ ते १३४ या आरत्या आहेत. म्हणजे देवताविषयक अभंगांपैकी ४२ आरत्या लळीत, विडा इ. कविता आहेत. म्हणजे अभंग ९२ च आहेत. म्हणजे गाथ्यात एकूण ८५२ अभंग आहेत. बाकीच्या इतर कविता आहेत. अर्थात इतर ग्रंथांतून प्रसिद्ध झालेल्या अभंगांपेक्षा या गाथ्यात अभंग जास्त आहेत, असे दिसते. (७) श्री का. अ. जोशी यांनी श्री रामदासस्वामींचे अभंग म्हणून साधारणत: पाचशे अभंगांचे पुस्तक प्रसिद्ध केले आहे. त्यात देवताविषयक अभंग, अभंग पंचके व इतर स्फुट अभंग तसेच संकलन आहे. (८) श्री समर्थ सेवा मंडळाने हा 'संक्षिप्त रामदासी गाथा' म्हणून प्रकाशित केला आहे. त्यांतही पदे, अभंग, इ. मिळून

६०० कविता छापलेली आहे. यातील अभंगही अन्यत्र प्रकाशित झालेले आहेत. (९) विनोबा भावे यांनी 'रामदासी भजने' म्हणून एक पुस्तक संपादिले आहे. 'बोधबिंदू' म्हणून अभंगातील निवडक चरण एकत्र केले आहेत व काही अभंग पूर्णपणे छापलेले आहेत. पण यातही पदांचा समावेश असल्याने केवळ अभंगाचीच गाथा असे याला म्हणता येणार नाही.

यामुळे अभंगांची संख्या निश्चित करणे कठीण झाले आहे. याशिवाय अप्रकाशित अभंग विपुल आहेत. रामदास आणि रामदासी या मासिकात वेळोवेळी काही अभंग छापलेले आहेत. पण ते ग्रंथनिविष्ट नसल्याने प्रकाशित अभंगांत त्यांचा समावेश करणे कठीण आहे.

## आत्मचरित्रपर अभंग

रामदासांच्या काही अभंगांतून आत्मचरित्रपर उल्लेख आलेले आहेत. सांप्रदायिक गुरुपरंपरा त्यांनी एका अभंगात सांगितली आहे. आदिनारायण– महाविष्णू– हंस– ब्रह्मदेव– वशिष्ट– श्रीरामचंद्र– रामदास ही परंपरा अभंग श्लोक २७०[२] यात सांगितली आहे.

लोखंडाचे सोने परिसामुळे होते. साधूचेनि संगे बद्ध हा सिद्ध होतो, वाल्याचा वाल्मिकी झाला. तसाच 'दास पुण्यश्लोक रामनामे' असा स्वाभिमानाचा उद्गार समर्थांनी अभंग क्रमांक ३१३[३] मध्ये काढला आहे. अभंग क्रमांक ३११ मध्ये 'देव आम्हांसी जोडला । संतसंगे सांपडला ।' असे म्हणून स्वतःला देव सापडल्याचे स्पष्ट शब्दांत कथन केले आहे. हेही त्यांचे आत्मचरित्रपर कथनच आहे. याशिवाय 'निंदका'चे अभंग आहेत व नंतरचे स्वानुभवाचे 'अलभ्याचा लाभ झाला', 'धन्य माझे भाग्य जाले सफलित', 'आता किती बोलो धालो तृप्त जालो', 'योगियांचा देव मज सापडला' अशा अनेक अभंगांतून आत्मसाक्षात्काराचे व तृप्तीचे उद्गारही व्यक्त झाले आहेत. ते आत्मचरित्रपर मानावे लागतील.

*दास डोंगरी राहातो । यात्रा देवाची पाहातो । देव भक्तासवें जातो । ध्यानरूपे ।।*[४]

आपले मन कशात कशात रंगून जाते याचे वर्णन रामदास एका अभंगात करतात.

रामदास आपल्या मनाची ठेवण कशी आहे, हे उघड करून सांगतात. एका अभंगात रामेविण सदा दैन्यवाणे जिणे असल्याचा उल्लेख[५] रामदासांनी स्वतःविषयी केला आहे. साधना करता करता अचानक सफलता मिळाल्याचा उल्लेखही वास्तव आहे आणि ही अस्सल अनुभूती आहे, याची खात्री पटते. अशासारख्या अनेक अभंगांत रामदासांच्या जीवनावर, त्यांच्या साधनेवर, त्यांच्या वृत्तीवर, आणि सिद्धीवर प्रकाश पडतो.

अनेक अभंगांतून रामदासांनी आपल्याला स्वरूप साक्षात्कार झाल्याचा सगुणाचा साक्षात्कार झाल्याचा उल्लेख केला आहे.

(१) *रामी रामदास स्वामी । प्रगटले अंतर्यामी ।।*[६] (२) *जणु सांपडली चणियाची मुठी । वाटे धरावी तुझी हनुवटी । राम आलिंगोनी सप्रेमे बोले । तुम्ही मजलागी हे कष्ट केले । सुखी करोनि सर्व गौरविले । रामदासी हनुमंत ठेले ।।*[७]

नामदेव, तुकाराम यांच्याप्रमाणे रामदासांच्या वाङ्मयात साक्षात्काराचे उल्लेख विपुल नाहीत अशी तक्रार करणाऱ्यांनी रामदासांचे समग्र वाङ्मय वाचून पहावे. त्यांना पदोपदी साक्षात्काराचे उल्लेख सापडतील. साक्षात्कार सांगू नये असे समर्थांनीच म्हटले आहे. परंतु 'अंतरीचे धावे स्वभावे बाहेरी' अशा स्थितीत असले उल्लेख अटळ आहेत.

रामदासांची हुरहुर सर्व श्रीरामाच्या भेटीसाठी होती. ती तळमळ व्यक्त करणारे अभंग

अतिशय उत्कट आहेत. स्वत:ची मन:स्थिती अगदी मोकळेपणाने त्यांनी वर्णिली आहे. काही वेळा तर त्यात करुणरसाचा पूर वाहिलेला प्रत्ययाला येतो. रामाच्या भेटीसाठी त्यांनी केलेला दृढ निश्चय काही वेळा व्यक्त होतो तर काही वेळा तो निश्चयही डळमळल्याचे व ते आर्ततेने धावा करीत असल्याचे दिसून येते. काही वेळा सर्व सोडून एकांत स्थळी जावे, निवांत असावे अशी तळमळ ते व्यक्त करतात. पण हा निश्चयही डळमळीत झाला. कारण काही असो. कदाचित ही मन:स्थिती फार काळ राहिलीही नसेल. पण अशी एक अवस्था आली होती असे दिसून येते.

*वासनेची बेडी देहबुद्धि वांवडी । वाजे हुडहुडी ममतेची । वैराग्याचा वन्ही विझोनिया गेला। संचित खायाला पुण्य नाही । भक्ति पांघरुण ते माझे सांडले । मज ओसंडले संतबनी ।।*[८]

वासनेच्या या त्रासातून रामदासांना सुद्धा जावे लागले असे दिसते. वैराग्याचाही केव्हा केव्हा वीट यावा हे स्वाभाविक आहे. हाही अनुभव त्यांनी घेतला होता. हे आदिनारायणा । मला निर्गुण दाखवा अशी आर्त हाक रामदासांनी मारली. ते निर्गुण मला दिसत नाही काय करू? असे अगतिकतेचे उद्गार रामदासांनी काढले आहेत.

रामदास या चिंतेतून मुक्तही झाले आहेत. त्यांच्या मनातली चिंतेची जागा आत्मविश्वासाने घेतली आहे. जेथे जिवलगही बरोबर येत नाहीत तेथे राम हाच जिवलग होतो आणि बरोबर येतो असा रामदासांचा विश्वास आहे.

*सोयरे जिवलग मुरडती जेथूनी । राम तये स्थानी जिवलग । जीवातील जीव स्वजन राघव । माझा अंतर्भाव सर्व जाणे ।*[९]

असा साक्षात्कार– नव्हे एकरूपता– छे, प्रत्यक्ष रामच होऊन गेल्यानंतर कसले देखणे आले आहे? आणि हे राम होणे– हाच आत्मविश्वास समर्थांना आहे. ते 'सर्वकाळ भेटी । कदा नाही तुटी । रामदासी लुटी स्वरूपाची ।' याही शब्दांनी हा भाव व्यक्त करतात.

समर्थांच्या अभंगात रसवत्तेला काही कमतरता नाही. आत्मविश्वासाचा भाव, शोक, करुणा, पश्चात्ताप, दृढ भक्ती, निर्धार, वैराग्य, त्रास, संताप असे कितीतरी भाव अभंगातून व्यक्त झाले आहेत. उपदेश करताना ही जी कळकळ, तळमळ व्यक्त होते ती सुद्धा रसोत्कटतेच्या निर्मितीला कारणीभूत होते. द्विधा अवस्थेच्या वर्णनात सासर-माहेरच्या उपमा बोलक्या आहेत. प्रवृत्ती हे सासर आणि निवृत्ती माहेर. रामदासांच्या मनाची येथेच कल्पना येते. निवृत्तीला माहेर म्हणणे म्हणजे निवृत्ती ही अधिक प्रिय आहे, असा अर्थ सहजच निघतो आणि मनाची स्थिती अशी की सासर सुटत नाही, माहेर तुटत नाही. लौकिक कार्य हे मागे लागलेच आहे. त्यामुळे विवेक हा दूर जाऊ लागला आहे. विवेक दूर जात असल्याबद्दल रामदासांना दु:ख होणे स्वाभाविकच आहे. विवेकाशिवाय ज्याचे पाऊल पुढे पडत नाही त्याला विवेक दूर जात असताना किती दु:ख होत असेल याची कल्पनाच करावी. माझे हित माझ्या डोळ्यासमोर दूर जात आहे, आणि 'यत्न करू जाता' हा काही उपयोग नाही अशी अगतिक अवस्था झाली आहे. सासर आणि माहेर या दोन शब्दांत ब्रह्मांड साठविले असल्याचा जो अनुभव नववधूला होत असतो तोच अनुभव रामदासांनी येथे बोलका केला आहे. 'मी-तूपण जात नाही. भक्ताची आवडी निरंतर असत नाही. अंत:करण भावशून्य, कोरडे असते' हाच तो अपराध होय. म्हणून 'वेगा माझ्या मना पालटावे' ही मागणी असते. 'वेगा माझ्या मना पालटावे' अशी प्रार्थना

रामदासांनी सातत्याने केली आहे.[१०] दुसऱ्या ठिकाणी ते म्हणतात, 'रामदास म्हणे माझे । सर्व आतुर बोलणे,' ही आतुरताच त्यांच्या मन:स्थितीची कल्पना देते. 'मज वेगे न्यावे परब्रह्मा', 'मज या वैभवे चाड नाही', 'प्रथम मला का लाविली सवे । मग उपेक्षणे योग्य हे नव्हे', 'सगुण रूपे सांभाळा रे रामा' असे मोठ्या करुणेचे उद्गार रामदासांनी काढले आहेत. हा कारुण्याचा पूरच त्यांच्या काव्यात ठिकठिकाणी आढळतो.

भक्तिपंचकात रामदासांनी सामान्य जनाची प्रवृत्ती वर्णिली आहे. पोटासाठी काय केले जाते आणि काय नाही याची कल्पनाच केलेली बरी. 'ज्याची खावी पोळी त्याची वाजवावी टाळी' या न्यायाने रामदासांनीही म्हटले आहे की, 'आम्ही खाऊ ज्याची रोटी । त्याची कीर्ती करू मोठी ।[११], अन्नाची प्रतिष्ठा लोकांनी फार मानलेली आहे. 'पोटभरी मिळे अन्न । आम्हां तेचि ब्रह्मज्ञान ।[१२] लोकांच्या अशा प्रवृत्तीचे वर्णन करून रामदास असा विचार मांडतात की, 'अन्न देणारा श्रीहरी आहे, तोच प्रतिपाळ करतो, त्याच्याच आज्ञेने मेघ वर्षतात, आणि असे असूनही माणसे त्यालाच विसरतात हे आश्चर्य नव्हे काय? त्यासी चुकली बापुडी अन्न अन्न करता मेली' या भक्तिपर अभंगांच्यापैकी बहुतेक अभंगांचे हेच पालुपद आहे. आणि या पंचकाचा शेवट रामदास उपदेशाने करतात.

*शिंक जांभई खोकला । तितका काळ व्यर्थ गेला । म्हणे रामा रामदास । होतो आयुष्याचा नाश ।।*[१३] म्हणून सतत ईश्वराचे अनुसंधान असावे हाच तो उपदेश होय.

कलियुग पंचकात लोकस्थितीचे वर्णन आहे. कलिराजा आला आणि धर्म अवघाचि बुडाला, नीती, मर्यादा बुडाली, विप्रांनी आपला आचार सांडला, लोक दोष आचरिती, नाही पापाचा कंटाळा, लोक मिणधेची चालती, त्यांसी होताती विपत्ती. अशी स्थिती झाली आहे आणि हे भगवंताच्या मनात आले तेथे कोणाचे काय चालणार?

मृत्यू कोणालाच चुकला नाही, जन्मवरी शीण केला, अंतकाळी व्यर्थ गेला, असे सांगून रामदास अंतकाळचे वर्णन एका अभंगात करतात.

*बहुसाल होते बळ । पुढे जाहले निर्बळ । देह होते जे निर्मळ । तेंचि जाले अमंगळ ।। सर्व तारुण्ये चांगला । प्राणी दानरूप जाला । रामा रामदास म्हणे ।आता सावधान होणे ।।*[१४]

जगात शाश्वत-चिरंजीव असे काही नाही आणि तरीसुद्धा आपण सर्व या अशाश्वताच्या मागे लागलो आणि शाश्वताला विसरतो. हे शहाणपणाचे लक्षण नाही, असे रामदास वारंवार कंठरवाने सांगतात.

चातुर्वर्ण्याचा पुरस्कार करणारे रामदास, गुरू हा ब्राह्मणच असला पाहिजे असा आग्रह धरणारे रामदास संकुचित वृत्तीचे आहेत असा गैरसमज होण्याचा संभव आहे. परंतु रामदासांची दृष्टी नेहमीच उच्च, उदात्त आणि विशाल असते. ते सर्व समाजाच्या दृष्टीने विचार करतात आणि शेवटी ब्रह्मप्राप्तीच्या दृष्टीने ते उपदेश देतात. या दृष्टीने विचार केला तर त्यांचे विचार काही वेळा क्रांतिकारक असल्याची खात्री पटेल. सोवळेओवळे याबद्दलचे त्यांचे विचार क्रांतिकारक आहेत.

सोवळेओवळे, स्नान, संध्या इ. सर्व गोष्टी बाह्य आहेत. अंतरीचा भाव महत्त्वाचा आणि यापुढे रामदासांनी काही वेळा जरी वर्णाश्रम धर्मासंबंधी किंवा ब्राह्मणांसंबंधी जरी समतेच्या विरुद्ध असलेले विचार मांडलेले आहेत असे वाटत असले तरी तेही व्यापक दृष्टीने परब्रह्माच्या प्राप्तीसाठी ज्या नियमांचे पालन करणे आवश्यक आहे त्यासाठीच आहेत हे समजून घेतले

पाहिजे.

वैराग्य पंचकातील अभंगात रामदासांच्या विचारांचे सार आहे असे म्हटले तरी चालेल. जीवनाची सांज ओसरता उगीच आकांत करण्यात काय अर्थ? सर्व सखी जिवलगे एकामागे एक निघून जातात. चार दिवस यात्रा भरते आणि सवेंचि मागुती वोसरे । अशीच जगाची चाल आहे. सर्वांनाच शेवटी जायचे आहे, मग कोणी कोणास रडावे? पिता, पुत्र, दारा, जिवलग, मित्र सर्वच मृत्युपंथे जावयाचे आहेत. म्हणून साधन करावे.[१५]

जगदोद्धार हे रामदासांचे जीवितकार्य. 'हेळामात्रे मुक्त करीन या जना' अशी प्रतिज्ञा रामदासांनी केली आहे आणि ती पार पाडिली आहे. यासाठीच तर त्यांचा संचार होता आणि ठिकठिकाणी मठस्थापना करून शिष्यांना उपदेश देत ते फिरले आहेत. स्वत: देही असून विदेही असल्याचे त्यांनी स्पष्ट म्हटले आहे.

*सांजे ओसरता सांत । वांया करावा आकांत । तैसी सखी जिवलगें । जाती एकमेकांमागें ।।*

हा विचार मांडल्यानंतर दृष्टान्ताने तो स्पष्ट केला आहे.

(१) *चारि दिवस यावा भरे । सवेंचि मागुति ओसरे ।* (२) *पूर्ण होता महोत्सव । फुटे अवघा समुदाय ।* (३) *बहु वऱ्हाडी मिळाले । जैसे आले तैसे गेले ।*

असे तीन दृष्टान्त देऊन–

*एक जाता येक येती । नाना कौतुक पाहती ।*[१६] हा विचार स्पष्ट केला आहे.

(४) मातेचे मन बालकापाशी असते, तसे दयाळू देवाचे मनही भक्तांचा सांभाळ करण्यासाठी उत्सुक असते आणि हा भाव दृष्टान्त देऊन व्यक्त केला आहे.

(५) *धेनु वत्साचेनि लागे । धांवे त्याचे मागें मागें ।* (६) *पक्षी वेंघतसे गगन । पिलांपाशी त्याचे मन ।* (७) *मत्स्य आठवितां माळी । कूर्म दृष्टीने सांभाळी ।*[१७] (८) *माजी बांधावा भोंपळा । तैशा बांधो नये शिळा । सारासार निवडावे । तैसे जाणोनियां घ्यावें । रत्न खडे देह खडे । सगट देतां प्राणी रडे । एका ठायी सोने लाख । लाख देता मारी हाक । मनुष्य गोड घास घेते । कडु अवघे सांडितें ।*

ज्याप्रमाणे बुद्धी त्याचप्रमाणे सिद्धी हा विचार सांगण्यासाठी एक परिचित दृष्टान्त दिलेला आहे.

(८) *गगना लावू जाता पंक । लिंपे आपुला हस्तक ।* (९) *ऊर्ध्व थुंकता अंबरी । फिरोनि पडे तोंडावरी ।* (१०) *हृदयस्थासी देतां शिवी । ते परतोनी झोंबे जिवीं ।* (११) *प्रतिबिंबासी जे जे करी । ते आधीच तोंडावरी ।* हे सारे दृष्टान्त समर्पक आहेत.

ब्रह्म साधण्यासाठी कर्ममार्गाने जावे तर कर्मानेच कासावीस करून टाकावे, असे आपण अगदी उलट मार्गाने जातो.

*पोट भरावया मांडिले उपास । जाला कासावीस लाभेवीण ।*

रूपक, दृष्टांत, विरोधाभास या सर्व अलंकारांचा उपयोग आध्यात्मिक विचार व्यक्त करण्यासाठीच आहे. अलंकारासाठी अलंकार असे नाही.

## भूपाळ्या

भूपाळी हा पद्य प्रकार सर्वांच्यां परिचयाचा आहे. याचा शब्दार्थ असा आहे : (१) भूप रागात पहाटे म्हटलेले पद (२) बंदिजनांनी गाईलेली स्तुती (३) पहाटे म्हणावयाची ईशस्तवनपर पद्ये (भूप + आळविणे)[१८] देवतांची स्तुती हा प्रमुख भाग प्रथमत: भूपाळीचे व्यवच्छेदक लक्षण

असावी, पण पुढे स्तुतीबरोबर देवतेला योगनिद्रेतून जागे करण्यासाठी केलेली प्रार्थना त्यात समाविष्ट झालेली दिसते आणि त्यानंतरही जनतेला जागे करण्यासाठी गाईलेले पद्य पण ते देवतेची भक्ती करण्यासाठीच. पुढे नरदेहावर ही भूपाळी गाइलेली आढळून येते. रामदासांची एक भूपाळी नद्यांवरही आधारलेली आहे. अशी विविधता दिसत असली तरी भक्ति-भावना त्यात प्रधान दिसून येते. भूपाळीचा गाभा भक्तीचा आहे. भूप रागात ही पदे गाइली जात होती का नाही कोण जाणे? पण आता मात्र भूपाळीची एक ठराविक चालच रूढ आहे.

## आध्यात्मिक रूपके

काही भूपाळ्यांत आध्यात्मिक रूपके साधली आहेत (१) नरदेहाच्या भूपाळीत भवतूम उलूक पळाले, ते देह बुद्धीरूपी ढोलीत दडाले. आढ्यावरी जाऊन बैसले. कुबुद्धी रूपी वटवाघूळाला भ्रांती म्हणे पळापळा चला जाऊ आपल्या स्थळा घालू पाळा अविवेका । मग निर्मळता जागी झाली, अमंगलता पळाली, मुक्तपणाचा आनंद रुंजी करिताती षट्पद, अशा रूपकांनी नरदेह पावन करा, असा उपदेश केलेला आहे. (२) श्रीकृष्णाच्या भूपाळीत गाईचे रूपक इंद्रियासाठी वापरले आहे. अकराही गाई ओढाळ आहेत. तेव्हा हे श्रीकृष्णा ऊठ आणि या गाईचा सांभाळ कर. त्या तुजविणे आवरणार नाहीत. या अकरापैकी अकरावी गाय अधिकच खडाण आहे (खोडकर, ती मला आटोपत नाही. कारण ती एके ठिकाणी स्थिर राहतच नाही. अर्थात दहा इंद्रियांना (पंच ज्ञानेंद्रिये आणि पंच कर्मेंद्रिये) असे तरी ताब्यात ठेवता येईल. पण अकारावे जे मन ते फारच ओढाळ आहे. एकदा का ते श्रीकृष्णरत झाले की स्थिर होईल आणि तेही कृष्णानेच आकर्षून घेतले पाहिजे, असे हे सुंदर रूपक या भूपाळीत उपयोजिले आहे.[१९] (३) श्रीरामाच्या एका भूपाळीत असेच रूपक दाखविले आहे. 'भवसिंधूचे तारू । नामे दोषांचा संहारू । नाम संसार दुस्तरु । पैलपारुपकाववी ।। (४) कनक ताटी आरत्या घेऊन दया, क्षमा, शांती उभ्या आहेत, जीव-शिव हे भरत आणि शत्रुघ्न आहेत. उन्मन मन हा लक्ष्मण आहे. विवेक हाच वशिष्ठ सद्गुरू होय, असे हे रूपक भूपाळी क्रमांक ७८[२०] मध्ये कल्पिले आहे.

श्रीरामाच्या एका भूपाळीत श्रीरामाचे सुंदर वर्णन केलेले आहे. 'राम सर्वांगे सावळा असून सोन्याचे पिवळे अलंकार त्याने धारण केलेले आहेत. त्याचा मुकुट पिवळा (सोनेरी) आहे, ललाटावर पिवळे केशर चर्चिले आहे. कुंडले पिवळी आहेत. कंठातील माळाही पिवळ्या आहेत. पीतांबर, पिवळ्या घंटाचा गजर, पिवळ्या ब्रीदाचा तोडर, पिवळा मंडप विस्तीर्ण, मध्ये पिवळे सिंहासन– असे सर्व सुवर्णमय वर्णन आहे. बहुधा रामदासांना या स्वरूपात साक्षात्कार झाला असावा. दुसऱ्या एका श्रीरामाच्या भूपाळीत रामाच्या कर्तृत्वाचे उल्लेख आहेत. ताटक वध, अहिल्या-उद्धार, गणिकेची मुक्तता, पाषाण-तारण, दैत्यसंहार, बंद-विमोचन. हे सारे उल्लेख वर्णनपर नसले तरी यांचे उल्लेख सुद्धा पूर्ण वर्णन मनासमोर उभे करतात. सृष्टीचे वर्णनही दत्तात्रेयाच्या भूपाळीत उत्तम रीतीने केले गेले आहे. मंद वायू सुटला आहे. पक्षी किलबिल करीत आहेत, सूर्य उगवू पाहत आहे, दीपवर्ण शुभ्र झाला आहे. पूर्व दिशा उजळली आहे. अशा वेळी कृष्णेचे स्नान करून भक्त देवापुढे आले आहेत.[२१] हे वर्णन सुरेख असून बहुधा श्रीनृसिंहवाडी येथील प्रभातकाळाचे व नदीकाठचे असावे. 'कृष्णेचे स्नान' या उल्लेखावरून असे वाटते.

या सर्व भूपाळ्यांतून रामदासांची भक्तिभावना किती प्रखर होती, याचा सबळ पुरावा

मिळतो. सगुण आणि निर्गुण भक्ती आणि शेवटी ज्ञानगंगेच्या पुरात रामदासांचे अस्तित्वच संपुष्टात येऊन ते ब्रह्मरूपी विलीन होईपर्यंतच्या भक्तीच्या अवस्था येऊन गेल्या आहेत.

संकीर्ण– नद्यांच्या भूपाळीत सर्व नद्यांची नावे आली असून रामदास तीर्थयात्रेच्या ठिकाणांचा पत्ता लागणे शक्य आहे.

देवभक्तांच्या भूपाळीत देवभक्त-नामावली आहे.

भावोत्कटता– सर्व भूपाळ्यांत (नद्यांची व देवभक्तांची सोडून) रामदासांची प्रखर भक्तिभावना प्रकट होते. सर्व देवतांबद्दलचा आदर आणि त्यांच्याबद्दलची भक्ती यांचे दर्शन या भूपाळ्यांत होते. काही अलंकारांचाही उपयोग केला गेल्याने या भूपाळ्या काव्यात्मक आहेत, असे दिसून येते. भूपाळ्यांतील काव्य हे वाचून तितकेसे प्रतीतीला येत नाही. पण भूपाळ्या चालीवर म्हणू लागताना त्यांतील भावसौंदर्य आपोआपच उकलू लागते. दोन-तीन भूपाळ्या महाराष्ट्रांत सर्वांच्या तोंडी आहेत. इतका त्यांचा प्रचार आहे.

(१) *उठोनिया प्रातःकाळी । जपा रामनामावली ।।*[२२] (७९) (२) *राम सर्वांगे सांवळा । हेमअलंकार पिवळा ।।*[२३] (७५) (३) *रामयोग्यांचे मंडण ।।*[२४] (७६)

## ओव्याशतके

ही ओव्या शतके चौदा आहेत. पांगारकरांना आपल्या 'समग्रंथात' बाराच दिली आहेत. 'रामचरित्रपर' आणि 'बालक्रीडा' ही शतके पांगारकरांनी गाळलेली आहेत. पांगारकरांनी बारा ओव्या शतकांना शीर्षके दिली आहेत. ती विषयांची सूचक आहेत. देवांच्या ग्रंथात चौदा शतके आहेत आणि त्यांना शीर्षके दिलेली नाहीत. रामदासांची समग्र कविता 'समग्र ग्रंथ' म्हणून छापणाऱ्या अन्य कोणाही संपादकाने अथवा संग्राहकाने ही ओव्या शतके आपल्या ग्रंथात समाविष्ट केली नाहीत. यांचे 'ओव्या' असे नामाभिधान केलेले असले तरी हे सर्व अभंगच आहेत. शंभर-शंभर अभंगांचा एकेक गट आणि तोही एकेका विषयावरील असे एकेक शतक आहे. हे सारे अभंग (ओव्या शतके) अनंत रामदासी यांनी संपादित केलेल्या 'समर्थांचा गाथा' या ग्रंथात समाविष्ट केले आहेत.

## वैराग्यशतक

या शतकात गर्भवासाच्या दुःखापासून वृद्धावस्थेपर्यंत होणारी जीवाची सर्व स्थित्यंतरे अगदी संक्षेपाने वर्णिली आहेत. यातील भाषा आत्मकथनात्मक असली तरी रामदासांची ती आत्मकथा नाही. गर्भवासात जीवाला कसे दुःख होते आणि जन्मानंतर जीव ते दुःख कसे विसरतो याचे वर्णन या शतकात प्रारंभी केले आहे. जननीचे जठर संकुचित, विष्ठामूत्रनाकीतोंडी यामुळे चित्त निर्बुजते. या अमंगळामुळे प्राण व्याकूळ होतो. नंतर जन्म होतो. बालपणी गर्भवासाचे दुःख विसरले जाते, पण दुसरेच दुःख निर्माण होते. 'दुःख होय देही । माता नेणे काही ।' वाचा नसल्यामुळे दुःख व्यक्तही करता येत नाही. याही वेळी 'देवा करी आता माझी सोडवण । दुःख हे दारुण भोगवेना ।' असा धावा जीव करू लागतो. पुढे मोठेपणी मायबापे लग्न केले लोभे । लग्नाची बेडी बंधनाची पण तीत आवडी मान काम प्रबळ झाला. कुटुंबाचा भार वाहू लागला. राम नाम विसरलेच. सर्वकाळ ध्यान प्रपंचाचे, कांचनाचे– 'वृद्धपणी चळले शरीर । श्रवण बधीर नेत्र गेले ।' अशी अवस्था. जीवाचे दुःखाचे असे वर्णन करून–

*सोडवाना कोण्ही श्रीरामावांचूनि । संकटी धांव रामकरी ।। राम करीतसे दासांचा सांभाळ । भक्तांचा स्नेहाळ राम येक ।।*[२५]

असा भरवसा दिला आहे. या शतकातील जीवाच्या दुःखाचे वर्णन आणि वृद्धावस्थेचे वर्णन याच आधारावर केले असावे असे वाटते. वैराग्याचा आधार सांसारिक दुःख आहे. या विचारालाही योगदर्शनाचा आधार आहे.

*'परिणामताप संस्कार दुःखैर्गुणवृत्ति विरोधाच्च दुःखमेव सर्वं विवेक्ति ।'*[२६] (साधनपाद १५)

## बंधमोक्ष-शतक

या शतकात संसाराची– प्रपंचाची रडकथा मोठ्या परिणामकारक रीतीने सांगितली आहे. वैराग्य- शतकात सर्वच आयुष्याचा– गर्भवासापासून वृद्धावस्थेपर्यंतचा आढावा घेतला. या शतकात जीव हा प्रपंचातच कसा गुंतून रममाण होऊन जातो याचे वर्णन सुमारे ७० ओव्यांपर्यंत केले आहे.

'संसाराची कथा' सांगेन म्हणून या शतकाचा आरंभ झाला आहे. मग 'लग्न आरंभिले, नोवरी आणली' या प्रसंगापासून या वर्णनाचा प्रारंभ झाला आहे. 'लग्नासाठी घरोघरी कण मागितले, कण कोणी देईना, खावयाला अन्नही मिळेना, वस्त्रही मिळेना, अखंड चिंतेतच काळ जाऊ लागला. स्नानसंध्यादी नित्यनेमही राहू लागला. 'नोवरी म्हणे आणा हो आणा' असा रात्रंदिवस 'आणा' मागे लागला. संसार मांडला. भांडणाची नित्य करकर मागे लागली. या 'आणा'चा तपशील प्रभावी झाला आहे. कारण संसाऱ्यांचा तो नित्याचा अनुभव आहे. तपश्चर्येच्या काळात किंवा पुढेही रामदासांना हा अनुभव कोठे आणि कसा गोळा केला याचे आश्चर्य वाटते. इतके सूक्ष्म निरीक्षण त्यांनी केव्हा केले? 'दास डोंगरी राहतो' आणि हा संसाराचा अनुभव केव्हा पाहिला? तेल-मीठ, भाजीपाला, धान्य, शेणी-सर्पण, साठवणीसाठी पात्रे, गाडगी, वेळणी, परळ, मांदण, रांजण, डेरे, भाचरा, मडकी, कुंडाळे, हिंग, सुंठ, जिरे, मिरे, सेणेरे, पोतेरे असा किती तरी तपशील दिला आहे. हा तपशील व्यर्थ वाटत नाही. उलट संसारातील 'आणा' हा किती व्यापक व जाचक असतो याची प्रचीती तो घडवितो.

अशा रीतीने संसारातील ताप, दुःखे, यांचे तपशीलवार वर्णन करून शेवटी ब्रह्मप्राप्ती हेच ध्येय माणसाने ठेवणे कसे आवश्यक आहे, याचा विचार शेवटपर्यंत केला आहे.

## ज्ञानशतक

या शतकात संतांच्या संगतीने काय प्राप्त होते ते विस्ताराने सांगितले आहे. जननीजठर तुटते (जन्म-मृत्यूचा फेरा चुकतो), संसार-मायाजाळ नष्ट होतो, देव भेटतो, भवसिंधू आटतो, असाध्य वस्तू साध्य होते, अहंतेचा ठाव राहात नाही. पापबुद्धी झडून जाते. अप्रयासाने ज्ञानप्राप्ती होते, ब्रह्मपद ओळखता येते. संतसंग नसेल तर काय होते याचाही थोडक्यात विचार मांडला आहे. नंतर संत कसे ओळखावेत, हे सांगितले आहे. शांती, क्षमा, दया यांचा जणू पुतळाच. सर्वांना सारखा बोध देणारा, सर्वांसी अभेद राखणारा, सर्वकाळ श्रवण करून सतक्रिया, हरिभक्ती, सगुण भजन, लोकोद्धार यांत रस असणारा इत्यादी लक्षणे सांगितल्यावर, 'पावसील राम जीवांचा विश्राम । अहंतेचा श्रम सांडित ।।' अशी फलश्रुती सांगितली आहे.

## उपदेशशतक

शीर्षकाला अनुसरूनच या शतकाचा विषय आहे. उपदेश हाच या शतकाचा विषय आणि उपदेश भक्तीचा, ज्ञानाचा, वैराग्याचा इत्यादी. हा उपदेश साररूपाने रामदासांच्याच भाषेत देणे अधिक उचित होईल.

(१) *तूचि येक ब्रह्म येर सर्व भ्रम । दृढ धरा वर्म अंतरीचे ॥* (२) *आवडी धरावी शाश्वताची ॥*[२७] (३) *सगुणा आदरे देह झिजवावे । भजन करावें नवविधा ॥* (४) *वीतरागे मन मोकळे करावें । सुख न धरावें संसाराचे ॥* (५) *सिद्धपण अंगी आदळों नेदीवे । जाणपण द्यावे सोडूनिया ॥*

यात नवविधा भक्तीचे वर्णन केले आहे. आत्मनिवेदन या नवव्या भक्तीवर रामदासांचा विशेष कटाक्ष आहे. तोच सर्वांत मुख्य आहे आणि या आत्मनिवेदनाचे स्वरूप दासबोधात सविस्तरपणे केले आहे.[२८] तेच विचार अभंगरूपाने या शतकातही मांडले आहेत.

## निरंजनदेवशतक

देव सोडून देवळाचीच पूजा करावी तसे लोक निरंजनास सोडून अन्य साधनांच्या मागे लागतात. संसारात समाधान नाही म्हणून देवाला शोधायला लोक जातात आणि खरा देव टाकून देतात. त्यांचे सर्व कर्म त्यामुळे निरर्थक होते. ब्रह्मज्ञानावाचून इतर ज्ञान हे पशुसमान आहे, हे त्यांना कळत नाही. 'ज्ञानेन ज्ञाना, पशुभि: समाना:' या श्लोकातही हाच विचार मांडला आहे. वास्तविक खरा देव ओळखला पाहिजे. तो देव ओळखण्यासाठी 'सृष्टी भाव कोणे केले हे पाहावे' आणि 'पाहोन राहावे समाधानें ।' हाच विचार या शतकाचा मुख्य विचार आहे. परंतु लोक हा विचार टाकतात आणि पोटासाठी लोकांना नमस्कार करून त्यांचे किंकर होतात. त्या किंकराला दास होऊन भूषण मिरवतात.

## कर्तृशोधन शतक

कर्तृशोधन म्हणजे कर्ता कोण हे ओळखणे. अंतकाळी कोण सोडवण करणार? देह हा खंगून जाईल. सोयरे दुरावतील. कुठले कोण? पुत्र, दारा इत्यादी सगळे जिवलग हे बरोबर येणार नाहीत. ही माया आहे. आपण तत्त्वत: वस्तुरूप आहोत, हे जाणले पाहिजे. सृष्टीचा कर्ता कोण? ब्रह्म आणि माया याजपासून सृष्टी झाली हे खरे असले तरी सारी सृष्टी मिथ्या आहे. आपणही अज्ञानामुळे ब्रह्मापासून स्वत:ला वेगळे मानतो, पण आपण ब्रह्मच आहोत. याचा शोध घेतला पाहिजे. अशा रीतीने पंचमहाभूतांनी सृष्टीचा उत्पत्ती केली असेही म्हणणे बरोबर होणार नाही, असे विचार मांडता मांडता ब्रह्माचे कर्तृत्व आणि तेही मायेमुळे असे सिद्ध केले आणि ब्रह्म आणि आपण वेगळे नाही, हेही दाखविले– हेच कर्तृशोधन होय.

या शतकात तत्त्वज्ञान सांगितले असून त्याला अनुसरूनच भाषा वापरली आहे. पण तरीही रामदासांच्या वैशिष्ट्यांचे दर्शन या शतकातही होते. मीपणाची बुंधी बोधे उभवली, मायिकांची मात्र, तेथे कर्तेपण वाव जाये, अशा प्रकारच्या वाक्यांशावर रामदासांचा ठसा उमटलाच आहे.

## सगुण-निर्गुण संवाद शतक

सगुण आणि निर्गुण भक्ती यात महंदतर आहे असे म्हटले तरी तत्त्वत: दोन्हीत अंतर नाही. हा विचार सगुणाची व निर्गुणाची बाजू यांचा आलटून पालटून विचार मांडून शेवटी सगुणाची भक्ती ही निर्गुण प्राप्तीला उपयोगी पडणारी असल्याने 'भक्ती सांडू नका राघवाची' असा अंतिम निर्णय दिलेला आहे. सगुणाची बाजू अशी मांडिली आहे. निर्गुणाची भक्ती हीच खरी भक्ती हाही विचार विचारात घेतला आहे. सगुण-निर्गुणासंबंधीचा हा संवाद सगुणाच्या भक्तीच्या आग्रहाने संपविला आहे. मात्र सगुण श्रीराम हा निर्गुणच असल्याचेही सिद्ध केले आहे. कारण भाव हा दोहोंत प्रमुख आहे.

## सर्व ब्रह्म-दृश्य मिथ्या-संवाद शतक

मागच्या शतकाप्रमाणे याही शतकाची शैली संवादात्मक आहे. शिष्याने शंका विचारावी आणि गुरूने ती निरसन करावी, असा हा संवाद एकेका अभंगाने पुढे पुढे जातो. असा संवाद होत असतानाच शिष्य एखादे उदाहरण घेतो. गुरू ते उदाहरण कसे चूक आहे ते दाखवितो, असे शंकांचे निरसन करीत करीत दृश्य मिथ्या आहे व ब्रह्मच एकमेव सत्य आहे, असा निर्णय शेवटी दिलेला आहे. या संवादात्मक शैलीमुळे सर्व शतक आकर्षक झाले आहे. कारण दुसरा विचार मध्ये शिरूच शकत नाही. प्रश्नोत्तर पद्धतीमुळे या सर्व विवेचनाला एक प्रकारचा ओघ आलेला आहे.

*जे जे काही दिसे तेतें सर्व नासे । सर्वातीत असे परब्रह्म । परब्रह्म आहे सर्व विस्तारले । आकाराता आले तेंचि येक ।।*[२९]

यावर शंका विचारली गेली की, 'जर परब्रह्मानेच आकार धारण केला असेल तर ते आकाराला आले आहे ते नाशवंत आहे आणि परब्रह्म तर अविनाशी आहे. मग परब्रह्माने आकार घेतला हे म्हणणे बरोबर नाही. 'बोलतसे श्रुती दृश्य नाशवंत'[३०]

यावर गुरू बोलतात, चराचर ऐक्यरूपाला आले आहे हे तुला पटत नाही. तू म्हणतोस की, भिन्नपणे भिन्न नांदे सर्व लोक. परंतु 'सर्व ब्रह्मच' आहे याचे तुला ज्ञान नाही म्हणून तू असे म्हणतोस. परंतु हा भास आहे आणि हा भासभ्रम नाहीसा होईल तेव्हाच अंतरीचा भेद नाहीसा होईल.' असे दृश्याचे निरसन करीत सर्व ब्रह्मत्वाचा सिद्धान्त हळूहळू शिष्याच्या गळी छानपणे उतरविला आहे. यासाठी मधून मधून काही दृष्टान्तही दिले आहेत.

नामस्मरण, सगुणसाधना ही परब्रह्माचा साक्षात्कार होण्यासाठी असलेली साधने होत. चित्ताची एकाग्रता हे या दृष्टीने आणखी एक साध्य. योगाने सुद्धा 'योग चित्तवृत्तिनिरोध.'[३१] असे सांगितले आहे. पण चित्तवृत्तीचा निरोध केल्यानंतर एक प्रकारची शून्याकार वृत्ती निर्माण होऊ शकेल. 'ध्यानं निर्विषयं मन:' असेही सांगितलेले आहे. तेथेही मन निर्विषयक झाले की ब्रह्मप्राप्ती झाली, असे म्हणता येणार नाही. ही गुरुदेव रानडे म्हणतात. त्याप्रमाणे Dark night of the soul असेल. ईश्वराचा परब्रह्माचा साक्षात्कार हा या अवस्थेनंतर व्हावयाचा. निर्विषय मन, शून्याकार चित्त, आणि Dark night... ही साक्षात्काराच्या पूर्वीची अवस्था आहे. 'अहं ब्रह्मास्मी' ही अवस्था (हा साक्षात्कार नव्हे) यानंतर व्हावयाची. त्याला हवा तर, निर्गुणाचा साक्षात्कार म्हणावे. गौतम बुद्धाचे जे शून्य ते हेच. बुद्ध या शून्याकारपर्यंतच थांबला. पुढे

प्रत्यक्ष अहं ब्रह्मास्मि या अवस्थेपर्यंत पोहोचला नाही, असे वाटते. समर्थांनी ही अवस्था ओलांडली होती, असे 'शून्याकार जाले तुझे अभ्यंतर । नव्हे ते साचार पूर्ण ब्रह्म' या त्यांच्या उद्गारावरून सिद्ध होते. यावरून रामदासांच्या साधनेची पूर्ण अवस्था व्यक्त होत असल्याने या शतकाचे महत्त्व अधिक आहे, असे वाटते.

## समाधान शतक

याही शतकाचे स्वरूप प्रश्नोत्तरात्मक आहे. प्रत्येक वाक्यागणिक प्रश्न आणि उत्तर असा संवाद शेवटपर्यंत चालला आहे. पण ही प्रश्नोत्तरे केवळ शंकांची निरसने नाहीत. प्रत्यक्ष आचरणाबद्दल आलेल्या शंका आणि प्रत्यक्ष आचार कसा करावा याचे मार्गदर्शक उत्तर असे हे स्वरूप आहे. ही प्रश्नोत्तरे केवळ तात्त्विक नाहीत, तशी ती तात्त्विक आहेत. पण त्याचबरोबर सामान्य माणसाच्या शंकाही या उत्तरांनी निरसून जाव्यात. अशा पद्धतीने झालेली ही प्रश्नोत्तरे जणू काय आध्यात्मिक साधनेचे प्रात्यक्षिकच. इतके या शतकाचे अध्यात्माच्या दृष्टीने महत्त्व आहे.

संतांची सेवा करावी, शून्याकार सर्व मोडावे, विवेकाने परब्रह्म जोडावे, वाग्जाळ त्यागावे, विवरल्याशिवाय समाधान घडत नाही, 'ज्ञानमार्गाशिवाय सर्व काळ शीणच' आहे असे जाणावे, मनाला जाणले की मनोमय होतो. आत्मबुद्धी झाली की देहबुद्धी आपोआपच जाते आणि आत्मरूपाशी तद्रूप झाले की समाधान लाभते. असा हा शतकाचा सारांश आहे. 'अंतर्भाव' या लघुकाव्याची शैली आणि या शतकाची शैली सारखीच आकर्षक आहे. वैराग्याचा विकार विवेकानेच केला पाहिजे. असा या शतकाचा महत्त्वाचा विचार आहे. पण हा विवेक अनेक मोहांमुळे अथवा अज्ञानामुळे येत नाही. त्या गोष्टींचे वर्णन समर्थ सूचितपणे व काही वेळा स्पष्टपणे करतात.

उदा. (१) *उदर सुटेना कामाची कल्पना ॥* (२) *वासना विस्तार आवरेना ॥* (३) *तीर्थाटण काय पाहतील मूढा । पाणा आणि धोंडा जेथें तेथें ॥* वगैरे. आणि म्हणून विवेकाने हे मोह आवरावेत आणि वैराग्य अंतरी बाणवावे म्हणजे आपोआपच रामरूपी धन्य होऊन जातो. या शतकाचे वैशिष्ट्य हे की सामान्य माणसाच्या मनातील शंकाची आधीच कल्पना करून त्यांचे निरसन परिचित दृष्टांत आणि उदाहरणे यासहित अगदी स्पष्ट शब्दात केले आहे. आपले उदात्त व उन्नत समजले जाणारे विचारसुद्धा कसे चुकीचे असतात, हे रामदासांनी स्पष्ट भाषेत दाखवून दिले आहे. *पापरूपी मनी परस्वा चिंतितो । संसारी भोगितो आपुलीच ॥*[३२]

यातील प्रखर सत्य समर्थांनी स्पष्टपणे सांगितले आहे. यातील अगतिकताही व्यक्त झाली आहे.

## प्रारब्ध प्रयत्नी प्रयत्न श्रेष्ठत्व शतक

या शतकातील विषय हा इतर शतकापेक्षा वेगळा असूनही अध्यात्म विषयाच्या बाबतीत इतर शतकांतील विचारच मांडले आहेत, पण तरी सुद्धा प्रारब्ध श्रेष्ठ की प्रयत्न श्रेष्ठ हा विषय घेऊन प्रश्नोत्तराच्या रूपानेच त्याची चर्चा केली आहे. शिष्याकरवी शंका व गुरूकडून उत्तरे याच शैलीचा येथे वापर केला आहे. पण केवळ प्रश्न आणि उत्तर एवढीच शैली हे वैशिष्ट्य नाही. तर तार्किक विचारांनी व उदाहरणांनी वक्तृत्वपूर्ण शैलीत प्रारब्ध आणि प्रयत्न या दोन्हींची बाजू तितक्याच जोरदारपणे मांडून नंतर काही बाबतीत प्रारब्ध मानावेच लागते व

काही बाबतीत प्रयत्नाशिवाय चालत नाही, हे सिद्ध केले आहे. प्रयत्न महत्त्वाचा आहे. त्या योगेच पैलपार पावता येते. पण हे म्हणणे बरोबर नाही. प्रारब्धानेच तड लागते. यत्नाने काहीही होत नाही. छे, छे, यत्नाने साध्य होत नाही असे काय आहे? नीट विचार करून पाहिले असता असे दिसून येईल की यत्नाने सर्व काही साध्य होते.

अशा अनेक प्रश्नोत्तरावरून सर्व शतकात कशा तऱ्हेने प्रारब्ध व प्रयत्न यांचा विचार केला आहे, ते दिसून येईल. ईश्वरापासून जीवसृष्टी झाली तेथे मात्र प्रारब्ध मानले पाहिजे आणि नंतर मात्र प्रयत्नच श्रेष्ठ । इतकेच नव्हे, ब्रह्मापासून सृष्टी निर्माण झाली तीही प्रयत्नानेच. 'प्रेत्न अंतराळी मूळारंभ'[३३] आणि म्हणून प्रारब्धापेक्षा प्रयत्न श्रेष्ठ आहे. प्रारब्धाचे अस्तित्व आहे, नाही असे नाही. पण प्रयत्न हा श्रेष्ठ आहे. तो सोडू नये हाच निर्णय शेवटी दिला आहे आणि म्हणून 'उपासना आता मोडू नये'[३४] असा उपदेश रामदासांनी केला आहे. या शतकातील रामदासांची शैली तर्कनिष्ठ, आणि वक्तृत्वपूर्ण आहे. वर्णनकौशल्यापेक्षा किंवा भाषासौंदर्यापेक्षा या शतकाचे महत्त्व या शैलीमुळे वाढले आहे. तर्क निरुत्तर करणारा आहे. दुसऱ्या पक्षाची सर्व मते खोडून काढून आपली मते तार्किक पद्धतीने प्रतिस्थापित करावयाचे हे काम फार अवघड असते. रामदासांनी या शतकात हे अवघड कार्य यशस्वी रीतीने केले आहे.

या विवेचनाचे स्वरूपच धावते आहे. प्रश्न विचारला की लागलीच उत्तर देऊ व अन्य पक्षाला पराभूत करावयाचे तर हजरजबाबीपणा पाहिजे आणि हजरजबाबीपणासाठी व्यासंग, व्युत्पन्नता, वक्तृत्व, आवेश, स्वमताबद्दल निष्ठा इत्यादी अनेक गुण असावे लागतात. रामदासांच्या अंगच्या या गुणाची कसोटी या ओवी शतकात लागते आणि रामदास या कसोटीला नि:संशय उतरतात. येथे सॉक्रेटीसच्या संवादाची आठवण झाल्याशिवाय राहत नाही. भाषेची गतिमानता, विचारांची ही गती, तर्ककर्कशता सडेतोडपणा, विचारांत काटेकोरपणा हे सर्व गुण या शतकातील भाषेच्या प्रयोगावरून रामदासांच्या अंगी वसत होते, हे सिद्ध होते आणि म्हणून हे शतक काव्यात्म आहे, असे म्हटले पाहिजे. आळसी पडतो सावकास, खातो/ जेवतोस कासयासी, कपाळीचे चुके ऐसे नाही, हे विधीने लिहिली बोला, तेव्हा विधी कोणे स्थळी उभा होता, अशा खडखडीत भाषेतील प्रश्नोत्तरे हे या शतकाचे भूषण होय यात शंका नाही.

रामचरित्र शतक आणि श्रीकृष्ण बाळक्रीडा शतक या दोन शतकांचा विचार 'रामदासांचे चरित्र वाङ्मय' या प्रकरणात केला आहे. ही ओवी शतके रामदासांच्या व्यवहारज्ञानाची त्यांच्या बुद्धिमत्तेची, त्यांच्या काव्यात्मकतेची, निष्ठेची, गुण-निर्गुण समन्वयाची, भक्तीची, भाषाप्रभुत्वाची द्योतक आहेत, असे दिसून येते. या ओवी शतकाचा विषय प्रामुख्याने अध्यात्माचा असला तरी प्रयत्न-प्रारब्धासारख्या विषयाचाही अंतर्भाव यात झाला आहे. यावरून रामदासांना कोणत्याही विषयाचे वावडे नव्हते, सर्व विषयांवर त्यांची विचारपरिप्लुत मते पक्की झालेली होती, हे दिसून येते. लोकशिक्षणासाठी आणि समाज सुधारणेसाठी काव्यरचनेचे माध्यम स्वीकारले तेव्हा त्यातील कलेतही मागे राहायचे नाही. विविध प्रयोग करून आपली कविता आकर्षक करायची व ती उगीच फलकटही बनवायची नाही. ती चांगली भरीव विचारांनी संपन्न करायची हा त्यांचा विश्वासही येथे व्यक्त होतो. रामदास कवी नव्हते, असे आता कोणालाही म्हणता येणार नाही. पण आकसाने कोणाला तसे म्हणायचेच असेल त्याला कोण काय करणार.



# ७. मनाचे श्लोक व इतर श्लोक

रामदासांच्या व रामदासी वाङ्मयात, रामदासी संप्रदायात आणि सर्वसाधारण माणसाच्या आध्यात्मिक जीवनातही 'मनाच्या श्लोकांचे' महत्त्व अनन्यसाधारण आहे. पांगारकरांनी यांना 'मराठी भाषेतील एक उपनिषद' असे महत्त्व दिले आहे.[१] यात सारा श्रुत्यर्थ उमटला आहे, असेही ते म्हणतात.... हे श्लोक नव्हेत, तर नेहमी टवटवीत ताजी व परिमळाने दशदिशा व्यापणारी ही दिव्य सुमने आहेत इतके महत्त्व पांगारकरांनी यांना दिले आहे.[२] श्रीसमर्थांनी दुसरी कोणतीच ग्रंथरचना केली नसती आणि नुसते मनाचे २०५ श्लोक आपल्यामागे ठेवले असते, तरी तेवढ्यावरून अद्वितीय राष्ट्रगुरू, असामान्य कवी, अलौकिक भगवत्‌भक्त आणि अपूर्व तत्त्वज्ञानी म्हणून त्यांचा लौकिक झाला असता. महाराष्ट्रात मनाच्या श्लोकांइतकी लोकप्रियता दुसऱ्या कोणाच्या कोणत्याही काव्याला प्राप्त झालेली नाही, असे याचे महत्त्व देवांनी गाईले आहे.[३] 'अतिशय साध्या भाषेत अध्यात्माचा अतिशय मोठा आशय त्यांनी (रामदासांनी) महाराष्ट्राला दिला आहे. अशी श्री शिवाजीराव भावे यांनी मनाच्या श्लोकांची आरती गाइली आहे.[४] 'सारा परमार्थ मनाच्या श्लोकांत आहे, छोटे पुस्तक कायम खिशात ठेवा, निदान रोज उघडा, मिटा व मग जेवा. आज ना उद्या अर्थांत शिराल, अर्थरूप व्हाल.' इतकी अनन्य भावना डॉ. प्राणी यांनी व्यक्त केली आहे.[५] 'मनाचे श्लोक म्हणजे मराठी भाषेतील गीताच होय' असे भास्करबुवा रामदासी यांनी म्हटले आहे.[६] 'मनाचे श्लोक' ह्यांतील बहुतेक श्लोक दासबोधावर आधारलेले आहेत. तेव्हा 'मनाचे श्लोक' हे दासबोधाचे सार (संक्षिप्त आवृत्ती) असे म्हणता येईल.' असे ना. वा. गुणाजी यांनी म्हटले आहे.[७] मनाच्या लोकांत वेदांचे गुह्य, शास्त्रांचे सार, कर्म, उपासना, ज्ञान यांचा प्राकृतात केलेला विस्तार, याच्या मननाने आत्मा गोचर होतो, यांच्या श्रवणाने साधक परमार्थाची खूण पावतात, असे महत्त्व यशवंत या शिष्याने 'मनोबोधाच्या आरतीत' गाइले आहे.[८] या सर्वांवरून 'मनाच्या श्लोकां'चे रामदासांच्या वाङ्मयात किती महत्त्व आहे, हे सहज कळून येईल.

मनाच्या श्लोकांची संख्या २०५ आहे. चित्रशाळेने छापलेल्या व श्री. कुकडे यांनी संपादिलेल्या रामदासांच्या समग्र ग्रंथात २१० श्लोक दिले आहेत.[९] श्री अच्युत चिंतामण भट यांनी संपादिलेल्या रामदासांच्या समग्र ग्रंथातही २१० श्लोक दिले आहेत.[१०]

विषयानुरोधाने श्लोकांची संगती वेगवेगळ्या पद्धतीने लागली गेली आहे.

**विषय विवेचन :** प्रारंभी नमन आणि शेवटी उपसंहारात फलश्रुती सांगितली आहे.

यावरून साधनेला योग्य करणे, ज्ञानवैराग्य अंगी बाणविणे आणि अंती मुक्ती भोगण्यास योग्य करणे हा मनाच्या श्लोकांचा हेतू आहे व फलश्रुतीच्या रूपाने तो सांगितला आहे.

मनाला केलेल्या उपदेशाचे सार खालीलप्रमाणे आहे.

'भक्तिपंथेचि जावे, दुष्टवासना, पापबुद्धी, अनीती, विषयसंगती, कामक्रोधादी विकार निंद्य म्हणून सोडून द्यावेत, श्रेष्टधारिष्ट, नम्र व मधुरवाणी, धर्माचरण, चंदनासारखा देह झिजविण्याची बुद्धी, निःस्वार्थबुद्धी व मुख्यतः रामभक्ती.

मनालाच उपदेश का? रामदासांनी मनाला उपदेश केला आहे. कारण मनुष्याच्या बंधनाला आणि मोक्षाला मनच कारणीभूत असते. 'मन एव मनुष्याणां कारणं बंध मोक्षयो: ।' मनुष्य ज्या अनेक तत्त्वांचा बनलेला आहे, त्या सर्वांत सद्गती अथवा अधोगती देण्याला एक मनच समर्थ आहे. मन म्हणजेच संसार.

*मन: कल्पित संसार जाण । मनें कल्पिलें जन्म-मरण । संसारचक्री आवर्तन । मनास्तव जाण पुन:पुन: ।।*[११]

मन हे ओढाळ आहे, ते चंचल आहे. एका विषयावर कधीच ते स्थिर राहत नाही. सांसारिक वस्तूंकडेच ते ओढ घेते. शाश्वत परब्रह्मात ते रंगत नाही, म्हणूनच जन्म-मरणाच्या फेऱ्यातून त्याची सुटका होत नाही. या मनालाच समजावले तर प्रश्नच मिटेल. म्हणून रामदासांनी मनाला उपदेश केला.

**काव्यात्मकता :** मनाचे श्लोक अतिशय साधे, सोपे व प्रासादिक आहेत. ह्यांचा प्रवाह अस्खलित आहे, म्हणावयाला गोड, पाठ करायला सोपे, ऐकायला मधुर, मननाला सुखशांतिदायक आहेत. लोकप्रिय आहेत... समर्थांच्या या श्लोकांत आधी केले मग सांगितले, अशा स्वानुभवाचा रंग भरलेला आहे, प्रसाद व सहजपणाचा आनंद उसळला आहे, उपासनेची ज्ञानाशी मिठी पडल्याचा अनिर्वाच्य स्वसुखानुभव उमटला आहे, त्यामुळे ह्या श्लोकांना अवीटपणा आला आहे.' असे पांगारकरांनी मोठे आदरयुक्त उद्गार काढले आहेत.

**रसवत्ता :** यात करुण रस, बीभत्स रस, वीर रस, हास्य रस, शांत रस अशा साऱ्याच रसांचा समावेश आहे. रामदासांनी मनाला केलेला हा बोध अत्यंत कळकळीने केलेला आहे. ही कळकळ श्लोकांच्या प्रत्येक चरणात व्यक्त झालेली आहे. सर्व श्लोक एका प्रकारच्या कारुण्याने अनुस्यूतपणे प्रवाहित आहेत. मन एकसारखे दुसरीकडे ओढ घेत आहे आणि रामदास त्याला खेचून आणून उपदेश करीत आहेत, आवरत आहेत, असे हे दृश्य मोठे करुण आहे. असा हा करुण भाव मनाच्या श्लोकांचा स्थायीभाव आहे. 'मना सज्जना हीत माझे करावे' अशी काकुळतीची विनवणीही केली आहे (२२) हेही अत्यंत करुण आहे. अशी ही करुण वचने मनाला एक प्रकारची उदास जाणीव करून देतात. हा करुण रसाचा प्रवाह अगदी शेवटपर्यंत चालतो.

**अलंकार योजना :** मनाच्या श्लोकांत खालीलप्रमाणे अलंकारांचा उपयोग केला गेला आहे– उपमा, अनुप्रास, रूपक, विरोधाभास, चेतनगुणोक्ती, श्लेष, व्यतिरेक या अलंकारांचा उपयोग अलंकारनिर्मितीच्या उद्देशाने म्हणजेच केवळ काव्याला शोभा आणण्यासाठीच केलेला नाही. ओघाने जे अलंकार सहजस्फूर्त येतील ते अर्थ स्पष्ट करण्यास आवश्यक असतील तेव्हाच वापरले आहेत. त्यामुळे अलंकारांची संख्या कमी आहे. तथापि तेथे अलंकार त्या त्या ठिकाणी योग्य असेच आहेत.

**शब्दयोजना :** समर्थांची शब्दयोजना अगदी समर्पक असते, असे आपण पुष्कळ वेळा पाहिले आहे. मनाच्या श्लोकांच्या संदर्भातही आपल्याला याचा प्रत्यय येतो. कर्म खोटे (९) सज्जना नीववावे (८), दु:खाची सांडी करावी (१०), अकस्मात सांडूनिया सर्व जाती (१५), जनासारिखें व्यर्थ कां वोसणावे (२४), भक्तरीपू शिरीं कांबि वाजे (२९), करी संकटी सेवकाचा कुडावा, (६७) विकल्पें ऊठे तर्क त्या नर्क छी छी (१०१), मना कोप आरोपणा (१०७), हिताकारणे बंड पाषांड वारी (१११), वाउगी चाहुटी (१८२), अशासारखे शब्द

समर्थांच्या खास छापाचे आहेत. ते सर्व सार्थक आहेत, स्वतंत्र अर्थ निष्पन्न करणारे आहेत.

**भाषाशैली :** चपखल, अर्थवाही, स्वतंत्र रामदासी छापाच्या घडणीचे शब्द हे समर्थांच्या भाषाशैलीचे वैशिष्ट्य तर आहेच. पण त्याहीबरोबर समर्थांच्या भाषेची आणखीही वैशिष्ट्ये आहेत. त्यांच्या भाषेची मांडणी अशी आहे की काही काही वाक्ये (ओळी) मराठीत वाक्प्रचार होऊन बसली आहेत. त्यामुळे प्रसादगुणयुक्त शैली, असे समर्थांच्या भाषेचे वर्णन करता येईल. सर्वांना समजेल अशी सोपी परंतु त्यांच्या आध्यात्मिक विचारांना पेलून नेणारी भाषा समर्थच वापरू जाणत, असे म्हटले तरी चालेल. परमार्थाची पारिभाषिक शब्दावली न वापरता किंवा काही वेळा वापरूनही त्यांतील क्लिष्टता टाळून रामदासांनी परमार्थ हा सहजसुलभ करून दाखविला आहे. आणखी एका कारणाने समर्थांची भाषा अगदी जवळची वाटू लागते. ते कारण म्हणजे पुराणातले दाखले रावण (१३), शंकर (७३), पार्वतीश (शंकर), (८२) अजामीळ (९५), पिंगळा वेश्या (९५), प्रल्हाद (९६), अंबऋषी आणि उपमन्यू (११६), ध्रुव (११७), गजेंद्र (११८), मत्स्यकूर्मादी सर्व अवतार (१२० ते १२५), द्रौपदी (१२४), वासुदेव (१२८) इत्यादी.

**शैली :** काही ठिकाणी विशेष शैलीचा वापर रामदास करतात. मनाच्या श्लोकांतील रामदासांची भाषा प्रसाद व माधुर्य आणि ओज या तिन्ही गुणांनी युक्त आहे. ती अतिशय प्रभावी झाली आहे. रसपूर्णता, सोपेपणा, प्रभाव, प्रभावीपणा, अलंकारयुक्त अशा विविध गुणांनी ती नटली आहे. जिव्हाळा, कळकळ, वात्सल्य हे गुणही या भाषेत प्रकट झाले आहेत. भाषा निर्दोष आहे असे ठामपणे म्हणता येईल, इतकी शुद्ध आहे. रामदासांचे मनाचे श्लोक हे प्रौढ काव्यशक्तीचे द्योतक आहेत यात मुळीच शंका नाही.

**वामनी मनाचे श्लोक :** वामन पंडितांनीही 'मनाचे श्लोक' रचिले आहेत. ते एकूण ११८ आहेत. रामदासी मनाच्या श्लोकांचा प्रभाव त्यांच्या श्लोकांवर झाल्याचे स्पष्ट दिसते. वामनपंडितांनी नंतर समर्थांचे शिष्यत्व पत्करले होते. तेव्हा समर्थांच्या ग्रंथाचा प्रभाव झाला असे म्हणावयाचे. 'म्हणे वामना' ही मुद्रा प्रत्येक श्लोकात वामनपंडितांनी वापरलेली आहे. रामदासांचे तसे नाही. रामदास 'दास म्हणे' असे न म्हणता ओळीशी एकरूप होणारी मुद्रा वापरतात. उदाहरणार्थ 'नुपेक्षी कदा रामदासाभिमानी' यात दासाभिमानी यावर श्लेष सुद्धा आहे.

## राममंत्राचे श्लोक

'मनाचे श्लोक' आणि 'राममंत्राचे श्लोक' यांपैकी 'मनाचे श्लोक' अधिक प्रसिद्ध आहेत. परंतु राममंत्राच्या श्लोकात फक्त एकाच गोष्टीवर भर देऊन ती बिंबविण्याचा प्रयत्न केला आहे. 'हरे राम' हा मंत्र सोपा जपा रे ही ती गोष्ट होय. समर्थांचे श्रीरामाबद्दलचे प्रेम प्रसिद्ध आहे. पण राममंत्राच्या श्लोकात सर्व साधनांची विफलता, फोलपणा अथवा त्यांचा अवघडपणा व्यक्त करून रामनाम हेच कसे तारक आहे हे आग्रहाने प्रतिपादिले आहे. हा आग्रह केवळ मत प्रकटीकरणाचा नाही, तर जनसाधारणाची कुवत ओळखून त्यांच्या उद्धारासाठी हा अत्यंत सोपा मार्ग समर्थांनी सांगितला आहे. हा मंत्राचा उपयोग सांगत असताना संसारात गुरफटून जाऊ नको, अन्य साधनांच्या मोहात अडकू नको इत्यादी उपदेश त्यांनी केला आहे.

मंत्र अनेक प्रकारचे आहेत. काहीची साधकास तात्कालिक फल देणारी, काहींची उशिरा, पण काहींचे जपध्यान कित्येक वेळा घातुकही असण्याचा संभव आहे. 'पण विशिष्ट मंत्रसाधनेने

एखादा साधक जर महान शक्तीला बलात्काराने वश करण्याचा प्रयत्न करू लागला तर त्याला सहन होण्याइतपत सौम्य रूप धारण करून त्याला सुखदायक दर्शन देण्याऐवजी तीच शक्ती अतिरुद्र रूपात प्रकट होऊन त्याला भ्रमिष्ट केल्याशिवाय राहणार नाही, व सौम्य स्वरूपात प्रकट न झाल्यामुळे साधकाला देवतेच्या वात्सल्य भावाचे स्वरूप पाहावयास मिळणार नाही, आणि तो कमकुवत असला तर अनर्थच होईल. सप्तशतीचा किंवा अन्यमंत्रमय ग्रंथाचा पाठ करून, काही चूक झाल्यामुळे भ्रमिष्ट झालेले किंवा प्रखर तेजोदर्शन झाल्यामुळे अंध झालेले, शक्तीच्या रुद्र स्वरूपाचा भयानक अनुभव आल्यामुळे कायमचे जायबंदी झालेले साधक आपण पाहतोच.'[१२] 'निर्वेद' हा स्थायीभाव आणि त्यामुळे उत्पन्न होणारे वैराग्य हे शांत रसाला पोषक आहे. या मंत्राच्या श्लोकात हा निर्वेद हाच स्थायीभाव आहे. प्रत्येक श्लोकात निर्वेदस्थिती उत्पन्न केली गेली आहे.

## सुकृत योग

पांडुरंग प्रल्हाद कुकडे यांनी 'श्रीरामदासांचे समग्र ग्रंथ' संपादिले आणि चित्रशाळा प्रेस पुणे या संस्थेने ते प्रसिद्ध केले. त्यात 'सुकृत योग' हे दहा श्लोकांचे प्रकरण छापलेले आहे. त्याच्या खाली तळटीपेत असा उल्लेख आहे, 'श्रीसमर्थकृत सुकृतयोग' हे प्रकरण मूळ समर्थ सांप्रदायिक कोणत्या मठातील कोणत्या बाडातील आहे हे समजण्यास मार्ग नाही. कै. राजवाडे यांनी जागजागी हिंडून अनेकानेक कागद, पत्रे, याद्या वगैरे मिळविल्या होत्या. त्यामध्ये हे श्लोक सापडले. सुमारे (शके १८३८-३९) भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे या संस्थेतील एक कार्यकर्ते कै. कृ. वि. आचार्य कालगांवकर यांनी हे श्लोक राजवाड्यांच्या दप्तरातून संशोधन करताना त्या वेळी पुढील अर्थाचा शेरा मारला होता : 'वरील दहा श्लोक भा.इ.सं.मंडळाच्या संग्रहातील वस्तू अनुक्रमांक १७ चे (हस्तलिखित) बाडात सहज दृष्टीस पडले.' 'त्यानंतर कै. राजवाडे यांनी आपली सर्व हस्तलिखित बाडे स्वत:चे हयातीतच धुळे येथे नेली. पुढे धुळे येथे 'राजवाडे वाङ्मय संशोधन मंडळ' निघून त्याचे ताब्यात राजवाड्यांची वरील सर्व बाडे दिली गेली. तेव्हापासून तो आजपर्यंत जवळजवळ १५-१६ वर्षे हे श्लोक अप्रकाशित (आमचे माहितीप्रमाणे) होते. शं. श्री. देव यांच्या कोणत्याही ग्रंथात हे श्लोक आहेत की काय हे समजू शकले नाही. वरील 'श्रीसमर्थकृत सुकृतयोग' हे मूळ दहा श्लोक 'भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे' या संस्थेचे 'त्रैमासिक वर्ष १२, अंक ४' मध्ये प्रसिद्ध झाले. ते प्रसिद्धीपूर्वीच काही दिवस अगोदर श्री. ग. ह. खरे, भा.इ.सं.मंडळ पुणे यांचेकडून आम्हास मिळाले.

कुकडे यांच्या ग्रंथाची पहिली आवृत्ती शके १८३९ मध्ये प्रसिद्ध झाली. त्या वेळी देवांची 'करुणाष्टके, सवाया, धाट्या' हा ग्रंथ प्रसिद्ध झालेला नव्हता. तो प्रथमत: शके १८४१ मध्ये प्रसिद्ध झाला. या ग्रंथात 'जनी जाणिजे योग हा सुकृताचा' या नावाने हे दहा श्लोक प्रसिद्ध झाले. त्यामुळे शके १८३९ पर्यंतच्या देवांच्या कोणत्याही ग्रंथात हे श्लोक समाविष्ट झालेले नव्हते. हे कुकडे यांचे विधान बरोबर आहे. परंतु आता हे श्लोक 'करुणाष्टके, धाट्या, सवाया' या ग्रंथात ते समाविष्ट झालेले आहेत. कुकडे यांच्या ग्रंथातील हे श्लोक व देवांच्या ग्रंथातील हे श्लोक यात थोडे पाठभेद आहेत एवढेच. जगात जे जे चांगले आपल्या वाट्याला येते ते ते आपल्याच पूर्व सुकृताचे फळ होय. हाच या दहा श्लोकांचा सारांश आहे.

तथापि या प्रकरणाचे महत्त्व वेगळे आहे. 'सुकृतयोग', 'कौल' आणि 'आनंदवनभुवनी' ही

तीन प्रकरणे एकत्र वाचली पाहिजेत. म्हणजे जे जे चांगले ते ते सुकृताने मिळते हा 'सुकृतयोगा'त विचार सांगितला आहे. 'कौल' या काव्यात रामाकडे प्रजेने कौल मागितला. त्यातही जवळजवळ अशीच मागणी केली आहे आणि रामराज्य झाले आहे अशी सूचक कल्पना केली आहे. 'आनंदवनभुवना'त हे रामराज्य प्रत्यक्ष अमलात आल्याचा आनंद व्यक्त केला गेला आहे.

## कौल

'कौल' हे सव्वीस श्लोकांचे एक लहानसे काव्य आहे. रामाला राज्याभिषेक झाला आहे. रामराज्य आता व्हावयाचे आहे. सर्व देवांची बांदोडी आता संपुष्टात आली आहे. रावणाचे भय संपलेले आहे आणि सर्व देव, सर्व प्रजा रामदर्शन घेऊन संतुष्ट झाली आहे. प्रजा रामाजवळ कौल मागते आहे. लक्ष्मणाला प्रजेच्या सर्व मागण्या लिहून घ्यावयाला सांगत आहे ही या काव्याच्या मागची कल्पना आहे. राम राज्यावर अधिष्ठित आहे त्या वेळचे वर्णन रामदासांचे स्वप्न साकार झाल्याच्या आनंदात केले आहे. समर्थ असे सांगत आहेत की मी आताच अयोध्येला जाऊन आलो आहे. हे सर्व समक्ष पाहून आलो आहे. सर्व प्रजेनेही आता पाहून यावे. आणि रामराज्य कसे आहे त्याचे वर्णन समर्थ करतात.

## सुकृतयोग आणि आनंदवनभुवन

याच काव्याबरोबर 'सुकृतयोग' हे काव्य आणि 'आनंदवनभुवन' हा काव्य वाचले पाहिजे. 'सुकृतयोगाला' मानून ज्याची ज्याची अपेक्षा करतो (अर्थात सर्वच नव्हे) ते ते पूर्वजन्मीच्या सुकृतामुळेच प्राप्त होते असा पूर्वपक्ष केला आहे. 'आनंदवनभुवना'त 'उदंड जाहले पाणी स्नानसंध्या करावया' अशी लोकस्थिती झाल्याचा आनंद व्यक्त झाला. हा शेवट आहे. या तीनही काव्यावरून रामदासांच्या जीवाचे आर्त काय होते हे स्पष्ट होऊन रामदासासारखा लोकाभिमुख कवी झाला नाही अशा निर्णयाप्रत आपण येऊन पोचतो.

'आनंदवनभुवन' हे काव्य स्फुट प्रकरणांपैकी ५८ वे प्रकरण म्हणून 'श्रीवनभुवनी' या नावाने श्री रामदासांची कविता खं. १ मध्ये पृ. ४२१ ते ४२६ वर छापलेले आहे. हे काव्य समर्थांच्या कार्यावर, त्यांच्या मनःस्थितीवर प्रकाश टाकणारे असल्याने व ऐतिहासिक प्रसंगाचा संदर्भ असलेले असे काव्य असल्याने फार महत्त्वाचे आहे. पण जितके ते महत्त्वाचे आहे, तितकाच त्याच्या अर्थाबद्दल आणि संदर्भाबद्दल वादविवाद आहे.

यासंबंधीचे जे वाद आहेत ते मतमतांतरे आहेत असे मानून चालू, स्थल, काल, आणि अर्थसंगती या तीन बाबतीत हे मतभेद आहेत.

या मतांचा सारांश असा :

(१) आनंदवनभुवन म्हणजे महाराष्ट्र, आनंदवनभुवन म्हणजे काशी.

(२) आनंदभुवनातील वर्णन हे सत्य आहे. ते एक स्वप्न आहे, ती एक सदिच्छा आहे.

(३) काळाच्या दृष्टीनेही 'बुडाला औरंग्या पापी' हे बरोबर नाही. औरंगजेब नंतर मृत्यू पावला आहे.

**निष्कर्ष :** प्रथमतः असे पाहिले पाहिजे का हे रामदासांना पाहिलेले एक स्वप्न आहे. 'स्वप्नीं जे देखिले रात्री, ते ते तैसेच होतसे' याचा अर्थ ते स्वप्न सांगत आहेत असाच आहे. हिंडता फिरता गेलो आनंदभुवनी ते स्वप्नात. ही त्यांनी साक्ष देखिली दृष्टी. हे स्वप्नवर्णन

शेवटपर्यंत आहे. म्हणजे ५५ ओवीपर्यंत आहे. आणि हे स्वप्नात पाहिले ते पुढे कितपत खरे होते ते पहायचे असे उद्गार त्यांनी शेवटी दोन वेळा काढले आहेत. 'पुढे घडेल ते खरे' (५६) आणि 'काय होईल ते पहावे' (५०) शिवाय 'स्मरले लिहिले आहे' (५७) असा स्वप्नात पाहिले व जे जागेपणा स्मरले ते लिहिले आहे असा स्पष्ट उल्लेख आहे. यावरून हे स्वप्न आहे हे निश्चित होते. पण येथे अशी शंका घेतली जाणे शक्य आहे की, ' ते तें तैसेचा होतसे' याचा अर्थ कसा लावायचा? स्वप्नात जे जे पाहिले ते ते कसे ते मी आता सांगतो, असा त्याचा अर्थ घेतला की पुढचे सारे स्वप्न आहे हे स्पष्ट होते.

**आनंदभुवनातील भावोत्कटता :** हे एक स्वप्न मानले किंवा धोंड म्हणतात त्याप्रमाणे सत्नामी लोकांच्या या दंडाची हकीकत असली तरी रामदासांच्या मनातील इच्छा, आकांक्षा यांचा परिचय या काव्यात होतो. स्वप्न पडण्याइतके स्वधर्मासाठी स्वराज्याचे चिंतन रामदासांचे होते. समराजकारणी संत होत याबद्दल शंका बाळगण्याचे कारण नाही. देशाची उन्नती, स्वधर्म, आटोकाट, प्रेम या दोन भावना या प्रकरणात उत्कटत्वाने जाणवतात.

## स्फुट श्लोक

**स्फुट श्लोकांचे स्वरुप :** हे श्लोक म्हणून जरा म्हटलेले असले तरी प्रमाणिका वृत्तात रचलेल्या चतुष्पदी ओव्यात आहेत. सामान्यपणे रामदासांचा श्लोक हा भुजंगप्रयात वृत्तात असतो. पण यांना श्लोक असे म्हटले गेले आहे म्हणून येथेही तसाच उल्लेख केला आहे. एकेका श्लोकांच्या पटात कधी कधी ३०-४० तर कधी कधी फक्त एकच श्लोक असे ६० गट मिळून हे स्फुट श्लोक होतात. 'प्रबोध हा खडाखडी करा विवेक तातडी' असे त्यांचे उद्बोधन आहे. तिच तळमळ. तिच उत्कटता, या स्फुट श्लोकातही अभिव्यक्त झाली आहे. म्हणून 'स्फुट प्रकरणा' इतकेच या श्लोकांचेही महत्त्व आहे. काव्य या नात्यानेही श्लोक कमी दर्जाचे नाहीत हे दिसून येईल.

### स्फुट श्लोकांचे विषयी विभाजन :

| | | |
|---|---|---|
| रामनाम महिमा | : | १,११ |
| श्रीरामवर्णन(महिमा) | : | २,३,४३ |
| कवित्वलक्षण | : | ४ |
| निर्गुणस्वरुप | : | ५ |
| ब्रह्माची प्रचिती | : | ६,१३,२६,२८ |
| सावधनतेचा उपदेश | : | ७,८,२१,२९,३०,३१,३३,३४,४६ |
| सगुणाचे महत्त्व | : | ९ |
| व्याप | : | १० |
| महंतास उपदेश | : | १२ |
| सारविवेक | : | १४ |
| उपासना(साधना) | : | १५ |
| वादाची विफलता | : | १७ |
| विचक्षणाची लक्षणे | : | २२,२४ |

**वर्णनसौंदर्य :** श्रीरामांनी बाण सोडून तीर्थ निर्माण केले ते रामतीर्थ, त्या रामतीर्थाचे वर्णन समर्थांनी ५२ व्या स्फुट श्लोकात केले आहे. 'मोठा कठीण असा पहाड रामानी बाण मारुन फोडला. बाण मोठाच प्रभावी होता. रामबाणाच तो आणि रामतीर्थ निर्माण झाले. इतके सुंदर की उदास तपस्वी सुद्धा ते स्थळ पाहून मोहून गेले. स्वच्छ सुशीतल जलाने अगदी वरपर्यंत भरलेले ते तीर्थ कित्येक लोकांनी पाहिले. त्याच्या काठावर नाना तऱ्हेच्या फुलाफळांचे वृक्ष डवरले आहेत. जणू काय निबिड अरण्यच दाटले आहे. आम्रवृक्षही डोलत आहेत आणि त्यावर अनेक पक्षी गात आहेत. थंडगार वारा क्षणाक्षणाला सुखावतो आहे. सर्वांना धन्य धन्य वाटत आहे.' असे सुंदर वर्णन या सामतीर्थाचे आहे. रामदासांच्या वर्णन कोशची ही साक्ष आहे.

## स्फुट प्रकरणे

**रामदासांच्या कवितेतील स्फुट प्रकरणांचे स्थान :** स्फुट प्रकरणांचे विषय विविध आहेत. सगुण– निर्गुण भक्तीवर त्यात भर देण्यात आला असला तरी सुद्धा प्रयत्नांचे महत्त्व, प्रेरणा देणारी वचने, व राजनीती बद्दलचे स्पष्ट विचार, सामाजिक व राजकीय परिस्थितीचे

तत्कालिक वर्णन व त्यामुळे इतिहासावर पडणारा प्रकाश इत्यादीमुळे स्फुट प्रकरणे हा रामदासांच्या समग्र कवितामध्ये एक विशेष आगळे असे स्थान धारण करतात. यांची रचना गतिमान, ओधवती, अलंकारांनीयुक्त असल्याने वाचकांच्या मनात एक वेगळेच आकर्षण निर्माण होते. रामदास इतर कविता हा अध्यात्म– केंद्रित आहे. प्रपंचाबद्दलचा कर्मयोगी विचारही त्यात जोरदार सांगितला आहे. परंतु स्फुट प्रकरणांमधील स्फूर्ती उत्साह आणि चैतन्य काही आगळेच आहे. यातील काही प्रकरणे रजोगुणात्मक वाटतील पण त्यात एक अलौकिक तेज आहे हे निश्चित. या प्रकरणातील विचारांना तात्विक अधिष्टान देण्याचही समर्थ हे समर्थ झाले आहेत यातही शंका नाही. म्हणून स्फुट प्रकरणांचे रामदासांच्या समग्र कवितेल स्थान महत्त्वाचे आहे.

**प्रयत्नाचे स्वरुप :** प्रयत्नाची अध्यात्मशास्त्रतही अत्यंत आवश्यकता असते. अध्यात्माकडे निर्माण झालेला ओढा श्रवणाने, मनाने स्थिर ठेवणे, प्रयत्नपूर्वक नित्य उपासना चालू ठेवणे आवश्यक असते. बुद्धिवाद, तर्क, नास्तिक्तावाद इत्यादांमुळे मन चंचल होऊन उपासनेपासून परावृत्त होण्याचे अनेक प्रसंग येतात. त्यांना प्रयत्नपूर्वक बाजूला सारणे आवश्यक असते. रामदासांना याही बाबतीत प्रयत्नाचा उपदेश केला आहे. असे अध्यात्ममार्गातील प्रयत्नाचे स्वरुप आहे.

**चातुर्य :** स्फुट प्रकरणांतून चातुर्याचा उपदेश अनेक ठिकाणी आला आहे. स्वरुपही त्या त्या ठिकाणी व्यक्त झाले आहे. चातुर्यचा प्रश्न लोक व्यवहारातच येतो. परमार्थाशी त्याचा संबंध क्वचितच येतो. यावरुनही रामदासांचा कर्मयोगाकडेला ओढा प्रकट होतो. चातुर्य आणि राजकारण यात कसलाच गोंधळ केलेला नाही. राजकारणात चातुर्याचा समावेश होतो पण चातुर्यात राजकारणाचा समावेश होईलच असे नाही. आणि म्हणूनच राजकारणाची लक्षणे सांगत असता काही चतुर्याची लक्षणे सांगितली गेल्याने त्या राजकारण सांगणाऱ्या ओव्यानांही चातुर्याच्या ओव्या आहेत असे गृहित धरून रामदासांनी राजकारण सांगितले नाही असा त्यांच्यावर आरोप करण्यात येतो.

**स्फुट प्रकरणात वर्णिलेली सामाजिक परिस्थिती :** स्फुट ओव्यांपैकी काही ओव्यात (२,४,५,७) समर्थाच्या काळातील परिस्थितीचे वर्णन थोडक्यात आलेले दिसते.

१ गलबला बुधी नासीतो । नाना निश्चये सांगता ।
ऐकावें कोणकोणाचें । बोलताहे बहुचकी ॥

२ सांगोंची जाणती सर्वे । कर्ता कोण्हा दिसेचिना ।
मिथ्याच सांगती वार्ता । नेटे पाटे बळविती ॥

३ ऐसे हे लोक सृष्टीचे । प्रवाहीं पडिले पहा ।
करंटे मिळाले सर्वे । जो तो बुधीच सांगतो ॥

४ हिशेबी कोण पाहातो । धामूधाम चहुंकडे ।
लीला ते राहिली पर्ता । तेथे केंची विवंचना ॥

५ कारबार बुडाला तो । कोण कोणास पूसतें ।
लाच चोरी बहु जाली । घालाधाला परस्परें ।[७६]
धन्याला नेणवे काही । बेदारी नगरी पहा ।

६ विषयवासनेसाठी । परोधेनची जाहाले ।
सांगती सर्वही कामें । आपुलाली परोपरीं ॥

उसंत घ्यावया नाहिं । चुक्ता गांजिता सदा ।।
गांजिता मारिता सर्वे । ज्याचे त्याचे किती करु ।
रडावे बोंबलावेना । लाता बुक्या परोपरी ।
उदंड ताडणे होती । दुख शोक विटंबना ।।
आधार पाहाता नाही । कंपक्षी तो असेचिना ।[७७]
विसावा सुटीका नाही । दुःख जाले परोपरी ।।
७ साहेब जाहाला मोठा । कोण वेळेसी पावतो ।
धणा ते लालसी मोठे । चोरटे सेवक जनीं ।।
विश्वास येकमेकाचा कदापी न घडे जनीं ।।
जाणती येकमेकांला । परस्परेंची धातकी ।।
मारिती वीष देताती । स्वामी सेवक ते पाहा ।।[७८]
आडोन चालते सृष्टी । विपट पडिले सदा ।।
८ मा झे माझे तुझे माझे । ऐसी हे मैत्रिकी जनीं ।
विकल्पे चालते मीत्री । ते मीत्री आत्मघातकी ।।
न होता कार्य ते तुटे । विस्कटे सख्य मागुते ।।[७९]
मीत्र ते मिळाले दोघे । दोघेहि शठ लालची ।।
९ कविता गवता ऐसी । उदंड वाढली असे ।
असेना दिसेना अर्थु । वेर्थ वेर्थची स्वार्थ तो ।।[८०]

जिकडे तिकडे लोक दुसऱ्याला शिकवू लागतात, स्वतः त्याप्रमाणे कधी वागत नाहीत, खोट्या बातम्या सांगून दुसऱ्याला फसवितात, नीतीमत्ता मुळीच राहिली नाही, लाच चोरी, बुजबुजाट झाला, सगळी नगरी कशी बेदाद झालेली, विषय वासनेसाठी गुलामगिरी लोकांनी पत्करली आणि धनी तरी काय दिव्य? काम इतके सांगतो की उसंत मिळत नाही. काम चुकले की तो मारतो. नीट त्याच्याविरुद्ध बोंबलतासुद्धा येत नाही, तो लाथा घालतो, बुक्या मारतो, आणि त्याला थांबवीत आणि मारलेल्याची बाजू घेणारा कोणीच नाही. कारण स्वतः धनीच फार लाललोभी झालेला । कोणाची कोणावर विश्वासच राहिला नाही. सगळी सृष्टी परस्परधातक अशी झाली. कविता सुद्धा गवता सारखी उदंड वाढली पण तीतकांही अर्थ असेल तर शपथ । फक्त स्वार्थ तेवढा प्रकट झालेला । सबःकालीन परिस्थिती याहून काही फारशा वेगळा नाही. समर्थांची कविता या दृष्टीने फार बोलकी आहे आणि म्हणून तिचे महत्त्व आगळे आहे हे खरे.

**मित्रता :** तत्कालीन मित्रता कशी ढोंगी होती याचे वर्णन समर्थांना निर्भीडपणे —- आहे. आडून मैत्री म्हणजे डावपेचांनी युक्त तुझे ते माजे आणि माझेही माझेच. स्वार्थाने बरबटलेली. दोघेही लोभी आणि लुच्चे. हेही एक सामाजिक परिस्थितीचे चित्रण आहे याचा उल्लेख वर आलेला आहेच.

संसार व्यर्थ आणि धन्यही– संसाराचा-प्रपंचाचा चांगला आणि वाईट या दोन्ही बाजू समर्थांनी समतोल दृष्टीने पाहिल्या आहेत. 'वेर्थ संसार जातसे' आणि 'धन्य संसार होतसे यात संसारासंबंध आदर्शही त्यांनी उभा केला आहे.

*शब्देंची लाबती रत्नें । शब्दरत्नें अमोल्य कीं । कोंदणामाजी ते सोनें । तैसा अर्थ प्रचीतीचा ।।[८८]*

**रामदासांचे संगीतप्रेम :** रामदासांना संगीताबद्दलचे फक्त प्रेम एवढेच नव्हे तर संगीताचे दर्दी होते. पदपदांतरांताची रचना निरनिराळया रागदारीत केली असून तालांचाही उल्लेख केलेला आहे. स्वत: ते कीर्तनात गात असत. निरनिराळ्या वाद्यांची त्यांनीमाहिती दिलेली आहे.[८९] त्यांची त्यांची वैशिष्ट्येही वर्णिली आहेत. संगीताला त्यांनी ध्वनीविद्या असे म्हटले आहे. (स्फुट प्र. ४९)९० स्फुट प्रकरणे ३८, ३९, ४९ आणि ६५ संगीत विद्येशी संबंधित आहेत. यापैकी ३९ वे तर केवळ 'धन्य ती गायनी कळा' अशी गायनविद्येची धन्यता दर्शविण्यासाठीच लिहिलेले आहे.

रामदासांनी 'गायनी कळा' ही देवांच्या गुणात समाविष्ट केली आहे. ती देवाची दुसरी भक्तीच होय. इतके महत्व त्यांनी दिले आहे. आलाप, मुर्दाना, माने कवित्वे गद्यपद्यची, साजिरे बंद प्रबंद, सुक्षमे, जाड अर्थाचा जाणणारे गुणा आणि धन्य होत अशी संगीतनिपुणांची स्तुत त्यांनी गायिली आहे.

## वर्णनांचा तपशील

—- रामदासांनी स्फुट प्रकरणात (व अन्यत्रही) काही तपशील दिले आहेत. स्फुट प्रकरणात आलेले तपशील माहितीपूर्ण आहेत. वाद्यांची सविस्तर यादीच त्यांनी दिली आहे. मृदुंग, टाळ, वीणा, झल्लरी, दमामा, नगारा, घंटा, शंकख, सारंगी, दंडी, तुतारी, काहाळा, समेळ (संबळ), कोडके, डाका, डफरी, सनई, ढोलई, चिपळ्या, टिपरी, दुंदुभी, उपांग इ. इ. (स्फुट प्र. ३८)[९२]

**बागा :** नारळी, पोफळी, केळी, तुती, बकुळी, बाफळी इ. (स्फु. प्र. ५०)

**पत्री :** बेतकी, मालती, धात्री, काहोची, तुलसी, शतपत्रा, आरगुंदी, जास्वंदी, पाडळी, ढवळी, दवनी, निबोणी, रामआवळी, आनसी, फणसी, खारणी, कवठा इ. (स्फु. प्र. ५०)९ आघाडा, दुर्वा, धात्रा, बेल रुईमासा, बेतकी, दवना, मारुवा, चंदन, जास्वनी, समुद्रसोक इ. (स्फु. प्र. ३४)[९५]

**फळे :** वर पत्रीच्या यादीत काही फळांच्या झाडांचीही नावे आहेत. त्याशिवाय खर्मुज, टर्बुज, आंबा, नांबु, शेब, कलांगडी, कवीठ, जांभळ, बोर, आंजारे, लोंबरे, खारका, नारिंगे, गोडंबी, खीर्ण्या, चारंब्या, अननस, फणस, दीपद्राक्षे, सीताफळे, अक्रोड, बदाम, द्राक्ष, ऊंस, वाळके, कावड्या, संदाड, चीबुड इ. ९६ (स्फु. प्र. ३१)

अशा रितीने चेटुकविद्या, जावयोनी, चत्वारवाचा याचाही तपशील दिला आहे.

**म्हैसमंगूळ :** म्हैसमंगूळ हा खास समर्थांचा शब्द आहे. याचा अर्थ 'मऊ' असा अनंतदास रामदास यांनी दिला आहे. पण 'बावळट, 'ढ' असा त्याचा अर्थ होतो. रामदासांना हाच अर्थ अभिप्रेत असावा असे म्हैसमंगूळच्या वर्णनावरून वाटते. काही गोष्टी चांगल्या करावयाच्या आणि शेवटी स्वत:च्याच बावळटपणामुळे त्या गोष्टींच्या फळापासून वंचित व्हावा असे वागणारा तो म्हैसमंगूळ–

म्हणजेच बावळटपणे आपले हित कशात आहे हे न ओळखता स्वत:च आपल्या अनहिताचा जो मार्ग आहे तो धरणारा तो म्हैसमंगळू. या प्रकरणात उपदेश अतिशय जळजळीत शब्दात केलेला आहे. कोठेही कोणाची भीड मुर्वत ठेवलेली नाही.

**भाषा :** विचार आपले स्वत:ची भाषा घेऊनच येथे प्रकट झाले आहेत. म्हणून काही उतारे

हे सुंदर विचारासाठी वाचावेसे वाटतात की भाषेमुळे हे नीट सांगताच येणार नाही. सांगण्याचा आवेश, त्यातून दिसून येणारी तळमळ, उपदेशाची श्रेष्ठता, अनुभवाने सांगितल्यामुळे त्या विचारांना आलेले वजन, यामुळे ही स्फुट प्रकरणे काव्यविषयक नसली तरी काव्यात्मक वाटतात.

**महत्त्व :** विचारांची प्रौढता, रचनेची सुश्लिष्टता आणि ओघ, आत्मप्रचीतीचे प्रखर बोलणे, काव्यात्मकता या दृष्टीने स्फुट प्रकरणे श्रेष्ठ आहेतच. पण त्याहीपेक्षा रामदास या प्रकरणात भाष्यच करीत आहेत याची खात्री पटते आणि Poetry is the criticism of life असे म्हटले जाते त्या दृष्टीने ही प्रकरणे म्हणजे जिवंत रसरसलेल्या काव्यपंक्ती आहेत. यात कोणालाही शंका नसावी.



# ८. दासांच्या राम व कृष्ण आणि प्रासंगिक काव्याचा अभ्यास

समर्थ रामदास हे प्रामुख्याने मर्यादा पुरुषोत्तम श्री रामचंद्राचे भक्त असले तरी ते केवळ रामचरित्रापुरते सीमित राहिले नाहीत. त्यांनी रामकथा विविध रूपाने सादर केली. कृष्णचरित्रेही लिहिली आहेत.

## रामकथा

ही कथा देवांच्या ग्रंथात तेरावे ओवीशतक म्हणून दिली आहे आणि अनंतदास रामदासी यांच्या समर्थांच्या गाथ्यात हेच ओवी शतक सतरावा अभंग म्हणून दिलेला आहे. यात वाल्मिकी रामायणाच्या आधारावर आपण रामचरित्र सांगत आहो असा स्पष्ट उल्लेख आहे. यात अतिसंक्षेपाने रामायणातील घटना कथन केल्या आहेत. मार्तंड कुळी राघवाचा जन्म, यज्ञसिद्धी, त्राटिकावध, अहल्योद्धार, शिवधनुर्भंग, जानकीपरिणय, वनवास, पंचवटी व खर-दूषण इ. राक्षसांचा वध, सुवर्णमृगवध, सीताहरण, वनात सीतेचा शोध-प्रयत्न, जटायू भेट, कबंधवध, पंपासरोवर, मारुतीची भेट, सुग्रीव रक्षण, वाली-वध, वानरांशी सख्य, लंकेवर वानर सैन्याचा हल्ला, राक्षसांशी युद्ध, प्रथम रावणाला जीवदान, कुंभकर्णवध, लक्ष्मणाकडून इंद्रजितवध, रामाकडून रावणवध, बंदिशाळा फोडून देवांची मुक्तता, लंकेत बिभीषणाची राजा म्हणून स्थापना, सीता-राम भेट, अयोध्येस आगमन, भरत-भेट, मातांची भेट, सिंहासनारूढ होऊन राज्यपद स्वीकार, सर्वांना दान, वानरांना निरोप, अकरा सहस्रावरी राज्य केले, नंतर वैकुंठ गमन, जनासी उपाय हनुमंत म्हणून हनुमंताला ठेवून जाणे– ही सारी कथा थोडक्यात आली आहे. या कथेत रामावताराचा उद्देश काय असावा यासंबंधी स्पष्टपणे काही उल्लेख आहेत.

## रामराज्य

रामाने अकरा हजार वर्षे राज्य केले. त्या रामराज्याचे थोडक्यात वर्णन रामदासांनी केले आहे. रामदासांना रामराज्य निर्माण करण्याची आतुरता लागली होती हे स्पष्टपणे प्रतीत होते. म्लेंच्छांनी चालविलेले अत्याचार त्यांना बघवले नाहीत. म्हणून तर देवांना बंदीतून मुक्त करणाऱ्या श्रीरामाचे गुण आपणास आवडले असे त्यांनी स्पष्टपणे म्हटले आणि यासाठीच तर रामदासांनी जेथे जेथे अवसर मिळाला तेथे तेथे तर श्रीरामाचे गुण, त्याच्या देवांना बंदीतून सोडविण्याच्या कार्याचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. अन्य देवतांची भक्ती करणाऱ्या संतांचा मार्ग जाणूनबुजून सोडून देऊन श्रीरामचंद्रांची भक्ती स्वीकारली व शेवटपर्यंत यशस्वी रीतीने निभावून गेली. इतकेच नव्हे, तर 'रामकथा ब्रह्मांडा पैलाड भेदुन यावी' असा प्रचार केला. जगात कोठेही अन्याय, अत्याचार असू नये, सर्व ठिकाणी रामराज्य असावे, यासाठीच तर रामकथा ब्रह्मांडापलीकडे नेऊन पोचविण्याची ही प्रबळ इच्छा!

**भावात्मकता :** एवढ्याशा रामचरित्रात रामदासांनी आपले सारे भाव प्रभावीपणे प्रकट

केले आहेत. श्रीरामाचे दिव्यचरित्र, त्याच्या कार्याचा गौरव, त्याच्याबद्दलचा वाटणारा उत्कट भक्तिभाव, दुष्टांच्याबद्दलचा तिरस्कार, त्यांच्या निर्दलनाविषयीची आतुरता, त्यानंतरचा वाढलेला आनंद, रामराज्याच्या आदर्शाची त्यांची कल्पना, त्यामुळे त्यांना झालेले समाधान असे विविध भाव अतिशय उत्कटपणे यात प्रकट झाले आहेत. चरित्रात्मक अभंग असूनही याला उत्कृष्ट काव्याचा नमुना म्हणून मान्यता देण्यास विद्वानांना अडचण पडू नये असे वाटते.

## रामरावणयुद्ध वर्णन

देवांच्या ग्रंथात स्फुट श्लोक या प्रकरणात ५७ व्या श्लोकात दहा ओव्यांत हे राम-रावण युद्धवर्णन आहे. यात सैन्याची हालचाल, धनुष्यबाण, इ. अस्त्र-शस्त्रांचा मारा, आणि एकंदरीत झालेला घे घे मार यांचे वर्णन प्रत्ययकारी व शब्दचित्रात्मक केले आहे. वर्णनशैली, नादात्मकता, अनुप्रासमुक्त पण वीरश्रीची हुबेहूब प्रचीती आणून देणारी शब्दयोजना हेच या काव्याचे वैशिष्ट्य होय.

## लघुरामचरित्र (लघुरामायण)

प्रमाणिका वृत्तातील हे रामचरित्र युद्धवर्णन करणारे आहे. रावणवध आणि देवबंधनमुक्ती हाच या चरित्रातील प्रमुख विषय आहे. १२५ छंदांचे हे छोटेसे काव्य. पहिल्या पाच छंदांत गणेशवंदन आणि प्रस्तावना आहे. सहाव्या छंदापासून रावणाच्या उद्दंडतेचे वर्णन आहे. तेरा ते अठरापर्यंत देवांना रावणाने कोण कोण त्या कामाला लावले आहे याचे वर्णन आहे. बावीसपर्यंत रामाने समजावून सांगण्याचा प्रयत्न केला. पण तो व्यर्थ गेला ही हकीकत आली आहे. तेवीसपासून पुढे वानरसैन्याची तयारी आणि युद्धवर्णने आहे ते अगदी एकशेचार छंदापर्यंत आहे. रावणवध एकशे चारमध्ये आहे. एकशेपाच देवांचे बंधमोचन व नंतर रामाचे अयोध्येस आगमन एकशे एकवीसपर्यंत. एकशे बावीस ते एकशे पंचवीसपर्यंत रामाची उपासना करावी व ती करणारांच्या मनात राम सापडो अशी सदिच्छा व्यक्त करून काव्य संपविले आहे.

वीररसाला पोषक असे युद्धवर्णन व वानरांचे पराक्रम वर्णन काव्याच्या अर्ध्यापेक्षा अधिक भागात व्यापून राहिले आहे.

**बीभत्स रस :** युद्धवर्णनाबरोबर बीभत्स वर्णन असतेच. कारण युद्धाचा अटळ परिणाम रक्ताचे पाट वाहणे, मांसाचा चिखल होणे, हात-पाय तुटलेले असणे, इ. हा असतो. या काव्यातही 'किती दिसे विदारिली, रुधिरपूर जातसे, अमेध्य मांस पुरते, रणावरी नाचती भुते''[१] असे बीभत्स वर्णन आलेले आहे.

**भयानक रस :** राम-रावण तुंबळ युद्धाचे वर्णन करताना 'भये थरारिला फणी' अशी भय-अवस्था निर्माण झाली. 'तडाडिले, भडाडिले, दडाडिले, धडाडिले' अशा नादमय शब्दांनी हे भीतीचे वातावरण निर्माण करण्याचा प्रयत्न केला आहे.

**करुण रस :** वर वर्णन केलेल्या देवांच्या हीन-दीन अवस्थेचे वर्णन व त्यांना दिलेल्या कामांचे वर्णन यावरून करुणरसाचा स्पर्श हृदयाला व्हावा यात आश्चर्य नाही.

**शब्दयोजना व भाषाशैली :** या काव्यात काही नवीन शब्दांचा परिचय रामदास आपणास करून देतात.

**अलंकार :** अलंकाराचा उपयोग फारसा नाही. फक्त 'बघा विशाल ते गिरी' हे रूपक

आणि 'हुडाहुडाचि मेहुडे' । व्यापरीच ते कपी ।' ही उपमा एवढेच अलंकार आहेत, ते भाषावैभवाचा नमुना म्हणून मानावे लागतील.

## कवी रामदास

या काव्यात एक उल्लेख असा आहे की त्यामुळे रामदास हे स्वत:ला कवी म्हणवून घेतात, पण तो 'लहानसा कवी नवा' यावरून हे काव्य त्यांच्या कवि-जीवनाच्या आरंभी लिहिले गेले असावे असा तर्क सहज करता येतो आणि त्यामुळे ते कवी म्हणून प्रसिद्धही पण झाले नव्हते. म्हणजेच टाकळीच्या मठातच त्यांनी ही रचना केली असावी असे वाटते. याच काव्यात 'श्री रामदास तो कवी' असा आणखी एकदा उल्लेख आला आहे. पण तो शेवटी शेवटी. *'रघुत्तमा उपासिती । सखेचि तेचि वाटती ।'* अशी त्या वेळची त्यांची मन:स्थिती असण्याचा संभव आहे.

## रामसीता विवाह

देवांच्या ग्रंथात स्फुट ओव्या छापल्या आहेत. त्यातील पहिलीच ओवी (ओवी संख्या ६५) रामविवाहाची कथा सांगणारी आहे. वाल्मिकीने शतकोटी चरित्र लिहिले ते रामचरित्र होण्यापूर्वी. दशरथाच्या हातून श्रावणाचा वध केला. त्यामुळे त्याने दशरथाला पुत्रशोकाने मरशील असा शाप दिला. तरी पुत्र होणार यासाठी दशरथाला आनंद झाला. दशरथाला पुत्र झाला. रामचंद्राने ताटिका वधिली. जनकाचे पत्र आले. स्वयंवर मांडले. रामाने वाटेत चंडशिळा उद्धरिली. स्वयंवरात पण बिकट होता. सर्व राजे स्वस्थ राहिले. जनकाने पृथ्वीवर वीर शिल्लक राहिला नाही काय असे आव्हान केले. लक्ष्मण आवेशाने उठला, पण विश्वामित्राने त्याला आवरिले. रावण उठला.. त्याची फजिती झाली. मग विश्वामित्राने सांगितल्यावरून रामाने रावणाला जीवदान दिले. धनुष्याला प्रत्यंचा लावली, धनुष्य मोडले, पण जिंकिला. विवाहाचे निमंत्रण रघुकुळाला गेले. विवाह झाला आणि मग सीतेची सासरी पाठवणीची तयारी केली. पालख्या, सोबत सैन्य वगैरे देऊन पाठवणी झाली तेव्हा जनकाच्या डोळ्यांत अश्रू आले.

## सुंदरकांड

वाल्मिकी रामायण हाच वास्तविक या सुंदरकांडाचाही आधार असला पाहिजे. तसा तो आहेही. परंतु प्रकाशित झालेल्या रामायणाच्या ज्या प्रती आहेत त्यांत नसलेले काही प्रसंग समर्थांच्या रामायणात आहेत. त्यांचे मूळ त्यांनीच केलेल्या वाल्मिकी रामायणाच्या प्रतीत आढळते. 'रामेण रामदासेन लिखितम' असा शेवट असलेल्या रामदासांनी टाकळीच्या मठात लिहून काढलेल्या वाल्मिकी रामायणाच्या प्रतीत असे प्रसंग देवांना आढळले असे त्यांनी म्हटले आहे.[३] यावरून समर्थांनी ज्या वाल्मिकी रामायणाच्या पोथीवरून ते रामायण लिहिले ती पोथी वेगळी होती, असे दिसते. आणि हाच समर्थांच्या सुंदरकांडाचा व युद्धकांडाचा आधार होय, असे दिसते.

**वाल्मिकी रामायणातील कथेशी तुलना :** सुंदरकांडाची कथा सांगताना वाल्मिकी रामायणातील कथेचा पुष्कळसा संक्षेप समर्थांनी केला आहे. तपशील व वर्णने गाळली आहेत.

मारुतीच्या उड्डाणामुळे पर्वतावरील वनचर भीतीग्रस्त होतात, गंधर्व भितात. मैनाक पर्वताची व मारुतीची भेट इ. तपशील समर्थांनी गाळला आहे.

**सुंदरकांड : एक सुंदर खंडकाव्य :** सुंदरकांड हे रामायणातील एक कांड असले तरी रामदासांनी ती कथा यशस्वी खंडकाव्याच्या रूपाने मांडली आहे. यात हनुमंताने केलेला सीतेचा शोध, रावणाची व राक्षसांची त्याने केलेली फजिती, सीतेची भेट, मुद्रिकादान, लंकादहन, व नंतर परत येऊन रामचंद्रास निवेदन, सर्वांना आनंद, ही या खंडकाव्याची कथा आहे.

पं. विश्वनाथप्रसाद मिश्र यांनी खंडकाव्याची खालीलप्रमाणे लक्षणे सांगितली आहेत :

(१) पूर्ण जीवन ग्रहण न करता खंड जीवनाचे ग्रहण करणारे.

(२) आठापेक्षा कमी सर्ग असलेले काव्य.

(३) चतुर्वर्गापैकी एका वर्गाची प्राप्ती हा उद्देश असलेले काव्य.

(४) एकच रस असलेले अथवा अनेक अपूर्व रस असलेले काव्य

(५) आधुनिक काव्यात रसदृष्टी प्रधान नसून व्यक्तिचित्रण महत्त्वाचे असलेले काव्य

(६) कादंबरी आणि कथा यांत जे अंतर ते अंतर महाकाव्य आणि खंडकाव्य यांत आहे.

(७) छंदाची विविधता नसणारे काव्य

(८) कथानक ऐतिहासिक, पौराणिक, काल्पनिक, अथवा प्रतीकात्मक असलेले काव्य ते खंडकाव्य.

## युद्धकांड

### रामायण लिहिण्यामागचा संकल्प

रामकथा समर्थांनी अनेक वेळा गायिली आहे. राम हा देवांना बंदिवासातून सोडविणारा असल्याने समर्थांनी त्याची चरित्रे गावीत हे स्वाभाविक आहे. रामायण-रामकथा लिहिण्याचा हेतू काहीशा तुलनेने रामदासांनी युद्ध-कांडाच्या आरंभी प्रकट केला आहे.

**कथासार :** राम-रावण युद्धात मेघनाद, कुंभकर्णादी राक्षसांशी झालेल्या युद्धाचे वर्णन, त्रिशिर, नरांतक इत्यादी राक्षसांचा नाश यांचे वर्णन, कुंभनिकुंभ राक्षसांचा वध, इंद्रजीताचा वध व सुलोचनेचे सती जाणे, लक्ष्मणाला शक्ती लागते व द्रोणागिरीवरील वनस्पतीने लक्ष्मण पुन्हा शुद्धीवर येतो. रावण मारला जातो, देव मुक्त होतात, राम सीतेला घेऊन अयोध्येला येतो. वानरांना निरोप दिला जातो. बिभीषणाला लंकेचे राज्यपद दिले जाते. रामराज्य होते हा तेरा प्रसंगांतील रामकथेचा सारांश आहे.

**छंदोरचना :** रामायणाची चौदाही शतकांची रचना समर्थांनी श्लोकात केली आहे. श्लोक म्हणजे 'भुजंगप्रयात' वृत्त. चार 'य' गणांचे हे वृत्त होते. यासंबंधीची चर्चा करुणाष्टके, सवाया या ग्रंथाच्या चर्चेच्या वेळी आली आहे. हे वृत्त धावते असल्याने गतिमान भाव व्यक्त करण्यास अत्यंत उपयोगी आहे. युद्धासारखा प्रसंग म्हणजे घाईचाच. त्या वेळी संथ लय व्यक्त करणाऱ्या 'द्रुतविलंबित'सारख्या वृत्ताचा काय उपयोग? म्हणून या वृत्ताचा अवलंब केला आहे.

**रसवत्ता :** युद्धकांडात वीररसाचा परिपोष सर्वत्र झाला आहे. वीररसाचा स्थायीभाव 'उत्साह' आहे आणि त्या उत्साहाची कार्यात परिणती होताना वीररसाची निष्पत्ती होते. केवळ

लढाईतच वीररस निर्माण होतो असे नाही. सागराने सेतू बांधण्याची सूचना रामचंद्राला केली त्या वेळी उत्साहाचे उधाण येऊन वानरांनी सेतू बांधण्याचे काम सुरू केले. तो उत्साह आणि ते काम यांचे वर्णन वीररसाला पोषक आहे हे उघड आहे.

**रौद्र रस :** कुंभकर्णाचा पराक्रम वर्णन करण्याचे वेळी त्याचे रौद्र रूप वर्णिले आहे.

**बीभत्स रस :** *भुमी चालिला शोणिताचा प्रवाहो । रणी पाद छेदुन चौरंग केला । रणी कोथळा फोडिला बाणघाते ।*[४]

**भयानक रस :** लंकेला आग लावली तेव्हाचे वर्णन भयानक रस निर्माण करणारे आहे.

**करुणरस :** सीतेला रामाचे मायावी शिर दाखविले त्या वेळचा सीतेचा शोक हृदयविदारक आहे. त्याचप्रमाणे तिला राम-लक्ष्मण नागपाशाने बद्ध व बेशुद्ध असलेले दाखविले, त्या वेळचा तिचा शोक हृदयविदारक आहे. सीता ही मारली गेल्याचे रामाला जेव्हा कळले तेव्हा रामाचा शोक करुण रसाचे चांगले उदाहरण आहे. सुलोचनेने इंद्रजिताचे शिर मागितले व ती सती गेली हे सर्व वर्णन ती शत्रूस्त्री असूनही करुण आहे.

**शांत-रस :** रावणवध झाल्यानंतर अयोध्यावासी रामचंद्र सर्व वानरांचा सत्कार करून त्यांना देणग्या देतात आणि सगळीकडे रामराज्य होते याचे शेवटच्या दोन प्रसंगांत केलेले वर्णन व राम सगुण ईश्वर असल्याचे वर्णन आणि भक्तीने तो प्रसन्न झाल्यानंतर भक्ताला मिळणाऱ्या शांतीचे वर्णन हे सर्व शांतरसपोषक आहे.

**अद्भुतरस :** सर्पास्त्र, गरुडास्त्र, अग्न्यास्त्र यांचा उपयोग, सेतू बांधण्यासाठी वानरांचे झाडे उपटणे, गिरिश्रृंग उखडून आणणे इ. अद्भूत रसात्मक वर्णनेही युद्धकांडात कमी नाहीत.

**अलंकार :** युद्धकांड हे अलंकारांनी भरलेले आहे. विशेषत: अनुप्रास, नादानुसारी शब्दरचना यांनी भरलेले आहे. उपमा, रूपक, दृष्टान्त यांचीही मधूनमधून पखरण आहेच.

**शब्दचित्रे :** युद्धकांडाचे वैशिष्ट्य– युद्धकांडात जागोजागी शब्दचित्रे विखुरलेली आहेत. पर्वतावरील वानरसैन्यलीला, सेतू बांधण्यासाठी त्यांनी केलेला खटाटोप व रावणाने पाठविलेल्या हेरांच्या भेटीची वर्णने, रावणाचा हेरांवरील संताप, बिभीषणाला रावणाने दिलेली सभेतील वागणूक, सर्पास्त्राच्या परिणामाचे वर्णन इ. अशी अनेक वर्णने शब्दचित्रे उभी करतात. रामदासांची ही शक्ती जबरदस्त आहे हे प्रत्ययाला येते.

**व्यक्तिचित्रे :** आणखी एक वैशिष्ट्य : त्याचप्रमाणे व्यक्तिचित्रे निर्माण करण्यातही रामदास सिद्धहस्त आहेत. सागराला केलेल्या विनंतीच्या वेळी रामाने केलेली तीन दिवसांची तपश्चर्या, बिभीषणाचे केलेले स्वागत, हेरांना दिलेली वागणूक, सीतेसह परत आल्यानंतर सर्व सहायकांचा रामाने केलेला आदरसत्कार या सर्वांवरून रामाचे एक सुंदर व्यक्तिचित्र निर्माण होते. त्याचप्रमाणे हनुमानाचेही. सुग्रीव, रावण, कुंभकर्ण, इंद्रजीत, मंदोदरी, सुलोचना, सीता, त्रिजटा यांची व्यक्तिचित्रे मोठी आकर्षक झाली आहेत.

## रामदास आणि अन्य कवी

रामदासांवर एकनाथांचे भावार्थ रामायण, कृष्णदास मुद्गलांचे युद्धकांड आणि हिंदी संत कवी तुलसीदास याचे रामचरितमानस यांचा बराचसा प्रभाव असल्याचे वारंवार बोलले जाते आणि त्या विधानाच्या पुष्ट्यर्थ काही सारखे उतारेही काढून तुलना दाखविली जाते. रामदासांनी आपल्या या पूर्वसूरींची काव्ये वाचली होती यात शंका बाळगण्याचे काही कारण नाही किंवा

रामदासांच्या काव्यात काही वाक्ये, ओव्या, श्लोक अगदी सारखे असतीलही. पण तेवढ्यामुळे रामदासांवर त्यांचा प्रभाव होता असे म्हणता येणार नाही. कारण रामायणे लिहिण्याचा रामदासांचा हेतू मुळातच भिन्न होता. त्यांचा दृष्टिकोन ठेवून कोणाही कवीने रामायण लिहिले नाही.

## किष्किंधाकांड

'किष्किंधाकांड' या नावाचे एक कांड रामदासांनी लिहिले आहे असे मानून चित्रशाळा प्रेसने, श्री. भट व श्री. गोंधळेकर यांनी आपआपल्या संपादित समर्थांच्या समग्र ग्रंथात समाविष्ट केलेले आहे. या कांडात एकूण १८१ श्लोक आहेत. श्री. शं. श्री. देव यांनी 'समर्थ हृदया'त हे कांड समर्थांनी लिहिले नसल्याचे स्पष्टपणे सांगितले आहे, 'किष्किंधाकांड श्री समर्थांचे नाही याविषयी तीळमात्र शंका नको. त्यातील भाषा समर्थांची नाही. त्यातील विचारसरणी त्यांची नाही. श्री समर्थांचा मठातील हजारो बाडे आज आपल्यापुढे आहेत, त्यांपैकी एकाही बाडात किष्किंधाकांड नाही. (समर्थ हृदय पृ. १६८). यामुळे किष्किंधाकांडाचा विचार या प्रबंधात केलेला नाही.

## कृष्णचरित्रे

### श्रीकृष्णाचे कार्य

पहिल्या लहानशा काव्यात कृष्णाच्या कार्याचे वर्णन सारांशरूपाने केले आहे. पूतनामावशीला शोधून मारणे, रिठासुराला शकटाराला पासून मारणे, झाडे मोडणे, कालिया मर्दन इत्यादी. राक्षसांचा संहार एका एका अर्धओळीत वर्णिला आहे. आणि गोवर्धनाच्या संरक्षणाची हकिकत त्या वेळी महाभयंकर पर्जन्याचे वर्णन करून अधिक प्रभावी केली आहे.

### पर्जन्यवर्णन

यातील वर्णन किती प्रत्ययकारी आहे हे पाहाण्यासारखे आहे. वीज चमकत असता दिशा क्षणभर लकाकतात, आणि पुन: तितकाच अंधार 'गडद' परोपरी होतो. हे दृश्य नित्याच्या अनुभवाचे आहे. पाऊस पडू लागला की शिळा जमिनीवर बाबून जातात. वारा घुघाट सुटतो, जणू काय जमीन फुटून गेली आहे. प्रसंग एकच, याचे काव्यातील वर्णनही एवढेसे पण तरीसुद्धा रामदासांच्या लेखणीत प्रतिमा उभी करण्याचे सामर्थ्य असल्याचा पुरावा त्यावरून मिळतो.

### लघुकृष्णचरित्र

या तीस ओव्यांच्या चरित्रात श्रीकृष्णजन्मानंतर कंसाच्या प्रतिज्ञेसाठी कृष्णाला मारायला निघालेल्या एका वीराची झालेली फजिती वर्णिलेली आहे. वास्तविक हे काही कृष्णचरित्र नव्हे, पण त्या वीराची जी फजिती झाली ती हरीची लीलाच होय अशा थाटात हे चरित्र गायिले गेले आहे.

## सृष्टिवर्णन

या साठ ओव्यांच्या काव्यात नदीतटाकाचे दृष्य वर्णिले आहे. नदीचे तीर किती मनोहर दिसत आहेत, नदीचे पाणीही निळे निळे आणि सुंदर दिसत आहे. (यमुनेचे पाणी निळे आहे.) या नदीत डोह तरी किती बनलेले आहेत. या डोहात अनेक प्रकारचे अनंत जीव संचार करीत आहेत. नदीचे वाहणे आणि तिचे खळाळणे याचे वर्णन रामदासांच्याच शब्दात पहिले पाहिजे.

कदंबाचे उंच उंच वृक्ष नदीतटावर वाढलेले आहेत. त्यांची प्रतिबिंबे नदीच्या जळात पडलेली आहेत. इतरही अनेक प्रकारचे वृक्ष आहेत. घनदाट अरण्यच वाढले आहे. फळे, फुले परोपरीची आहेत, असे हे वर्णन ओघात १६ व्या ओवीपर्यंत चालले आहे. नदीचा प्रवाह ज्याप्रमाणे वाहात जावा तसे नदीचे व नदीच्या काठचे वर्णनही संथ चालले आहे. कोठेही विक्षेप नाही. नंतर श्रीकृष्णाने वेणू वाजविला त्याचे वर्णन आहे. विशेषत: गवळणी मोहित झाल्या आहेत. त्या गवळणीचे वर्णनही रामदासांनी केले आहे.

## सुरंग रंग अंगना

रामदासांनी स्त्रियांच्या अंगोपांगाची, त्यांच्या वस्त्रप्रावरणांची वर्णने कोठेही केली नाहीत. पण या चरित्रात त्यांनी ही वर्णनेही केली आहेत आणि ती चांगली केली आहेत. संकोचाने ती वर्णने टाळली नाहीत. रामदासांच्या प्रतिभेला हा विषय वर्ज्य नाही हेच यामुळे दिसून येते.

या सर्व वर्णनाचा आशय असा की यमुनातटाचे कुंजवन अत्यंत सुशोभित होते. घनदाट छायेने व्याप्त होते. विभिन्न वृक्ष फुलाफळांनी डवरले होते, गोपी नटून थटून, सजून सवरून आल्या होत्या त्या वस्त्रालंकारांनी सुशोभित होत्या, त्यांच्या लांब वेण्या भूमीपर्यंत लोंबत होत्या, वाद्यांच्या मधुर आवाजात त्या गोल फेर धरून नृत्य करीत होत्या. तरुण आणि कामकलाकुशल असल्याने तेथे जणू काय वसंतच अवतरला आहे असे वाटत होते.

रामदासांची कवित्वशक्ती या लहानशा काव्यातही अत्यंत उत्कटपणे व्यक्त झाली आहे. ते स्वत: रंगून गेले आहेत आणि वाचकांनाही कृष्णचरित्रात डुंबवीत आहेत. उत्कृष्ट भावविलास, सुंदर शब्दयोजना, आकर्षक वर्णने आणि शृंगाराचे समुचित उत्कट वर्णन यांनी या काव्याला रामदासांच्या काव्यात एक आगळेच स्थान निर्माण करून दिले आहे. रामदासांच्या कवित्वाविषयी आणखी पुरावे पाहिजेतच काय?

## शिवराय व मंत्री यांस प्रासंगिक उपदेश

पांगारकरांच्या ग्रंथात हे पत्र शके १५७१ त म्हणजे इ.स. १६४९ मध्ये लिहिले असा उल्लेख आहे.[५] फाटक १६७२ नंतर केव्हा तरी लिहिल्याचे मानतात आणि याला आधार म्हणून दिलेली गौरवाची विशेषण निरर्थक ठरतात असे ते म्हणतात.[६]

यांतील एकच विशेषण वस्तुत: कालबाह्य आहे. आणि ते म्हणजे 'छत्रपती' हे. इ.स. १६७४ मध्ये राज्याभिषेक झाला आणि मग शिवाजी महाराज 'छत्रपती' झाले हे खरे. पण त्यामुळे बाकीची विशेषणे निरर्थक ठरू नयेत. छत्रपती झाल्याबरोबर सर्व विशेषणे सार्थ ठरावीत असा अचानक बदल शिवाजी महाराजांत झाला असे मानणे बरोबर होणार नाही. आता 'छत्रपती' हे विशेषणही कालबाह्य खरोखरीच मानावयाचे काय? शिवाजी महाराजांच्या अगदी

बालवयातील वागणुकीवरून, नंतर त्यांनी केलेल्या कार्यावरून, छत्रपती होण्याच्या त्यांच्या अंगच्या गुणावरून, त्यांना 'छत्रपती' म्हटले असणे शक्य आहे. नाहीतरी फाटक स्तुतिपाठकांचा आरोप रामदासांवर करतातच. एकीकडे रामदासांना ते अव्यवस्थित वृत्तीचे नव्हते असे गौरवायचे आणि लागलीच त्यांना दिलेल्या विशेषणावरून तोच अव्यवस्थितपणा त्यांना चिकटवायचा हे फक्त विधानासाठी विधान करावयाच्या वृत्तीचे द्योतक वाटते. फाटकांच्या मताप्रमाणे हे पत्र १६७२ नंतर नव्हे, १६७४ नंतर– छत्रपती झाल्यानंतर– लिहिले असले पाहिजे. मग 'तीर्थक्षेत्रे मोडिली' ब्राह्मणस्थाने भ्रष्ट झाली । सकळ पृथ्वी आंदोळली । धर्म गेला ।' अशी तक्रार समर्थांनी का करावी? कारण शिवाजी महाराजांनी हे कार्य राज्याभिषेकाच्या कितीतरी आधीच सुरू केले होते. या काव्याचे आपल्या मतानुसार का असेना निर्णायक मूल्यमापन केले असते तर बरे झाले असते.

ताप्तर्य, काव्य या दृष्टीने नव्हे, पण राजकारण आणि समर्थ यांचा संबंध दर्शविणारा हा एक पुरावा या दृष्टीने या प्रकरणाचे महत्त्व आहे. तथापि राजकारणाच्या दृष्टीने काढलेला हा निष्कर्ष या प्रबंधाच्या दृष्टीने अखेरचा नाही. कारण 'राजकारणाचा शोध' हे प्रबंधाचे प्रतिपाद्य नव्हे. हा निष्कर्ष आनुषंगिक आहे एवढेच येथे मानावयास पाहिजे.

## राजधर्म

वीस ओव्यांचे हे एक लहानसे काव्य आहे. पहिल्या ओवीत गणपती, सरस्वती, सद्गुरू, संत, कुलदेवता आणि दाशरथी रामचंद्र यांना वंदन केले आहे. आणि दुसऱ्या ओवीत श्रोत्यांना सांगितले आहे की मी जे बोललो आहे ते मानले तर घ्यावे, नाहीतर 'दाटूनि सांडावे' ही रामदासांची निराग्रही भूमिका आहे. राजधर्म हा आपण 'प्रपंचाकारणे' सांगितला आहे असे त्यांनी म्हटले आहे. *'प्रपंचाकारणे स्वभावें । बोलिलो मी ॥'*[७] शेवटच्या ओवीतही अशा प्रकारचा उल्लेख आहे.

*ऐसा प्रपंचाचा विवेक । स्वल्प बोलिलो काही एक । एका मनोगते स्वामी सेवक । असतां बरें ॥२०॥*[८]

आणि या प्रपंचाच्या बाबतीत तो सावधपणे केला तर माणसाला सुख लाभते असा विचार सांगणारी एक ओवी आहे. यावरून प्रपंच म्हणजेच राजधर्म असा समन्वयात्मक अर्थ लावायचा आहे असे होईल. परंतु प्रपंच ४ ते १९ पर्यंतच्या ओव्या लक्षात घेतल्यास प्रपंच असे ज्याला आपण व्यवहारात म्हणतो त्याहून राजकारण-राजधर्म-वेगळा असल्याबद्दलची खात्री पटते. आणि म्हणून हा राजधर्माचा उपदेश सामान्य प्रापंचिक माणसाकरिता नसून राजकारणी पुरुषासाठीच आहे, मग तो शिवाजीला सांगितलेला असो, अथवा संभाजीला सांगितलेला असो.

या काव्यात एकच अलंकार आहे आणि तो म्हणजे दृष्टान्त. मोहरा अभिमानाला पेटला– इरेला पडला तर तो स्वप्राणाचीही क्षिती न बाळगता पडतो. हा विचार पटविण्यासाठी एक दृष्टान्त दिलेला आहे.–

*देखोनि व्याघ्राचा चपेटा । मेंढरे पळती बारी वाटा । मस्त जो तो रेडा मोठा । काय करावा ॥*[९]

या लहानशा काव्यात समर्थांचे व्यक्तित्व प्रभावीपणे व्यक्त झाले आहे. समर्थांना अन्याय खपत नाही, दुबळेपणा आवडत नाही, भोंगळपणा त्यांना पसंत नाही. ते चतुर होते, धोरणी

होते, राजनीतिशास्त्रनिपुण होते, निरपेक्ष काम करणारे होते, स्पष्टवक्ते होते. अत्यंत प्रयत्नशील होते हे या काव्यावरून स्पष्टपणे दिसून येते.

## क्षात्रधर्म

हे प्रकरण प्रासंगिक आहे. श्री पांगारकरांनी याचा समावेश प्रासंगिक उपदेशातच केला आहे. हा क्षात्रधर्म संभाजीला सांगितला असावा. न. र. फाटक म्हणतात त्याप्रमाणे 'राजधर्मक्षात्रधर्माचा निर्देश असल्याने ती सारी पत्रे संभाजीकरिता लिहिलेली असे तात्पर्य स्वीकारण्याला अडचण नाही.[१०]

**क्षात्रधर्माचा सारांश–** या प्रकरणाच्याही वीस ओव्या आहेत. पहिल्याच ओवीत असा उल्लेख आहे की *'अल्पस्वल्प संसार धर्म । मागां बोलिलो राजधर्म ।'*[११] यावरून मागे 'राजधर्म' सांगितला तो संसारधर्म– प्रपंचधर्म– तोच राजधर्म. याचा अर्थ असा की राजधर्म हा प्रपंचधर्मात सामील आहेच. केवळ प्रपंच समर्थांनाही अभिप्रेत नव्हता, तर राजकारणासहित प्रपंचधर्म अपेक्षित होता. *मुख्य हरिकथा निरूपण । दुसरे राजकारण । तिसरे ते सावधपण । सर्वविषयी ॥*[१२] यातही राजकारणाला महत्त्व दिले आहेच. राजकारण व क्षत्रियधर्म यांचा अन्योन्यसंबंध असावा हे स्पष्टच आहे. 'ज्याला जिवाचे भय वाटते त्याने क्षात्रधर्म करू नये. काही तरी उपायांनी पोट भरावे. रणांगणातून विन्मुख येऊ नये हाच परम क्षात्रधर्म होय. मारितामारिता मरावे. नजर करारी राखावी, कार्य पाहून अशी खत्तल करावी की रणशूरांची अंत:करणे चकित होऊन जातील. मर्दे तकवा सोडू नये । म्हणजे प्राप्त होतो जय । कार्य प्रसंग समय । ओळखावा । देवांचा उच्छेद केला तर आपला स्वधर्म बुडविला असे समजावे. मराठा तितुका मेळवावा, आपुला महाराष्ट्र धर्म वाढवावा, देवद्रोही कुत्रे मारुन परते घालावे, देव मस्तकी धरावा, अवघा हलकल्लोळ करावा.' असा या प्रकरणातील उपदेश आहे.

या प्रकरणातील रामदासांचा आवेश लक्षणीय आहे. हे क्षत्रियांना क्षात्र धर्माचा उपदेश करीत आहेत तो एका विशिष्ट संतापातून– चिडीतून असा त्यांचा आवेश अगदी पहिल्याच ओवीत दिसून येतो. ज्यांना स्वत:च्या जिवाचे भय वाटत असेल त्याने काही तरी करून पोट भरण्याच्या कामाला लागावे. क्षात्रधर्माच्या मागे लागू नये. अशी खडखडीत ताकीद दिली आहे. मराठा तितुका मेळवावा, युद्ध करावे खणखणाटे सीमा सांडूनी, देवद्रोही तितुके कुत्ते मारून घालावे परते, अवघा हलकल्लोळ करावा अशासारख्या उत्साहवर्धक शब्दांनी हा आवेश प्रकट झाला आहे.

रामदास तुळजाभवानीला प्रार्थना करीत आहेत की या सर्व क्षत्रियांमध्ये खरे क्षात्रतेज निर्माण होवो.

*अहो हे तुळजाभवानी । प्रसिद्ध रामवरदायिनी । रामदास ध्यातो मनी । यन्निमित्त ॥*[१३]

यातील यन्निमित्त हा शब्द महत्त्वाचा आहे. कशासाठी ही प्रार्थना? तर क्षत्रियात क्षात्रतेज निर्माण व्हावे यानिमित्त. यावरून रामदासांच्या मनातील इच्छा काय होती हे स्पष्ट होते. क्षात्रतेजाच्या या प्रार्थनेचे बीज टाकळीतील तपश्चर्येत आहे. रामदासांच्या तीर्थयात्रेत आहे. जगदोद्धाराच्या त्यांच्या इच्छेत आहे. म्लेच्छांचा संहार हेच ते त्यांचे स्वप्न. म्लेंच्छ हेच या प्रकरणातील शत्रू हे काव्यही रामदासांच्या जीवनानुभवातून निर्माण झाले हे स्पष्ट होते.

**सेवक धर्म :** सेवक धर्म हा समर्थांनी दोन समासांत सांगितला आहे. प्रपंचविचारातच हे

दोन समास अंतर्भूत केले गेले आहेत. राजधर्म, क्षात्रधर्म आणि सेवकधर्म असा मिळून प्रपंचविचार होतो असे दिसते. राजधर्मात 'प्रपंचाकारणे स्वभावे' बोलल्याचा उल्लेख आहे, तर 'अल्पस्वल्प संसारधर्म' बोलत असल्याचा क्षात्रधर्मात उल्लेख आहे. आणि सेवकधर्माच्या पहिल्या समासात 'ऐसा प्रपंच विचार' असे पुन: म्हटले आहे. यावरून असे दिसते की प्रपंच म्हणजे व्यक्तिगत संसार आणि राजकारण. 'आपले हित आपण करावे आणि त्यासाठी श्रेष्ठांचे मनोगत राखावे. उगीच वल्गना करू नये, उगाच गर्व करू नये. वडिलांना बुद्धी शिकवू नये, आपण शहाणे आहोत असे जरी कळून आले तरी हे मनीचे मनी समजावे. प्रकट कशाला करावे. समर्थांचे मनोगत असेल ते जाणून तैसेचि वर्तणे उचित. वैऱ्याकडे सख्य लावणारा सेवक, समर्थांचे काम बुडविणारा सेवक इ. फितूर सेवकाची लक्षणे दुसऱ्या समासात सांगितली आहेत. वैऱ्याचे हित साधणारा, आज्ञा मानावी लागली की चित्ताला दु:ख वाटणारा, काम सांगितले की काही तरी निमित्त काढून काम चुकविणारा, आपल्याशिवाय काम चालत नाही असे समजणारा व तसे बोलणारा असे जर सेवक असतील तर काम नसले तरी चालेल, पण अशा सेवकाच्या आधीन कधी होऊ नये. एका समासात चांगल्या सेवकाचा धर्म सांगितला, तर दुसऱ्यात वाईट सेवकाची लक्षणे सांगून त्याला टाळावे असे सांगितले आहे.

**सावधता :** या १२ ओव्यांचे महत्त्व विशेष आहे. शिवरायाला केलेला हा उपदेश अत्यंत मोलाचा आहे. हा उपदेश शिवाजीला नसून संभाजीला आहे असे म्हणतात. शिवाजी आणि संभाजी यांपैकी कोणाला तरी एकाला हा उपदेश केला आहे हे खरे. 'जेथे बहु विचार । तेथे ईश्वर अवतार' हा विचार संभाजीला उद्देशून निश्चितच नव्हे असे वाटते. कोणाचा भरवसा न धरावा, आपला आपण विचार पहावा, देह दु:खे दसरी नये, उदंडची उपाय करावे, एकांती चाळणा करावी, नाना विचारणा करावी, अरि मित्रांची प्रयत्नी चुको नये, सुखवासी कामा नये, मुख्य प्रसंग चुको नये, कार्यकर्ते दुरी करावे, प्रसंगे सवेंचि हाती धरावे, परंतु शोधोनि पाहावे कपटाविषयी, पाहिलेचि पाहावे । केलेंचि करावे । शोधिलेचि शोधावे । राज्यकारण । इशारतीचे बोलता नये, बोलायाचे लिहू नये, लिहायाचे सांगू नये, जबानीने. असा हा मुत्सद्देगिरीचा, सावधानतेचा राजकारणाचा उपदेश केला आहे. अफजलखानास प्रतापगडी मारून यशस्वी होऊन आल्यावर शिवारायांचा गौरव केला त्या वेळचा समासात एकूण २२ ओव्या आहेत. याचे नाव 'उत्तम पुरुष निरूपण' असे आहे. अफजलखानाला मारून यशस्वी होऊन परत आल्यानंतर समर्थांनी हा गौरवपर उपदेश शिवाजीला केला असे बखरीत म्हटले आहे.[१४]

**उत्तमपुरुष लक्षणे :** सर्व कर्ता करविता ईश्वर आहे. त्याने ज्याचा अंगीकार केला त्या पुरुषाचा विचारच वेगळा, न्याय, नीती, विचार, विवेक हे सर्व ईश्वराचे देणे आहे. त्याचप्रमाणे सावधपणे महायत्न करणे, समयी धारिष्ट धरणे, अद्भुत कार्य करणे हेही ईश्वराचे देणे होय. यशकीर्ती, प्रताप, अमर्याद उत्तम गुण, देव, ब्राह्मण, आचार, विचार, कित्येक जनांसी आधार, सदा घडे परोपकार, इहलोक-परलोकाचा विचार, सावधपणे राहणे, पुष्कळ लोकांचे सहनही करणे, देवाचा कैपक्ष घेणे, ब्राह्मणाची चिंता वाहाणे, बहुजनांसी पाळणे हे सर्व ईश्वराचे देणे होय. या सर्वात 'तजविजा विवेक विचार जेणे पाविजे पैलपार अरत्रपरत्रीचा' हे गुण महत्त्वाचे आहेत. अशी ही लक्षणे उपदेश रूपाने व लक्षण रूपाने सांगितली आहेत.

**धूर्तपणाचे राजकारण :** या समासाचे नाव 'राजकारण निरूपण' असे आहे. आणि यात राजकारणाचा उपदेश आहे. हाही समास कोणाला तरी उपदेश म्हणून सांगितला असला

पाहिजे. कोणाला सांगितला आहे हे कळत नाही. राजकारण याचा अर्थ न. र. फाटक म्हणतात त्याप्रमाणे चातुर्य असा केल्यास काही ओव्यांचा अर्थ लागत नाही. राजकारण, राज्यकारण, समुदायकारण असा केला तर तो लागतो. या प्रकरणाचा सारांश पाहाताना काही ओव्यांचा अर्थ पाहिला की त्यात राजकारण आहे की नाही हे लक्षात येते.

## सारकथन

ज्ञानी, उदास, पण समुदायाचा हव्यास असणाऱ्याने अखंड एकांत सेवावा. एकांताचे अनेक फायदे आहेत. तजवीजा कळतात. चाळणा निघतात, प्राणिमात्रांची स्थिती– गती कळते. अखंड राहिले तर सलगी होते आणि अतिपरिचयाने अवज्ञा घडते म्हणून एके ठिकाणी राहू नये– विश्रांती घेऊ नये. चोरालाच जामदारखान्यावर नेमावे, त्याच्या हातून चुका झाल्याच तर सांभाळून घ्यावे. नष्टासाठी नष्टांची योजना करावी, वाचाळासी वाचाळ आणावे. दुसऱ्यावर विश्वासून राहू नये. तसे केल्यास त्याचा कार्यभाग बुडतो. कोणतेही काम केले की होते, केले नाही की मागे पडते म्हणून ढिलेपण असू नये.

दुर्जनांनी राजकारण दाटून गेले आहे असे करू नये. गावकाचे तंटे-बखेडे यांची बिंगे शोधून त्यात आपण शिरावे आणि त्यातील पक्षोपक्षांचे तंटे पार नाहीसे करावेत.

*ही धूर्तपणाची कामें । राजकारण करावे तेणे । ढिलेपणाच्या संभ्रमें । जाऊ नये ॥* असा हा सारांश आहे.

## चातुर्य आणि राजकारण

या समासात राजकारण आहे की चातुर्य आहे याचा विचार करणे आवश्यक आहे. वादात न पडता समासाचा विषय नक्की कोणता आहे हे निश्चित करणे आवश्यक वाटते.

या संदर्भातील प्रा. गं. बा. सरदारांचे म्हणणे विचारात घेण्यासारखे आहे.

"समर्थ रामदास साधारणपणे तुकोबारायांचे समकालीन. त्यांच्याप्रमाणे यांचीही संतमालिकेत गणना. पण वृत्ती, कृती आणि वाणी ह्या सर्व बाबतीत ह्यांचे निराळेपण भासमान होते. या निराळेपणावरच अतिरिक्त भर देऊन एकाच्या अभिमानाने दुसऱ्याची अवहेलना करणारे टीकाकारांचे संप्रदाय मराठीत निर्माण झाले आहेत याच्याउलट 'ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम व रामदास या चारही महापुरुषांच्या तत्त्वज्ञानात, आत्मबोधात, ज्ञानोत्तर भक्तीत व लोकसंग्राहक बुद्धीत अगदी एकपणा आहे. बिलकूल भेद नाही' असे म्हणणारे पांगारकरांसारखे एकांगी विवेचकही झालेले आहेत.[१५]

रामदासांचे दोनचार ठिकाणचे उद्गार वगळले तर बाकीची त्यांची सर्व शिकवण वर्ण-जातिनिरपेक्षच आहे, त्यातील उपदेश त्रिकालाबाधित आहे. परमार्थाबरोबरच व्यवहारधर्माचे अत्यंत मार्मिक निरूपण त्यात आहे. प्रपंच आणि परमार्थ दोन्ही उत्तम रीतीने करण्यास लागणाऱ्या विवेक, वैराग्य, निःस्पृहपण, चातुर्य, अखंडचाळणा आणि प्रयत्न इ. गुणांचे प्रांजळ, उत्कट आणि हृदयवेधक विवरण समर्थ रामदासांच्या दासबोधात आहे. जीवनाचे उदात्तीकरण करण्याची किमया त्यांच्या वाणीत आहे. या महापुरुषाच्या दृष्टीच्या टप्प्याला, बुद्धीच्या झेपेला मर्यादा नव्हती.

*धावून अकलेचा पवाड । व्हावें ब्रह्मांडाहून जाड । तेथे कैचे आणले द्वाड । करंटेपण ॥*

....परमार्थाबरोबरच परमार्थाचे अंग म्हणून प्रपंचही यशस्वी केला पाहिजे असे आवर्जून सांगणारा आणि तो यशस्वी कसा करावा हे विवरून सांगणारा रामदास हा एकटाच संत होऊन गेला.

## संभाजीस पत्र

एकवीस ओव्यांच्या या पत्राबद्दल वाद नाही. संभाजीलाच उद्देशून हे पत्र लिहिले आहे, याबद्दलच्या शंकेला जागाच नाही. शिवरायाचे आठवावे रूप'......इ. ओव्या स्पष्टार्थक आहेत म्हणून वादंगाला जागा नाही. अखंड सावधान असावे, एकांतस्थळी तजविजा करीत बसावे, काही सौम्यता धरावी, काही उग्रस्थिती सांडावी, श्रेष्ठांनी जे जे मिळविले असेल त्यासाठी भांडत बसू नये, नाहीतर शत्रूला फावते, सकळ लोक एक करावे, गलीम निपटून काढावे, समय प्रसंग ओळखावा । राग निपटून काढावा । आला तरी कळो न द्यावा । जनामध्ये ।। सलगी देऊन लोकांना सेवक करावे, लोकांच्या मनी धाक उपजो देऊ नये. कष्ट करून घसरावे म्लेच्छांवरी, महाराष्ट्र राज्य करावे जिकडे तिकडे. इतके सांगितल्यावर शिवाजीच्या गुणांची आठवण करून दिली आहे.

भाषाशैली, सडेतोडपणा, शिवाजीबद्दलचे वात्सल्ययुक्त प्रेम, निर्भीडपणे राज्याच्या हिताला पोषक असा उपदेश प्राणाचीही पर्वा न करता करण्याची समर्थांच्यासारखी अधिकारी व्यक्ती या दृष्टीने हे प्रकरण महत्त्वाचे आहे.

## प्रासंगिक कविता

**भूत :** (समर्थ घर सोडून गेले ते शके १५६६ व जांबेस मातोश्रीस व बंधूस भेटावयास आले, तेव्हा 'बाळा तुला कोणते भूत लागले रे' असे आईने विचारले त्यास उत्तर)

ह्या पदात श्रीरामचंद्रांच्या कर्तृत्वाचे गुणगान केले आहे. आपल्याला लागलेले भूत दुसरे-तिसरे कोणतेही नसून 'श्रीरामचंद्र' हेच ते भूत होय असे स्पष्ट शब्दात सांगितले आहे. शेवटी 'सर्व भूतांचे हृदय । नाम त्याचे रामराम । रामदास नित्य भाव । तेंचि भूत जे माया' असे म्हटले आहे.[१६] श्रीराम हा परमेश्वराचा अवतार असल्याबद्दल पहिल्याच कडव्यात सूचित केले आहे.

*होतें वैकुंठीचे कोनी । शिरले अयोध्या भुवनी । लागे कौसल्येचे स्तनी । तेंचि भूत गे माय ।*[१७]

आणि सर्व पदांत ताटिकावध, अहल्योद्धार, शिवधनुर्भंग, वैदेही पाणिग्रहण, पित्याची आज्ञा म्हणून वनवासगमन, सुग्रीवाचे पालन, वालीचे निर्दालन, पाण्यावर पाषाण तारले ते सेतुबंधन, रावण-हनन, बिभीषण-रक्षण, देवांचे बंधमोचन इतके रामायण या पदात रामाचे कर्तृत्वकथन या दृष्टीने आले आहे. या कथनातून श्रीसमर्थांची उत्कट रामभक्ती दिसून येते.

**आत्मचरित्र :** ह्या आत्मचरित्रात समर्थांनी प्रथमतः आपली गुरुपरंपरा सांगितली आहे ती अशी–

अधिष्ठाता विष्णू– ब्रह्मदेव - नारद - वसिष्ठ - रामचंद्र - महारुद्र - हनुमंत तोच वातपुत्र रामदास गोदावरी अवतरे अशी परंपरा सांगितली यात केवळ गुरुपरंपरा नाही, तर हनुमंताचे अवतार असल्याचाही स्पष्ट उल्लेख आहे. या आत्मचरित्रात निःसंदिग्धपणे केलेला साक्षात्काराचा उल्लेख श्रीसमर्थांची बालपणापासूनची योग्यताच सिद्ध करतो. या दृष्टीने ही कविता महत्त्वाची

आहे. असे व्यक्तिमत्त्व लाभल्यामुळे त्यांच्या हातून जी अलौकिक कार्ये झाली त्याबद्दल लोकांना शंका वाटणे स्वाभाविक असले तरी त्यांच्या कर्तृत्वाबद्दल खात्री वाटू लागते.

**डफगाणे :** चाफळच्या रामजन्मोत्सव व त्याप्रसंगी निघालेली रथयात्रा यांचे या डफगाण्यात वर्णन आहे. श्रीराममंदिर स्वत:च्या हिमतीचे बांधले आणि उत्सवही स्वत: कोणाची मदत न घेता केवळ भिक्षेवर केला त्याचा केवढा मोठा अभिमान आणि आनंद रामदासांना झाला असेल आणि त्या आनंदाच्या भराला हे रथयात्रा वर्णन त्यांनी लिहिले असावे. चाफळच्या मंदिराचे वर्णन बराच तपशील दर्शविणारे आहे.

**पंढरीहून मातोश्रीस पत्र :** ह्या पत्रावरून रामदासांची मातृभक्ती उत्कट असल्याचे सिद्ध होते. रामदासांच्या व्यक्तिमत्त्वाला शोभणारी ही श्रेष्ठ भक्तिभावना रामदासांच्या कविहृदयाची साक्ष पटविते. माता ही प्रत्येकाला आदरणीय असते, तथापि ही आदराची भावना ज्या उत्कटतेने प्रकट होते तीवरून अंत:करणाचे दर्शन अधिक जवळून आणि स्पष्टपणे होते. ज्या मातेची इच्छा विवाहाच्या बाबतीत समर्थांनी मानली नाही त्या मातेबद्दलची ही भावना समर्थांचे मोठेपण सिद्ध करते. आपणाला जे यश लाभले, निर्गुणाची जी सिद्धी प्राप्त झाली ती केवळ तुझ्यामुळे ही कृतज्ञता रामदासांनी व्यक्त केली आहे. 'आई । तू भवसिंधूचे तारू आहेस, तू भक्तांचा आधार आहेस, तू भावार्थांची जननी आहेस, विरक्तांची संजीवनी आणि परमार्थाची खाण आहेस, सर्व सुखांची तू मूसच आहेस, संसाराचे सारे सायास तुझ्यामुळेच चुकतात. तू परमार्थात अग्रगण्य आहेसच, पण माझ्यासारख्यांचे मंडण-भूषण आहेस.

या पत्रात काव्य ओथंबलेले आहे. पत्र लिहीत असताना समर्थांच्या नेत्रांत अश्रू निश्चितच गोळा झालेले असणार. शके १५४२ पासून शके १५६६ पर्यंत चोवीस वर्षांचा काळ लोटला आहे. आता मातोश्रींच्या भेटीस जावयाचे आहे. तिला एकदम भेटल्यास तो सुखाचा अतिरेक तिला सहन होऊ शकणार नाही म्हणून आपण सुखरूप असल्याची बातमी देणारे हे पत्र. किती दूरचे धोरण समर्थांनी राखले आहे आणि अशा वेळी मातेची मूर्ती कृतज्ञतेच्या दृष्टीने त्यांना पाहिलेली असणार म्हणून हे असे काव्यरसाने ओथंबलेले पत्र ते लिहू शकले. जातिवंत कवी असेच त्यांचे नामाभिधान केले पाहिजे. याशिवाय 'भवसिंधूचे तारू', 'वैष्णवी माया', 'परमार्थांची खाणी' इ. रूपकांचा स्वाभाविक ओघ या काव्यात वाहात आहे, हे वेगळेच. बाह्यांग अलंकारांनी नटलेले व अंतरंग रसाने ओथंबलेले असे हे काव्यमय पत्र आहे.

**पंढरीहून श्रेष्ठांना पत्र :** जी गोष्ट आईला लिहिलेल्या पत्राची तीच बंधूंना लिहिलेल्या पत्राची. याही पत्रात आदराच्या भावनेची पराकाष्ठा झाली आहे.

*झंझावायूसि आकलावे । गगन ओलांडूनि जावे । महातेजासि आच्छादावे । कवणे घरी ।।७।। सप्तपाताळां तळवटां । एकवीस स्वर्गाचे शेवटां । पवाहा करीत ऐशा पोटां । हांव कैचा ।। वसुंधरा ही एकसरी । घालोनिया मस्तकावरी । अंतरिक्ष गमन करी । ऐसा कवण असे । आवर्णोदकाचा अंत । कैसा घ्यावा तो अद्भुत । तुमचे स्वरूपाचा निश्चितार्थ । कवण करी* [१८] *।।१०।।*

असे श्रेष्ठांचे व्यक्तित्व असल्याने आपण त्याचे योग्य वर्णनही करू शकत नसल्याची नम्रता रामदासांनी या पत्रात व्यक्त केली आहे. या काव्यात दृष्टांताची रेलचेल असूनही प्रमुख भाव सादर प्रेमाचा आहे हे सहजपणे दिसून येते. रामदास कितीही मोठे झालेले असले, स्वयं ब्रह्माच्या अवस्थेपर्यंत पोचलेले असले तरी श्रेष्ठांच्या बद्दलचा आदरभाव आणि त्यांना संबोधताना

नम्रता यांचा त्याग त्यांनी केला नाही. हे त्यांचे थोर अंत:करण । काव्यरसाने हे पत्रही भरलेले आहे.

**बागप्रकरण :** परळीवर मठ स्थापन केला त्या वेळी तेथे कसली झाडे लावावीत याची यादी त्यांनी सांगितली आहे. ही फक्त यादी आहे. पण तीवरून त्यांना किती झाडांची माहिती होती हे दिसून येते. समर्थ अत्यंत जागरूकपणे साऱ्या सृष्टीचे निरीक्षण करीत होते हे यावरून सिद्ध होते. त्यांच्या व्यक्तिमत्त्वात भर टाकणारी ही माहिती आहे. अठराभार वनस्पतींची नावे किती म्हणोनी सांगावी असे त्यांनी स्वत:ला आवरले आहेच. म्हणजे याहीपेक्षा अधिक नावे त्यांना माहीत होती असे दिसते. दोनशे ब्याणव झाडे-भाजीपाला-फुलझाडे, फळझाडे मिळून त्यांनी नावनिशीवार यादी दिली आहे. सूक्ष्म निरीक्षण, सर्व माहिती मिळविण्याची हौस आणि हाव आणि ते ज्ञान सर्वांना देण्याची उत्सुकता या सर्व भावनांचा प्रत्यय केवळ या बागप्रकरणावरून येतो.

**कारखाने प्रकरण :** सामानगडावर किल्ला बांधण्याचे काम चालले होते. तेथे सांगितलेले हे प्रकरण आहे. याचे दोन समास आहेत. दुसऱ्यात इमारतीच्या बांधकामासाठी लागणाऱ्या वस्तूंची यादी सांगितलेली आहे. हत्यारे, विटा, चुना, सलाबर इ. विविध प्रकारच्या सामानाची बारीकसारीक तपशीलवार यादी केली आहे. काही विसरलेले दिसत नाही. पारपत्य खबरदारी, गवंडी, पाथरवट, लोणारी, बेलदार, कोळी, लोहार, सुतार, कुंभार सर्वांची यादी केली आहे. काय काय बांधावे या यादीत नाटकशाळा, चित्रशाळा, पाठशाळा, धर्मशाळा, ओटे, चौथरे अशी सर्व तपशिलाने यादी केली आहे.

**उद्धवगोसावी यांना पत्र :** टाकळीचा मठ उद्धवावर सोपवून रामदास जे तीर्थयात्रेला गेले ते बारा वर्षेपर्यंत तीर्थयात्राच करीत राहिले आणि जवळ येऊनही टाकळीला आले नाहीत तेव्हा उद्धवाने त्यांना भेटीसाठी येण्यास पत्र लिहिले. त्याला पाठविलेले हे उत्तर आहे. नंतर ते टाकळीला उद्धवास भेटले. पण पत्रात त्यांनी आत्मोपदेशच केला आहे. आपण सर्व वस्तुरूप (आत्मरूप) आहोत, तेव्हा आपण वेगळे नाही. आत्मारामातच स्वत:ला पाहा. आपणावेगळे ज्ञान नाही. सद्गुरूला शरण जा म्हणजे आपणास कळते की, त्यासी आपपर नाही इत्यादी. या पत्रात शिष्याला उपदेश केला आहे. कारण त्याची पारमार्थिक तयारी झाली पाहिजे. एवढाच हेतू दिसून येतो. हे एक छोटेसे अध्यात्म प्रकरणच आहे.

**ब्रह्मपिसा :** शिष्यांची निष्ठा कसून पाहावी या हेतूने तलवार घेऊन शिष्यमंडळीवर स्वामी धावले त्या प्रसंगी केलेले पद. यात रूपकाने तत्त्वज्ञान आले आहे.

**शाहीरांस प्रश्न :** एकदा समर्थ परळीहून चाफळास येण्याकरिता निघाले. वाटेत पालीस आले. तेथे पौषमासी जत्रा भरली होती. त्यात नागेशवाले व हरिदासवाले शाहीर यांचा फड पडून एकमेकांवर चढ करीत बसले होते. तेथे समर्थ येताच ते सर्व उठून साष्टांग नमस्कार व दंडवत करून उभे राहिले. त्यांनी विनंती केली की, आम्ही दोन पक्षांचे शाहीर आहोत. एकमेकावर चढ टाकून एकमेकांची परीक्षा घेत आहोत. हे ऐकून आम्ही तुम्हा दोघांवर चढ टाकतो, त्याचे दोघेही मिळून उत्तर द्या असे म्हणून समर्थांनी हे डफगाणे केले आहे.

**श्रेष्ठांच्या मुलांना उपदेश–** श्रेष्ठ वारले तेव्हा त्यांच्या दोघा मुलांना समर्थांनी उपदेश केला ते दहा श्लोक केवळ उपदेश म्हणूनच असल्याने त्यात काव्यात्मकता शोधणे व्यर्थ आहे. तथापि समर्थांचे त्या मुलांवरील प्रेम या श्लोकात व्यक्त होते. बरे सत्य बोला, यथातथ्य चाला,

धरा बुद्धि पोटी विवेके, सदासर्वदा यत्न सोडू नये, दिसामाजि काहीतरी ते लिहावे, प्रसंगी अखंडीत वाचीत जावे, गुणश्रेष्ठांचे उपास्य करावे, समस्तांसी भांडेल तो करंटा, न्याय सांडू नये, प्रचीतीविणे बोलणे व्यर्थ, बरागुण आधी धरावा, भला रे भला बोलता ते करावे, बहुता जनांचे मुखे यश घ्यावे, परी शेवटी सर्व सोडुनि द्यावे, मरावे परि कीर्तिरूपे उरावे असे हे त्या उपदेशाचे सार आहे. या सर्व प्रकरणात प्रासंगिकतेमुळे जेवढे काव्य निर्माण होणे शक्य होते तेवढ्याचीच अपेक्षा करणे उचित होईल.



# ९. रामदासांचा प्रमुख ग्रंथ : दासबोध

## दासबोध अभ्यासाचा परामर्श :

पहिल्या प्रकरणात रामदासांच्या वाङ्मयाच्या अभ्यासाचा थोडक्यात परिचय करून देण्यात आलेला आहेच. परंतु दासबोध हा समर्थांचा सर्वात महत्त्वाचा ग्रंथ असल्याने त्यांच्या आजपर्यंतच्या झालेल्या अभ्यासाचा थोड्या अधिक विस्तृत स्वरूपात परिचय करून देणे आवश्यक आहे. मासिके अथवा वृत्तपत्रे यातून लेखरूपाने तो अभ्यास झालेला आहे. श्री. शं. श्री. देव यांचा 'समर्थ हृदय' ग्रंथ यांत दशकानुसार विषयांचा सारांश दिला आहे. श्री. न. र. फाटक यांचा 'रामदास : वाङ्मय आणि कार्य' या प्रकरणात दासबोधाच्या प्रत्येक दशकाचा सारांश सांगितला आहे. याच ग्रंथाच्या 'प्रदक्षिणा' या प्रकरणात दासबोधाच्या रचनेच्या काळासंबंधी चर्चा केली आहे.

## रचनाकाळ :

दासबोध केव्हा रचला गेला असावा त्याविषयी निश्चित मत देणे कठीण आहे. यासंबंधी स्पष्ट असा आधार कोठेच मिळत नाही. फक्त एका ठिकाणी काळाचा उल्लेख आहे–

*चारि सहस्र सातसे साठी । इतुकी कलियुगाची राहाटी । उरल्या कलियुगाची गोष्टी । ऐसी असे ॥*

## प्रमुख विषय :

पहिल्या दशकाच्या पहिल्या समासात प्रस्तावना रूपाने व ग्रंथात कोणत्या विषयांची चर्चा आली आहे व ग्रंथवाचनाची फलश्रुती यांचा निर्देश आहे. नवविधा भक्ती (विशद भक्तिमार्ग), वैराग्याचे लक्षण, अध्यात्म निरूपण, शुद्ध ज्ञान, आत्मस्थिती, सायुज्यमुक्ती (मोक्ष), विदेहस्थिती, अलिप्तपण, देव, भक्त, जीव, शिव, ब्रह्म, मायोद्भव, उपासना, कवित्वलक्षण, चातुर्यलक्षण, पंचभूते, कर्ता कोण, इ. संबंधी निश्चयात्मक ज्ञान सांगितले आहे. त्याशिवाय नाना आशंकांचे निरसन केले गेले आहे. हे सर्व नाना ग्रंथांच्या आधारे सांगितले आहेच पण त्याहीपेक्षा आत्मप्रचीतीने सांगितले आहे.[२]

ब्रह्माची प्राप्ती, त्याच्याशी एकरूप होऊन जाणे, हे जीवनाचे अंतिम ध्येय असे रामदासांनी मानले आहे. ते स्वत: ब्रह्मरूपी विलीन झाले ही गोष्ट त्यांच्या अनेक उद्गारांवरून सिद्ध होते.

माया सगुण, साकार, पंचभूतांचा विस्तार म्हणजे माया, ही क्षणभंगुर आहे. माया ही सृष्टीची रचना, माया ही आपली कल्पना, माया ही तोडिता तुटेना ज्ञानेविण ब्रह्मापासून मूळमाया झाली. तिलाच अष्टधा प्रकृती असे म्हणतात. ही मूळमाया वायोस्वरूप आहे. वायूमध्ये जाणिवेचे रूप. पंचमहाभूतांपासून चत्वार देहांची उत्पत्ती, सर्व प्राणिमात्रांची उत्पत्ती झाली. हा सर्व मायेचा पसारा होय. हे दृश्य जगत जरी सत्य भासले तरी ते भासमानच आहे.

कारण माया ही मुळातच मिथ्या आहे आणि म्हणूनच 'ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या, जीवो ब्रह्मैव नापर: ।' या मायेच्या स्वरूपाचा ज्ञानाने निरास केला की ब्रह्मप्राप्ती. मायेनंतर काळाची माहिती येणे अपरिहार्य आहे. याचप्रमाणे तनु चतुष्टय, त्रिगुण, वैराग्य, भक्ती (नवविधा) इत्यादी विषयांचे दासबोधात पुन:पुन: विस्तारपूर्वक विवेचन आलेले आहे.

जगाच्या उत्पत्तीचे मूळ कारण ब्रह्म आहे. ब्रह्माला स्फुरण झाले की, 'एकोऽहं बहुस्याम्' आणि त्या स्फुरणाने मायोद्भव झाला– मूळ माया ही 'पंचभूतिक' आहे. पंचभूतांच्या कर्दमाने जडसृष्टी निर्माण झाली. तीतूनच जीवसृष्टी निर्माण झाली. जीव चौऱ्यांशी लक्ष जीवयोनीतून फिरून आला की नरदेह प्राप्त होतो.

नरदेहाचे महत्त्व फार आहे. कारण या नरदेहामुळेच ब्रह्मापर्यंत पोचता येते, साधना करता येते. गर्भवास चुकविता येतो. प्रपंचात गुरफटलेला जीव त्यातच आनंद मानतो. त्याचे परमार्थाकडे लक्ष जात नाही. इथल्या सुखदु:खात तो दंग होऊन जातो असा मनुष्य बद्ध होय. परंतु संसारात गुरफटल्याचा ज्याला खेद होतो, प्रपंची उदास होतो, पस्तावतो तो मुमुक्षू होय. आणि त्यामुळे नानाप्रकारची साधने करतो, तीर्थयात्रा करतो, नाना ग्रंथांतरे पाहातो तो मुमुक्षू. स्वत:चे अवगुण दिवसेंदिवस त्यागणारा, आत्मगुणांचा अभ्यास करणारा, स्वरूपी निजध्यास लावणारा साधक होय.[३] षड्रिपुंपासून दूर राहणारा, प्रपंचापासून निसटणारा, अहंकाराला पाडून टाकणारा, तो साधक. सिद्धाची लक्षणे अशी आहेत : संदेह गेला आहे, प्रपंचाचा मोह राहिला नाही, साधना-उपासना अखंड चालली आहे, नित्य अनुसंधान आहे, देहाचाही मोह राहिलेला नाही, परंतु व्यवहार मात्र सोडलेला नाही. तो सिद्ध पुरुष, मुक्त सुद्धा हाच. जगात जीव केवळ बद्ध, मुमुक्षू इ. असतो, नाहीतर माणसे मूर्खही असतात. पढतमूर्खही असतात. त्यांची लक्षणे सांगितल्यावर उत्तमपुरुषाची लक्षणेही त्यांनी सांगितलेली आहेत. बद्धापासून सिद्धापर्यंतचा विकास साधण्यासाठी किंवा मूर्खापासून उत्तम पुरुषापर्यंत सुधारण्यासाठी नाना तऱ्हेचे उपाय दासबोधात सांगितलेले आहेत. नवविधा भक्ती, वैराग्य, विवेक-वैराग्य, आत्मानात्म-विवेक, नित्य अनुसंधान, सगुण साधना, निर्गुणाचा विचार योग साधना इ. अनेक उपासना समर्थांनी सांगितल्या आहेत. यासाठी प्रपंच सोडता येत नाही. म्हणून प्रपंच व परमार्थ यांची सांगड घालून अंतिम ध्येय साधावे असा निर्णयात्मक विचार सांगितला आहे आणि देहाचे सार्थक करावे असे सुचविले आहे. याशिवाय नि:स्पृह शिकवण, महंत-शिकवण, लेखन-विवेक, कवित्व, इ. अनेक गोष्टींसंबंधी सर्व शंकापरिहारक विवेचन केले आहे.

समासांचे विषयवार वर्गीकरण करून श्रीदासबोधाची पुनर्रचना केली तर त्यातून श्रीसमर्थांचे व्यक्तिमत्त्व, ज्ञान, तर्कशुद्ध विचारसरणी आणि त्यांनी मांडलेल्या विचारांचा प्रभाव दिसून येणारा एक अपूर्व ग्रंथ निर्माण होतो असे वाटते.

## पुनर्रचनेचे स्वरूप

मूळ ब्रह्माचे वर्णन करणारे समास एकत्र करावेत. ते समास कोणते ते विषय विभाजनात दाखविलेले आहे.

(१) त्यानंतर मायोद्भवाचे व मायेचे वर्णन करणारे समास घ्यावेत.

(२) नंतर पंचीकरणाचे, पंचमहाभूते, सूक्ष्म पंचमहाभूते इ. चे वर्णन करणारे समास एकत्र करावेत.

(३) अष्टधा प्रकृतीचे स्वरूप सांगणारे समास यावेत.
(४) मग गर्भवास, नरदेहाचे महत्त्व, जीवा-शिवाचे स्वरूप वर्णन, हे समास एकत्र यावेत.
(५) याच ठिकाणी चत्वार देह, चत्वार वाणी, जागृती, सुषुप्ती आदी अवस्था यांची वर्णने यावीत.
(६) येथे सृष्टीची उत्पत्ती, जड, जगत्, जगदीश्वर यांचे संबंध दाखविणारे समास असावेत. म्हणजे सृष्टीची उभारणी संपते.
(७) नरदेहधारकाचे प्रकार दोन आहेत. व्यावहारिक जीवन जगणारे व आध्यात्मिक जीवन जगणारे तेव्हा मूर्ख, पढतमूर्ख, करंटे, उत्तमपुरुष लक्षणे इ. समासांचे स्थान असावे.
(८) येथे प्रपंच निरूपण, प्रपंचाचे महत्त्व वर्णन करणारे समास, चातुर्य, राजकारण, कवित्व इ. व्यावहारिक शिकवण देणारे समास ठेवावेत.
(९) नंतर बद्ध, मुमुक्षू, साधक व सिद्ध यांची लक्षणे यावीत.
(१०) आणि नंतर नवविधाभक्ती, ज्ञान उपासना, सगुण महत्त्व, निर्गुण वर्णन, आत्मनिवेदनाचे स्वरूप, विरक्ती (वैराग्य), विवेक इ. पारमार्थिक मार्गाचे विवरण यावे.
(११) आणि नंतर ब्रह्माशी तादात्म्य अवस्था दर्शविणारे समास एकत्र करावेत आणि उपसंहार करावा.

यात ग्रंथारंभीची प्रस्तावना तशीच ठेवावी, नमने–स्तवने एकत्र करावीत आणि उपसंहाराच्या ओव्या शेवटी ठेवाव्यात.

## दासबोधाचा हेतू

दासबोध हा परमार्थाचा म्हणजे हरिकथा निरूपणाचा ग्रंथ आहे. प्रपंचज्ञा व व्यवहारचातुर्य कोठे कोठे सांगितले आहे. चार-दोन राजकारणाचे समास त्यात आहेतत. विशेषत: १९ व्या दशकाचा ९ वा समास तर सर्वस्वी राजकारणाचा आहे. परमार्थाशिवाय आणखी एक महत्त्वाचा विषय दासबोधात आहे. कार्यकर्ते कसे असावेत, त्यांनी कसे वागावे, कोणत्या साधनात असावे, लोकसंग्रह कसा करावा, लोक कसे राजी राखावेत, नि:स्पृहपणाने व निर्भयपणाने लोककार्य कसे करावे[४] हा तो विषय होय.

'दासबोधावर' दासबोधाची किल्ली' व 'कुबडी' इ. जे दोनचार ग्रंथ आहेत त्यांनी हा दासबोध हा अध्यात्मग्रंथ आहे असे म्हटले आहे. श्री कल्याणस्वामींनी दासबोधाच्या आरतीत 'वेदांत संमतीचा काव्यसिंधु भरला.' 'अज्ञानजीवाचा मार्ग सुगम जाला' असे म्हटले आहे.[५] परंतु तो केवळ परमार्थाचा ग्रंथ आहे असेही म्हणणे बरोबर होणार नाही असे वाटते. वरच्या उताऱ्यात पांगारकरांनीच त्यात परमार्थाखेरीज अन्य विविध विषय कसे आहेत ते दाखविले आहे. प्रमुख विषय परमार्थाचा– अध्यात्माचा आहे यात शंका नाही.

दासबोधात काव्य नाही, तो एक ओबडधोबड भाषेत लिहिलेला विस्कळीत ग्रंथ आहे. एक ज्ञानकोश आहे इ. आक्षेप घेतले जातात. परंतु दासबोधातही विपुल काव्यात्मकता आहे.

## दासबोधाची भाषा

जिव्हाळ्याची भाषा. दासबोधा हा काही एखाद्या पौराणिक कथाकाव्याचा अनुवाद नव्हे किंवा एखाद्या आध्यात्मिक सिद्धान्त ग्रंथावरील टीकाग्रंथही नव्हे. हा एक स्वतंत्र ग्रंथ आहे. यात

प्रापंचिक विचारापासून ब्रह्माशी ऐक्य साधण्यापर्यंतच्या सर्व बाबतीत विचार मांडला असून तो प्रचीतीचे बोलणे म्हणून सांगितला आहे म्हणून या ग्रंथातील भाषेलाही स्वातंत्र्य मिळाले आहे. वेळोवेळी जो उपदेश शिष्यांना सांगितला तो संवादाच्या रूपाने सांगितला असल्याने स्वाभाविकच अधिक जिव्हाळ्याची भाषा सहजपणे येऊन गेली आहे. आणि मग शिष्यालाही थोडा धीर आल्याकारणाने त्यानेही मोकळेपणाने शंका विचारलेल्या आहेत. यामुळे भाषेला स्वाभाविकपणेच एक प्रकारचा ओघ आला आहे. रामदासांच्या दासबोधाच्या भाषेला एक वेगळेच वजन प्राप्त झाले आहे. ते दोन प्रकारचे आहे. एक तर प्रचीतीचे बोलणे असल्याने कोठेही बोट शिरकावयास जागा नाही. विचार गांभीर्याचे, प्रचीतीचे, भरीवपणाचे वजन घेऊनच प्रकट होतात. आणि दुसरे म्हणजे प्रत्येक विचार मांडताना भाषेला सुभाषितांचे आगळे वैभव प्राप्त झाले आहे. अशी कितीतरी वचने दासबोधात दाखवून देता येतात की जी सुभाषितेच बनली आहेत.

उदा. (१) *सामर्थ्येवीण करी सत्ता तो ऐक मूर्ख ।* (२) *केल्याविण सांगू नये आपला पराक्रम ।* (३) *काळ सार्थक हाचि परम लाभ जाणावा ।* (४) *दृढनिश्चयो धरावा, संसार सुखाचा करावा । विश्वजन उद्धरावा संसर्गमात्रे ।*

अशी सुभाषिते असलेले दासबोध हे एक भांडार आहे. यामुळे भाषेला एक प्रकारचे सौंदर्य प्राप्त झाले आहे. यामुळे प्रभावीपणा-- परिणामकारकता ही वाढली आहे. काही ठिकाणी प्रतिमासृष्टी इतका जबरदस्त चित्रमय आहे की शुद्ध शब्दचित्रांपेक्षा प्रतिमेतील भावचित्रे अधिक परिणामकारक वाटतात, वेधक वाटतात.

दासबोधाची भाषा उदात्ततेने भारलेली आहे. वाचकांच्या मनातील मळ ताबडतोब झटकला जातो आणि एक उदात्त वातावरण त्यांच्या मनात ठाण मांडून बसते हे समर्थांचे यश आहे. समर्थ आपल्या भाषेने कोणालाही चटकन आकर्षून घेतात आणि मग त्याच्या मनावर उदात्ततेचे संस्कार ते सहजपणे करू शकतात. शब्दचित्रांनी रंगविलेली, प्रतिमांनी भारलेली, अलंकारांनी नटलेली, भावोत्कटतेने अंतरंगाला स्पर्श करणारी, सुभाषितांनी प्रभाव गाजविणारी, उदात्ततेने खेचून घेणारी अशी रामदासांची भाषा हे दासबोधाचे एक मोठे यश आहे.

रामदासांना संस्कृत भाषेचे व त्यातील तीन भांडाराचे चांगलेच ज्ञान होते.

*येक्रं ब्रह्म द्वितीयं नास्ति । हे श्रुतिवचन ।*[६] *खं ब्रह्मं ऐसी श्रुती । गगन सदृश हे स्मृती ।*[७] *न भूतो न भविष्यति ।*[८] *संभवामि युगे युगे । ऐसे हे वचन ।*[९]

अशा वचनांच्या आधारामुळे त्यांच्या प्रतिपादनाला एक प्रकारचे वजन लाभले आहे. मधून मधून स्वतंत्र श्लोकातूनही समर्थ संस्कृत वचने देतात. ते केवळ विद्वत्ताप्रदर्शनार्थ नव्हे, विषयाला पोषक असतात म्हणूनच.

रामदासांची भाषा रांगडी आहे असे म्हणण्यात येते आणि ती अशुद्ध असल्याचेही पुरावे दाखविले जातात. पण यापूर्वी हे दाखवून दिले आहे की रामदास भाषेकरता अडून बसत नाहीत. त्यांचा विचार किंवा भाव यांचा आवेश, वेगच इतका जोराचा असतो की शब्द आपोआपच घडले जातात. जुने शब्द आकार घेत असतात. मग त्या वेळी संधी झाला आहे

का नाही, समास बरोबर जमला आहे की नाही इकडे ते लक्ष देत नाहीत शिवाय हस्तलिखितात लेखनिकाच्या चुकाही असतात. त्यामुळे रामदासांवर मात्र अशुद्ध भाषाप्रयोग किंवा लेखन या बाबतीत आक्षेप घेतले जातात.

*रंक राजआज्ञेसि भ्याले । तेंचि पुढे राजा झाले ।*[१०] *न्याये अन्याये अखंड पाहाणे ।*[११] *कर्मइंद्रियामधें जाणे ।*[१२] *सबाहे अंतरी ।*[१३]

## 'विवेकसिंधू आणि दासबोध'

विवेकसिंधूचा दासबोधावर पुष्कळ परिणाम झाला आहे. कुठे टेकडीवरील समर्थांच्या वास्तव्यात त्यांनी तेथील मुकुंदराजांच्या शिष्यांच्या जवळचा विवेकसिंधु ग्रंथ पाहिला व त्यासंबंधी समर्थांनी स्वप्नात आखूड ग्रंथाचा विस्तार करण्याबद्दल मुकुंदराजांचा जो दृष्टांन्त झाला व त्याला त्यांनी 'तथास्तु' म्हटले ह्या आख्यायिकेवरून समर्थांचा दासबोध विवेकसिंधूचा विस्तार आहे हे तर उघड दिसतेच. परंतु त्याला पुरावाही मिळतो. किंबहुना ह्या विलक्षण साम्यामुळेच ती आख्यायिका निर्माण झाली असावी व तिचा उल्लेख आत्मारामाने आपल्या दासविश्रामधामात केला असावा. जो विषय विवेकसिंधूत संक्षेपाने मांडला आहे तो समर्थांनी दासबोधात विस्ताराने मांडला आहे. विवेकसिंधूच्या दुसऱ्या प्रकरणाच्या शेवटी शिष्याने गुरूला सहा प्रश्न विचारले आहेत. हे प्रश्न जीव, ब्रह्म, परब्रह्म, सगुण की निर्गुण, माया, अविद्या प्रपंचाचा निर्माता ह्यांच्यासंबंधी आहेत. समर्थांनी ह्याच प्रश्नांची निरनिराळ्या दशकांत उत्तरे दिली आहेत. जीवासंबंधी ७५, ब्रह्मासंबंधी १०९, परब्रह्मासंबंधी ५०, मायेसंबंधी १२३, अविद्येवर १५ व प्रपंच निर्मात्यावर २०५ ओव्या देऊन विस्तार केला आहे. ह्याशिवाय पारिभाषिक संज्ञा, प्रक्रिया, प्रासंगिक विचार ह्याबाबत ह्या दोन्ही ग्रंथांत साम्य आहे ते निराळेच. मराठी भाषेच्या थोरवीसंबंधाचे मुकुंदराजांचे विचार (प्र. १८-१५०), समर्थांचे विचार (७-१०, ३२ ते ४९), गुरूच्या माहात्म्यासंबंधी वि. सिं. १-७५ ते ८३ व दासबोध १-४-९ ते ३० ह्या ओव्यांमधील साम्य स्पष्ट आहे. ह्याशिवाय गुरुलक्षणे, शिष्यपरीक्षण, नवविधाभक्ती, पंचप्रल, ब्रह्मांडाची उभारणी, संहारणी, पिंड-ब्रह्मांडाचे चत्वारिदेह, चारमुक्ती, इ. विषय एकात संक्षेपाने तर दुसऱ्यात विस्ताराने चर्चिले आहेत. महामाया गुणक्षोभिणी, परस्परानुप्रवेश, पुरुषप्रकृती, गुणसाम्य वगैरे परिभाषाही दोन्ही ग्रंथांत एकाच अर्थाने वापरल्या आहेत. पंचीकरणाचा विषय दोन्ही ग्रंथांत एकाच पद्धतीने विवेचिला आहे. ती गोष्ट 'तत्त्वमसि' ह्या वाक्याच्या विवरणाची. दोन्ही ग्रंथांत इतके साम्य असल्यामुळे मुकुंदराजांच्या आखूड ग्रंथाचा समर्थांनी विस्तार केला, ही आख्यायिका निर्माण झाली.[१४]

## एकनाथी भागवत आणि दासबोध

या बाबतीत प्रा. गं. बा. सरदार यांचे विवेचन पाहणे अगत्याचे ठरेल.

कोणत्याही गुणाचा अतिरेक त्यांच्या (नाथांच्या) चरित्रात सहसा आढळत नाही. त्यांची तत्त्वनिष्ठा अचल आहे, विचारसरणीही ठाम आहे. परंतु त्यांच्या स्वभावात तुकाराम-रामदासांइतका अभिनिवेश व प्रखरता नसल्यामुळे हरएक बाबतीत तडजोडीची प्रवृत्ती दृष्टीस पडते.[१५] व्यवहारधर्माच्या उपदेशाने जनतेला कार्यप्रवण करणारे समर्थ रामदास यांच्या भूमिकेतील अनेक गोष्टींचा उगम एकनाथांच्या व्यापक विचारसरणीतूनच झालेला आहे. प्रपंचाचे महत्त्व, लोकसंग्रहाची आवश्यकता,

व्यवहारातील सावधानता व चतुरस्त्रता, रामचरित्रातील दुष्ट दंडनांचा स्फूर्तिदायक संदेश, पूर्वपरंपरेचा अभिप्राय, ब्राह्मण्याबद्दल पराकाष्ठेला आदर इ. गुणदोष दोघांच्याही वाङ्मयात ठळकपणे दृष्टीस पडतात.[१६] समर्थांनी आपल्या शिष्यांना हरएक बाबतीत सावधानता राखण्याची शिकवण दिली. एकनाथांच्या ग्रंथातही सावधपणावर खूप भर दिला आहे. प्रपंच व परमार्थ ह्या दोन्ही क्षेत्रांत त्याची फार गरज आहे, ह्याची त्यांना पुरेपूर जाणीव होती. रामदासांनी दासबोधात स्वतंत्रपणे व्यवहारधर्माचे तपशीलवार विवेचन केले आहे. लौकिक व्यवहाराबद्दल सामान्य जनांना वाटणारा न्यूनगंड नाहीसा करून समर्थांचे कार्य (नाथांनी) सुकर केले.[१७] दोघेही (नाथ व समर्थ) समर्थच आहेत. पण त्यांचे कार्य एका तऱ्हेचे नाही. एकनाथांच्या वाणीत प्रबोधक शक्ती आहे, तर रामदासांच्या वाक्प्रवाहात प्रक्षोभक तेज आहे : दोघांच्याही अंत:करणांत धर्मस्थापनेची आच आहे. मात्र एकनाथांच्या दृष्टीत आत्मसंरक्षणाचा निर्धार आहे, तर रामदासांच्या पवित्र्यात आक्रमणाची आकांक्षा आहे. एकनाथांनी लोकसंग्रहाचा उपक्रम केला. रामदासांनी मजबूत संघटना बांधली. एकनाथांनी समाजाच्या अंतरंगाची राखली, रामदासांनी बाह्य जीवनाला बळकटी आणली. रामदासांच्या मतप्रणालीवर एकनाथांच्या ग्रंथांची पुष्कळच छाप पडली आहे यात शंकाच नाही.[१८]

## ग्रंथराज (दासोपंत) आणि ग्रंथराज (रामदास)

रामदासांनी दासोपंतांचा 'ग्रंथराज' वाचलेला असलाच पाहिजे. दासोपंतांचा ग्रंथराज लहानसाच ग्रंथ आहे. आठ प्रकरणांचा हा ग्रंथ गुरुशिष्यलक्षण, बंधमोक्ष, भजनवैराग्य, महाकाव्य विवरण, भावना खंडण, सर्वत्राभेद दर्शन, साधनयोग व जीवन्मुक्त दशा या विषयांची चर्चा करणारा ग्रंथ आहे. रामदासांच्या दासबोधावर या ग्रंथाची छाप पडलेली स्पष्ट प्रतीत होते. देवांनी असे म्हटले आहे की, दासबोधाच्या तिसऱ्या दशकाच्या पहिल्या पाच समासांत श्री समर्थांनी प्रपंचाचे जे चित्र रेखाटले आहे त्याची कल्पना ग्रंथराजा (दासोपंत)च्या तिसऱ्या प्रकरणावरून त्यांना सुचली असे दिसते.[१९] वास्तविक मुकुंदराजांच्या विवेकसिंधूपेक्षाही दासोपंताच्या 'ग्रंथराजा'चा प्रभाव दासबोधावर अधिक पडलेला दिसतो. दासोपंतांच्या ग्रंथराजातील भाषा आणि दासबोधाची भाषा सारखीच वाटते. या उताऱ्यावरून दोघांच्या भाषेत व विचारसरणीत किती साम्य होते हे स्पष्ट होईल.



# १०. रामदासांच्या अप्रकाशित काव्यांचा अभ्यास

श्रीसमर्थ रामदासांची कविता आजपर्यंत अनेकांनी संग्रहित करून छापली आहे. 'श्रीरामदासांची कविता प्रथम खंड (देव), श्रीसमर्थग्रंथभांडार (पांगारकर), श्रीरामदासांचे समग्र ग्रंथ (चित्रशाळा प्रेस), श्रीसमर्थ रामदासांचे समग्र ग्रंथ (भट), श्रीसमर्थ रामदासांचे समग्र ग्रंथ (गोंधळेकर). याशिवाय देवांनी समर्थांची लघुकाव्ये, करुणाष्टके, धाट्या, सवाया, पदपदांतरे, इत्यादी ग्रंथ स्वतंत्रपणे छापून प्रसिद्ध केले आहेत. रामदास रामदासी मासिकांतून वेळोवेळी त्यांची काही अप्रकाशित कविता प्रसिद्ध झालेली आहे आणि तरीही समर्थांची अप्रकाशित कविता इतकी विपुल आहे की त्याला सागराचीच उपमा देणे सार्थ ठरेल. वर उल्लेख केलेल्या ग्रंथांत समर्थांची सगळीच कविता आलेली आहे असे नाही, तर एका ग्रंथात जी कविता आली आहे ती दुसऱ्यात नाही असा प्रकार दिसतो. त्यामुळे समर्थांची आजवर प्रकाशित झालेली कविता कोणती तेही निश्चित करण्याचे काम कठीण झाले आहे. देवांनी उद्गार काढलेले आहेत की, समर्थांची समग्र कविता कोणालाच माहीत नाही ते अतिशयोक्त वाटत नाहीत ते यामुळेच. समर्थांच्या अप्रकाशित कवितासागराची थोडीबहुत कल्पना येण्यासाठी खाली नमुन्यासाठी सूची देत आहे ती पूर्ण तर नाहीच, पण अगदी अल्प आहे हे लक्षात ठेवले पाहिजे.

**काही अप्रकाशित काव्यांची सूची**

| अनुक्रम | काव्याचे नाव | बाड क्रमांक |
|---|---|---|
| १. | गुरुगीता (संस्कृत) | १०३, १२४०, १९३८ |
| २. | पंचीकरण | २०५८. |
| ३. | गुरुगीता (मराठी) | ४३५, २२६६, २२७ |
| ४. | अप्रकाशित पदे | १९२१ (पद ३३ वे) |
| ५. | दासबोध एकविसावा दशक | ५९० |
| ६. | कबीर चरित्र | १५१७ |
| ७. | पदे (दोन) | १७१ |
| ८. | श्रीराम फुटयोग | १२४ |
| ९. | वसिष्ठ सारग्रंथ अथवा वरप्रसाद ग्रंथ | १७८८ |
| १०. | तत्वपदक्षेप (पृष्ठे ११७ ते १२७) | १ |
| ११. | पदे | १०, ५५, ६०, ९१, १२७, १७१ |
| १२. | फुटसमास | ६४, ८१ |
| १३. | अभंग | ६९, ७२, ११७, २८८ |
| १४. | कविता (विपुल) | १०३, १२२, १२८ |
| १५. | पद (स्वामी तुझ्या वियोगे) | ११६ |
| १६. | स्फुट प्रकरणे (५१ व्या स्फुट प्रकरणातील ७ ते ११ ओव्या) | १२६ |

| | | |
|---|---|---|
| १७. | आरत्या | १४५ |
| १८. | करुणाष्टके | १७० |
| १९. | पदपदांतरे | १८६ |
| २०. | संसारी संतोष वाटला... | १९९ |
| २१. | पाच भूपाळ्या | २४२ |
| २२. | काही कविता | २४४, ४६९, ४७० |
| २३. | खांजणी भांजणी | २४८ |
| २४. | पदे | २६१ |
| २५. | फुटग्रंथ (२० समास) | ३०४ |
| २६. | एक अष्टक व नवीन कविता | ४५५ |
| २७. | स्फुटमाने | ४९७ |
| २८. | आठ अभंग | ६१० |
| २९. | काही पदे | ६१६ |
| २९. | काही पदे व अभंग (अपूर्व) | ६१७ |

## प्रस्तुत प्रबंधात विवेचिलेले अप्रकाशित साहित्य

१. ईश्वर विवाह वर्णन
२. अहिरावण-महिरावण आख्यान
३. स्फुट प्रकरण
४. स्फुट समास
५. स्फुटमाने (आठ)
६. रामवरदायिनी भवानी स्तोत्र
७. अभंग (बारा)
८. श्लोक (एकूणपन्नास)
९. पाळणा (दशावतारी)
१०. भूपाळ्या (दोन)
११. पदे (सात)
१२. गुरुगीता

## ईश्वर विवाह वर्णन आख्यान

हे काव्य धुळे येथील समर्थ वाग्देवता मंदिरात बाड क्रमांक ७९, ६८२ व७०९ या तीन बाडांत मिळते. तीनही बाडांत लेखनातील फरक सोडून अन्य काही फरक नाही.

**कर्तृत्व :** ह पद्य रामदासांचेच आहे की नाही यासंबंधी वादविवाद नाहीत. 'दास म्हणे दाता थोर' अशी नाममुद्रा आहे आणि अंत:साक्ष आधारावरही हे काव्य रामदासांचेच असल्याबद्दल शंका उरत नाही. ही अंत:साक्ष भाषेची, शब्दकळेची आहे.

**कथावस्तू :** हे काव्य छोटेखानी आहे. केवळ ३० ओव्या आहेत. यात उमा-शंकराच्या

विवाहाचा प्रसंग वर्णिला आहे. पण संपूर्ण कथा यात सांगितलेली नाही. फक्त शंकराचे आणि उमेचे वर्णन केलेले आहे. शंकर वयाने पुष्कळच म्हातारा आणि उमा सुंदर. शंकराच्या अंगाला राख माखलेली, गळ्यात मुंडक्यांची माळ, त्यातून रक्त गळत आहे, सर्वांगावर सर्प रुळताहेत, त्यांच्या मुखातून लाळ गळत आहे, ती शंकराच्याच अंगावर सांडत आहे, हत्तीचे कातडे परिधान केलेले आहे आणि त्यातही गंगा शिरावर असल्याने सर्व वस्त्र आणि सर्व अंग सतत भिजलेले आहे. याउलट उमा लहान आहे, सुंदर आहे. तिची चाल हंसगती वाटली आहे एवढाच उल्लख आहे. वर्णन वराचेच अधिक आहे. अंतरपाट धरलेला आहे. वर उंच असल्याने तो त्यावरून नवरीकडे पाहत आहे. वराच्या माथ्यावर अक्षता टाकण्यासाठी वधूने ओंजळ वर कली तर नवरा उंच. तो किती? 'एकवीस स्वर्गापरी दुरी' एवढेच म्हणून पुढे लग्न झाल्याचा उल्लेख आहे. या वधूवरांच्या अनुरूपतेबद्दल सर्वांना शंका आहे. सर्वजण आश्चर्य करीत आहेत. लग्नाच्या वेळी जमलेल्यांना हे रुचलेले नाही. पण काय करणार? 'चुरचुर लागली नगरा' या एकाच वाक्याने लोकांची प्रतिक्रिया स्पष्ट केलेली आहे आणि नंतर मात्र वराने आपले देह रूप पालटले. 'आंगी सौंदर्य आणले' जिकडे-तिकडे दिव्यांबरे दिसू लागली असा उल्लेख करून काव्याचा शेवट केला आहे.

**कथासौंदर्य :** हे काव्य लहान असले तरी काव्यगुणांनी नटलेले आहे. एक तर कथावस्तू अपरिचित अशी निवडली आहे. त्यामुळे वाचकांची उत्सुकता आधीपासूनच जागृत होते. आता विवाहवर्णन वाचायला मिळणार अशा अपेक्षेने तो वाचू लागतो तो त्याला आढळते ते शंकराचे बीभत्स वर्णन. काव्याच्या नायकाचे असे बीभत्स वर्णन आरंभीच असल्याने वाचकाचा अपेक्षाभंग होतो. पण वर्णन बीभत्स असले तरी इतके वास्तव आणि बोलके आहे की वाचक त्यात गुंग होऊनच पुढील कथेसाठी आकर्षिला जातो. हे वर्णन बीभत्स असले तरी बहारीचे आहे. त्यात प्रच्छन्न हास्यरस आहे. दंडावर भस्म इतके आहे की त्याचे वर्णन अगदी बोलचालीच्या भाषेत 'भस्मपोते' असे केले आहे. सर्पांची लाळ अंगावर पडते आहे. हत्तीचे कातडे तेही ओले, व्याघ्रांबरही काखेत आहे. वर म्हातारा आहे असे सांगून वधू लहान आहे असे विरोधाने आकर्षण वाढविले आहे.

**वर्णनकौशल्य :** एवढ्या लहानशा काव्यात वर्णन एवढे बहारीचे आहे की रामदासांचे वर्णन कौशल्य नजरेत भरल्याशिवाय राहत नाही. शंकराचे वर्णनच या काव्यात प्रथम नजरेत भरते. तो म्हातारा असल्याचा उल्लेख सत्य (पौराणिक आधारावर) असूनही कवीने त्याचा स्वभाव एका शब्दात वर्णिला आहे. अंतरपाट धरला आहे. पण म्हाताऱ्या वराला वधूचे मुख पाहण्याची उतावळी झाली आहे. म्हणून आपल्या उंचीचा फायदा घेऊन तो अंतरपाटाच्या वरून पाहतो. हा सारा प्रसंग 'नवरा उदंड वाढला वरून पाहे' एवढ्या वाक्यखंडाने उभा केला आहे.

**रसवत्ता :** या काव्यात प्रथमत: केलेले बीभत्स वर्णन प्रत्ययकारी आहे. ३० ओव्यांपैकी पहिल्या १५ ओव्या या बीभत्सरसयुक्त वर्णनात खर्ची घातल्या आहेत. बीभत्सरसाची पूर्ण निष्पत्ती झालेली दिसून येते. 'व्याळ वळवळता', 'सदा स्मशानी राहणे', 'भुतेखेते कडकडाट', 'कारणे भ्यासुर व्याघ्रांबर, बैले गोमाश्या लादल्या' असे वर्णन वाचकांच्या अंगावर रोमांच उभे करते.

बीभत्स वर्णनात प्रच्छन्न रूपाने हास्यरसही सर्व काव्यात खेळविल आहे. शेवटी हा सारा

करुण, बीभत्स, हास्यरस जाऊन विवाह-मांगल्य होते तेव्हा येथे वाचकांच्या हृदयातील खळबळ शांत झाली आहे. प्रसन्न वातावरण आहे. हा शांतरस आहे. 'दास म्हणे दाता थोर आमुचा देव रामेश्वर' असे वर्णन करून भक्तिरसाचीही निर्मिती अंती केली गेली आहे.

**भाषाशैली :** या छोटेखानी काव्याची भाषाही प्रभावी आहे, आकर्षक आहे. प्रत्ययकारी आहे, प्रतिमासृष्टी उत्पन्न करण्याचे सामर्थ्य तिच्यात आहे.

**शब्दकळा :** शब्दांच्या निर्मितीत, त्यांचा उपयोग करण्यात, त्यांच्या निवडीत, त्याच्या औचित्यात रामदास कोणालाच हार जात नाहीत. रामदासी छाप असलेले शब्द ताबडतोब ओळखू येतात, या एका लक्षणावरून एखाद्या काव्याचा कर्ता रामदास आहे हे सहज ठरविता येते. इतके रामदासांच्या शब्दांचे वैशिष्ट्य आहे.

अलंकारांचा उपयोग ह्या काव्यात फारच कमी आहे. फक्त तीन उपमा व एक रूपक एवढाच अलंकारांचा प्रपंच. परंतु सर्व काव्यच एक सुंदर अलंकार आहे असे वाटावे इतके सुंदर आहे.

**संक्षिप्तता :** रचनाकौशल्यात हे काव्य तर संक्षिप्ततेचा आदर्श नमुना आहे. पाल्हाळ मुळीच नाही. हे काव्य रामदासांच्या काव्यसृष्टीतील एक अनमोल रत्न आहे. इतके दिवस हे अजूनही बंद पेटीत कसे काय पडून राहिले कोण जाणे? या काव्याच्या प्रकाशनाने रामदासांच्यावरील ते कवी नसल्याचा आक्षेप एकदम दूर होणार आहे.

## अहिरावण-महिरावण आख्यान

रामरावण युद्धात रावणाचा पुत्र मारला गेला. त्यामुळे रावण अति दु:खी झाला. निराश होऊन त्याने शेवटी अहिरावणाचे चिंतन केले. पाताळात असलेल्या अहिरावणाला रावण चिंतेत असल्याच समजले. तो धावत आला. सर्व हकीगत समजून घेतली आणि त्याने रावणाला चिंता न करण्याचे आश्वासन दिले. ही कथा क्षेपक आहे असे मानले जाते. परंतु रामदासांनी ही कथा तुलसी रामायणावरून घेतली आहे असे वाटते. 'रावणाने शिवालयात अहिरावणाचे चिंतन करून त्याला बोलावले. अहिरावण येताच रावणाने सर्व हकीकत त्याला सांगितली. अहिरावणाने रावणाला रामलक्ष्मणांना पाताळात नेण्याचे अभिवचन दिले. मोहनास्त्र टाकून रामलक्ष्मणांना त्याने नेले इत्यादी तपशील तुलसीदासांच्या रामायणातील तपशिलाशी जुळतो. कदाचित ही कथा रामदासांनी उत्तर भारतातील संचाराच्या वेळी ऐकलेलीही असेल. परंतु ही कथा रामदासांनी संक्षेपाने सांगितलेली आहे.

**कथा रचनेतील कलात्मकता :** प्रसंगाचे स्वयंभू नाट्यपणच काव्यमय असल्याने स्वतंत्र कल्पकतेची आवश्यकताच वाटत नाही. समरप्रसंग, संवेदनाप्रवाहांचे वर्णन, त्यातून अद्भूत रीतीने सुटका, पुन: कठीण प्रसंग, त्यातन युक्तीने निसटणे, पण तिसरा प्रसंग व्रतभंगाची पाळी येते तो सर्वांत बिकट. पण भुंग्यांनी पलंग आधीच पोखरून ठेवलेला असल्याने तोही प्रसंग टळतो. यात हनुमंताचे धोरण, दूरदृष्टी, कौशल्य, चापल्य, शक्ती, बुद्धिमत्ता या सर्वांचे दर्शन होते. पौराणिक कथेचा कलात्मक उपयोग रामदासांनी या काव्यात यशस्वीपणे केला आहे.

या काव्याची रचना श्लोकाने सुरू झाली म्हणजे भुजंगप्रयात या वृत्तात आहे. नंतर मालिनी वृत्ताचा उपयोग केला आहे. पुन: श्लोकांची रचना आहे. मध्यंतरी स्रग्धरा वृत्तही आणले आहे. नंतर एकदम सवायांचाही उपयोग केला आहे. सवाईचा उपयोग ससानुकूल

वाटतो. भाव जेथे गतिमान झाले आहेत तेथे सवाईचा उपयोग अनुकूल आणि रसपोषक झाला आहे. करुण रस, भयानक रस, अद्भूत रस, शृंगार रस, शांत रस अशा रसांचा अनुभव काव्यात येतो. हे आख्यान एक सफल आख्यान काव्य म्हणून रामदासांना कीर्ती मिळवून देण्याच्या योग्यतेचे खात्रीने आहे असे म्हणता येईल.

## स्फुट प्रकरण : कळवळा

व्यर्थ संसार जातसे हे स्फुट रामदासांची मन:स्थिती दर्शविणारे आहे. लोकांची स्थिती पाहून रामदासांच्या मनाला अतोनात दु:ख होत आहे. लोकांचे जीवन व्यर्थ जात आहे. बालपण नेणतेपणात जाते, तारुण्य मदोन्मत्त अवस्थेत संपून जाते, वृद्धावस्था रोगव्याधी सहन करण्यात. हे सर्व लोक असे जीवन कंठून आत्मघात करतात हे त्यांना कळत कसे नाही असा विचार मनात येऊन रामदासांना आलेला कळवळा या स्फुटात व्यक्त झाला आहे. रामदासांच्या स्फुट प्रकरणांची रचना ओघवती असते आणि तशीच या स्फुटाची आहे. सहजता हा ह्या रचनेचा आणखी एक गुण. कृत्रिमतेचा वासही लागलेला नाही. तळमळ, ओघ, सहजता यांतून निघालेले हे उद्गार या समासाला काव्यत्व देण्यास पुरेसे आहेत.

## फुट समास

हा समास अपूर्ण वाटतो.

*'आता सकळ कर्ताकवण । पापी पुण्यात्मा लक्षण । ऐसे हे निरूपण । मज निवेदन करावे ॥१०॥* असा प्रश्न शिष्याने गुरूला विचारला आहे. पण तो अनुत्तरित राहिलेला आहे. परब्रह्माचे वर्णन मध्येच केलेला हा प्रश्न आणि गणेशाची स्तुती एवढाच भाग या स्फुट समासात आलेला आहे. परब्रह्माचे वर्णन पहिल्या सात ओव्यांत केले आहे ते काव्यात्म आहे. पुढे कवीने धारण केलेली नम्रता ही लक्षणीय आहे आणि त्यानंतर गणेशाचे वर्णनही युद्धावर चाललेल्या वीराच्या थाटात केले आहे. गणपती मूषकारूढ आहे. हाती परशू आहे. अंकुश आहे. उंदीर मंदाद्रि पर्वतासारखा आहे. तो ऐरावताहून अधिक मोठा आहे किंवा गुणांनी अधिक आहे. आपल्या उड्डाणाने तारांगणांनासुद्धा पाडीन असे तो उंदीर म्हणतो. गणेशाचे सैन्य चालले आहे, कार्तिक स्वामीही या युद्धात सामील झाले आहेत असा कथेचा आरंभ आहे आणि समास संपला आहे, म्हणून हा अपूर्ण असावा असे म्हटले.

## फुट माने

बाडातून उतरून घेतलेला ही माने एकूण आठ आहेत. क्रमांक ९, ३८, ४८, ५४, ५५, ५६, ५७, व ५८ अशी आठ माने आहेत. काव्य या दृष्टीने व समर्थांचे विचार या दृष्टीनेही ही माने चांगली आहेत. अर्थात भिन्नभिन्न बाडांतून अशी अनेक माने असून अप्रकाशित आहेत.

### भाव-अभाव

या मानातील विषय फक्त 'भाव' आणि 'अभाव' म्हणजे भावाचा अभाव हा आहे. भाव

असेल तर सर्वच गोष्टी चांगल्या होतात. भाव नसेल तर सर्व गोष्टी बिघडतात हाच आशय आहे. भक्तीत भाव महत्त्वाचा असतो हे सर्वश्रुतच आहे. पण येथे प्रत्येक ओवीत भाव असेल तर काय होते आणि भाव नसेल तर काय होते हा विचार ओघवती शैलीने आणि प्रसादयुक्त गुणाने सांगितला आहे. पाल्हाळ केला नाही पण कोणतीही गोष्ट सुटली असेही झाले नाही.

या मानात अलंकार नाहीत. पण रामाचे बंदमोचन स्वरूप रामदास विसरत नाहीत. उत्कट भक्ताचे या मानातही दर्शन होते आणि लोकशिक्षणाची तळमळही व्यक्त होते. हेच रामदासांचे काव्य.

## योग

या मानाची रचना आणि विषय दोन्ही महत्त्वाची आहेत. रचना स्फुट प्रकरणासारखी आहे. विषय योग्याचा आहे. निरंजन, निर्गुणरूपाशी एकरूप झालेला योगी जनात वागताना दिसतो. म्हणून लोकांची त्याच्या योगीपणाची खात्री पटेनाशी होते. येथे अशा योगी माणसाचे जाणे-येणे निर्गुणात जाणे आणि जनात येणे याचे स्पष्टीकरण केले आहे. प्रपंचातील दुःख सर्वपरिचितच आहे. योगी निर्गुणात जातो, समाधीचे सुख अनुभवतो आणि जगातील त्याचे नियत कार्यही करतो. ज्ञानाचेही कर्म सुटत नाही असे अध्यात्मशास्त्रात सांगितले गेले आहेच. पण ते कर्म त्याला बाधत नाही. 'ज्याला सर्व संग सुटतो त्यालाच योग साधला' असे शेवटी सांगून टाकले आहे.

## लोक हे विकारी नाना

हे मान महंतीविषयी आहे. लोकस्थितीचे वर्णन या मानात केले आहे, ते अत्यंत महत्त्वाचे आहे. सामाजिक परिस्थिती बिघडते तेव्हा लोकांचा आचार चांगला राहत नाही आणि त्यांना कोणी कितीही सांगितले, उपदेश केला तरी ते ऐकत नाहीत. 'लोक हे विकारी नाना । फार अन्याय वर्तती ।।' क्षमा करावी तर ऊर (आपला) फाटतो, बोलावे तर वाणी खुंटते. ते मस्तवाल इतके झाले आहेत की वळवावे तसे वळतीच ना । सांगितले तरी त्यांना ते हिताचे वाटतच नाही, उपदेश ऐकताना त्यांना त्रास वाटतो आणि यापुढे त्यांच्या वागण्याचे वर्णन नादानुसारी शब्दयुक्त भाषेत उत्कृष्टपणे प्रभावात्मक शैलीत केले आहे. या प्रकरणातील ओघ, उपदेशाची कळवळ, लोकस्थितीचे हुबेहूब वर्णन पण त्याच्यामागे त्यांच्यासाठी ऊर फाटून जाणारी तळमळ आणि वेदना, प्रभावी वाणी, नादानुसारी शब्दरचना ही सारी काव्यवैशिष्ट्ये रामदासांचे व्यक्तित्व उभे करतात. रामदासांचे हे आत्मचरित्र नव्हे, पण त्यांचे स्वभावचित्र काही अंशी येथे व्यक्त झाले आहे, असे निश्चित म्हणता येते.

## अघोरा घोर रूपिणी

यात तुळजामाता भवानीची स्तुती आहे. हे एक स्तोत्र आहे. यातील शब्द, भाषाशैली आणि ओघ हा चिंत्य आहे. 'घे घे घे दैत्य घेता हे' बोलण्याची भाषा असून प्रभावी आहे. शिवाय ती प्रतिमा उभी करण्यास समर्थ अशी आहे. 'अघोरा घोर रूपिणी', 'घुमारे घुमवाताहे' यांतील अनुप्रास हे केवळ नादसौंदर्याची प्रचीती घडवीत नाहीत, तर वर्णन चित्रमय करतात.

रामदासांच्या अलंकार योजनेतील ही जादू आजपर्यंत लक्षातच घेतली गेलेली नाही. तीच गोष्ट 'गोंदळी नाचती गाती । गुंतला लोक उगवे' यातील 'ग' ची पुनरावृत्ती हा बाह्य अलंकार झाला, पण गोंदळ-गोंधळ हा गुंतलेल्या लोकांना उगविण्यासाठी असतो हे कार्य सहज रीतीने सांगून टाकले आहे. हे सर्व मानचे काव्यालंकार, प्रभाव, भाषाशैली, ओजगुण या दृष्टीने सुरेख साधले आहे.

## भवानी भवनाशिनी

५६ व ५७ व्या मानांचा विचार एकत्र केला पाहिजे. एकात 'व्याघ्र, चोर आणि भुजंग' यांचे मला फार भय वाटते, अशी काकुळती रामदासांनी व्यक्त केली आहे. कदाचित हे साधारणीकरण असावे. लोकांना जेव्हा जेव्हा वाघ, चोर, भुजंग यांचे भय वाटेल, संसारात वागत असता अनेक धोके वाटत असतील त्या वेळी भवानीचे चिंतन करावे, असा हा उपदेश असावा आणि भवानी अशा वेळी रक्षण करते, याची रोकडी प्रचीती आलेली आहे, असे निश्चितपणे रामदास सांगतात, पण तरी सुद्धा त्यांनी प्रचीती घेतली आहे, याचा अर्थ त्यांना भीती वाटली होती व त्यांनी भवानीची प्रार्थना केली आणि त्यांचे भय दूर झाले असाच घेतला पाहिजे. हे मान या दृष्टीनेही महत्त्वाचे आहे. रामदासांनी या मनोविकारांचाही अनुभव घेतला आहे हे दिसून येते.

## रामवरदायिनी भवानी स्तुती

या स्तुतीचे महत्त्व दोन-तीन कारणांनी आहे. (१) या स्तुतीची रचना रामदासांच्या इतर कवितेहून वेगळी आहे. हा अभंगही नव्हे, श्लोकही नव्हे, ओवीही नव्हे, चार चरणांची रचना. पहिल्या तीन चरणांत प्रत्येकी दहा-दहा मात्रा व शेवटच्या दिडक्या चरणात सात मात्र असा सदतीस मात्रांचा हा छंद आहे. त्यामुळे कवितेला एक प्रकारची गतिमानता आलेली आहे. म्हणजेच केवळ अनुकूल छंदाची योजना केली की रसवत्ता ही कशी निर्माण होते, याचे ही स्तुती म्हणजे एक चांगले उदाहरण आहे.

## एक अप्रकाशित अभंग

हा एक उत्कृष्ट अभंग आहे. जीवन आणि मृत्यू यासंबंधी विचार केल्यास मृत्यू हा अटळ आहे, हे कोणालाही पटलेच पाहिजे आणि आपला मृत्यू झाला की मग येथे जे जे काही आपले म्हणत होतो त्याचे सुख-दुःख आपणांस काय असणार? आपण ज्या वस्तूवर प्रेम करतो ती वस्तू आपल्या मृत्यूनंतर जरी पुष्कळ काळपर्यंत टिकून राहिली तरी त्या वस्तूचा आपणांस काय उपयोग? म्हणजे आपल्या दृष्टीने ती अशाश्वत, मिथ्या नाही काय? मग अशा वस्तूंच्या प्राप्तीसाठी आपण सारे जीवन वेचणे हे चुकीचे नाही काय? 'जे जे म्हणसी माझें । तें नव्हें तुझें' या अर्ध्या अभंगाने हा विचार संपूर्णपणे मांडला आहे. रामदासांचे कौशल्यही येथे दिसते, पण त्यांत विचारांचा सखोलपणा, सच्चेपणा आणि तळमळ यांचेही दर्शन होते. तेव्हा हा मायामोह तोडून टाक बाबा । कारण हाच मायामोह पुन्हा जन्माला कारणीभूत होतो. तेव्हा हा तोडलास की अंती यातायात चुकेल, नाहीतर पुनर्जन्म, मृत्यू, पुन्हा जन्म-मृत्यू हे चक्र चालूच

राहील. म्हणून जन्म मिळालाच आहे, तर भोग घ्यावेच लागतील, पण त्यात मन तरी गुंतवू नकोस. कनक कांतेचे ध्यान करून तू आपलाच नाश का करून घेतोस. श्रीरामाचे नाव घे, तोच ही बेडी तोडून टाकील, निष्काम करून टाकील.

या अभंगात तीन प्रकारचे सौंदर्य आहे. भावसौंदर्य, कलात्मक सौंदर्य आणि विचार सौंदर्य हे आहे. 'सावध हो आणि रामावर विश्वास ठेव' या जिव्हाळ्याच्या शैलीने हा अभंग लिहिलेला आहे. काव्यात जिव्हाळाच महत्त्वाचा मानला जातो. 'हळूहळू माया तोडी बापा' यात 'हळूहळू' या शब्दातही शिष्याला समजून घेतल्याचा प्रत्यय येतो. कलात्मक सौंदर्याच्या दृष्टीनेही हा अभंग अत्यंत सुंदर आहे. अभंगाच्या चार पादांपैकी अंतिम पादाचा जो शब्द त्याच शब्दाने पुन्हा दुसरा अभंग सुरू होतो. त्यामुळे विचारांची एकसूत्रता निर्माण होते. कोठेही विचार त्रुटित वाटत नाही.

या अभंगातील शब्दरचना समर्पक, योग्य अर्थ योग्य त्या वजनाने (Weight) करणारे असे आहेत. सर्व शब्द परिचित आहेत. शुद्ध स्वरूपात आहेत. त्यांची रूपे बिघडली नाहीत आणि अर्थवाहक आहेत. 'वैराग्यावाचूनि', 'कानकोंडे', 'समूळ बिघडे', 'इच्छा बेडी', 'आयुष्य नाडती' या शब्दांचा चपखलपणा सहज ध्यानात येण्यासारखा आहे. रचनेचा ओघ तर अनुस्यूत आहे. भाषेत 'प्रसाद' गुण आहे.

अभंग क्रमांक चार मध्ये स्वत: ब्रह्मरूप असल्याचा एक मराठी वाङ्मयात दुर्मिळ असलेला अनुभव व्यक्त झाला आहे. पाचव्या अभंगातही हा विचार (भाव) विस्तारला आहे. 'मायेचा हा जन्म आम्हांपासून झाला' किंवा 'अनंत अवतार आम्हीच घेतले' या शब्दात हा 'अहं ब्रह्मास्मि'चा साक्षात्कार व्यक्त केला आहे. सात, आठ, नऊ या अभंगांत 'जय रामें केले' हे पालुपद आहे आणि मन मुरोनिया गेले, जयेचे साक्षपण उडाले, इत्यादी अनुभव मिळाला आणि हे सर्व श्रीरामाने केले, अशी कृतज्ञतेची भावना व्यक्त केली आहे. दहाव्या अभंगात सुंदर उपदेश आहे तो स्वत:चा सर्व शोध घेण्याचा. 'शोध शोधावा आपुला', 'व्यर्थ कासया गलबला' असा हा उपदेश आहे. देव कुठे आहे, याचा पत्ताही सांगितला आहे.

*देव देवावरी देऊळ । देवळावर्ती ब्रह्मगोळ । त्या परतें शून्यमंडळ । परतादेव ॥ देव परता ना आरता । देव वर्ता ना खालता । देव निश्चळ पुरता । सर्वाठाई ।*

अकराव्या अभंगात सर्व नभ हे रामदासांच्या जाणिवेत आगळेच असल्याचे– साक्षात्कार झाल्याचे नमूद केले आहे आणि हा साक्षात्कार 'देखिला देखिला' या बाराव्या अभंगात स्पष्टतेने सांगितला आहे.

हे सर्व अप्रकाशित बारा अभंग रामदासांना झालेला साक्षात्कार व्यक्त करतात. ब्रह्माचे स्वरूप स्पष्ट करतात, रूपकांनी या वर्णनाला काव्याची शोभा आणतात, उपदेश देतात, आपण ब्रह्मच असल्याचा स्पष्टतेने निर्वाळा देतात आणि रामदासांच्या कवित्वशक्तीचा, रचनाकौशल्याचा, परिचय देतात. या दृष्टीने हे सर्व महत्त्वाचे आहेत.

## करुणाष्टके (श्लोक)

काही अप्रकाशित करुणाष्टके आणि श्लोक येथे संग्रहित केले आहेत. पहिल्या वीस करुणाष्टकात्मक श्लोकांत जनांची स्थिती कशी आहे, हे सांगितले आहे. पुष्कळ संत, विरक्त पाहिले पण कोणी लयातच गुंतून गेले. कोणी संन्यासात, कोणी योगमार्गात, कोणी धावतमार्गात

इ. तपशील फार वर्णनात्मक आहे आणि प्रत्येक श्लोकाचा चौथा चरण 'परिछिनसें एक तोही न बोले' अशी स्पष्ट तक्रार केली आहे. ब्रह्माची प्रचीती असल्याचे कोणीही बोलत नाही. पण १७ ते २० या श्लोकांत गुरुकृपेने, सुकृतामुळे आपण प्रभु जोडला आहे, असा उद्गार धन्यतेचा काढला गेला आहे. हे सारे श्लोक साक्षात्काराच्या दृष्टीनेच महत्त्वाचे आहेत.

'समर्थ या शीर्षकाचे जे दहा श्लोक आहेत ते खरोखर करुणरसाने आर्त असे आहेत. 'उदासीन राहू नका, मला तुम्ही वोसंडिता याचे दुःख वाटत आहे. मी आपणावर किती भार घालायचा? पण काय करणार? माझे पापही उदंड असेल. मला कोठेच आधार - थारा नाही. मी तुमच्या वियोगाने झुरणीला लागलो आहे. प्राण हा दुःखवेगे फुटला आहे. इ. आर्त धावा रामदासांनी केला आहे. साक्षात्काराची ओढ त्यांना किती लागली होती आणि शेवटी त्यांची ही आर्त हाक ऐकली गेली आहे हे समाधानही व्यक्त झाले आहे.

## प्रयत्नवाद

प्रयत्नवादावरील पाच श्लोक चैतन्य उत्पन्न करणारे आहेत. 'यत्नी तयाला तो देव पावे', 'म्हणोनि यत्नी द्यावी मनाला' अशा अनेक प्रकारे प्रयत्नवादाचा पाठपुरावा करीत असलेले हे श्लोक संख्येने पाचच असले तरी उत्साह, स्फूर्ती, चैतन्य निर्माण करणारे आहेत यात शंका नाही.

## पाळणा दशावताराची

हा एक छोटासा पाळणा आठ कडव्यांचा अप्रकाशित आहे. काव्यांशापेक्षा कथनात्मकता आणि गेयता हेच याचे वैशिष्ट्य होय. याहीपेक्षा पाळणा हाही काव्यप्रकार रामदासांनी हाताळला होता याला हा आणखी एक पुरावा एवढेच. यात मधुसूदन श्रीकृष्णाच्या नावे आहे व मग सर्व अवतारांचे एकेका कडव्यात वर्णन आहे. मत्स्य, कूर्म, वराह, नरसिंह, वामन, परशुराम, राम, कृष्ण अशा आठ अवतारांचे कार्य-उद्धार थोडक्यात सांगून बौद्ध आणि कलंकी या दोन अवतारांचा एके ठिकाणी उल्लेख आहे.

यात्यतिरिक्त या काव्यात काही वैशिष्ट्य नाही. गेयतेची रचना हेच वैशिष्ट्य. पूर्व अवतारांचा भक्तिपूर्वक कार्यनिर्देश हेच महत्त्वाचे.

## भूपाळ्या

दोन भूपाळ्या अप्रकाशित असलेल्या उतरून घेतल्या आहेत. त्याही अत्यंत अशुद्ध रूपात मूळ बाडांत लिहिलेल्या आहेत. यांचा केवळ नमुन्यासाठी संग्रह केला आहे. भूपाळ्यांचे स्वरूप, त्यांतील काव्यात्मकता याचे विवेचन अभंगांच्या (गाथा) विवेचनात आले असल्याने येथे पुनरुच्चार करण्याची आवश्यकता नाही.

## पदे

अप्रकाशित अशा सात पदांचा संग्रह येथे उतरून घेतला आहे. एका पदात ब्राह्मण कोण हे सांगितले आहे. ब्रह्मनिष्ठ तोच ब्राह्मण आणि त्याचे ठायी गुरुत्व असते असे स्पष्ट मत प्रकट

केले आहे. मुंज झाली की मंत्राच्या योगाने तो द्विज होतो, चारी वेदांचे अध्ययन झाले की, शास्त्रनिपुण होतो, पंडित होतो, तो विप्र झाला असे म्हणावे. पण दासबोधात ब्राह्मणांच्या आचारासंबंधी रामदासांनी तक्रार केली आहे. 'आताचे ब्राह्मणा काय केले । अन्न मिळेना ऐसे जाले ।' त्याचा मूळ आधार ब्राह्मणाबद्दलची असलेली समर्थांची ही कल्पना होय. प्रकाशित वाङ्मय यातील ब्राह्मणांच्याबद्दलचे विचार या अप्रकाशित पदातील विचाराखेरीज अपूर्ण आहेत हे स्पष्ट होईल. म्हणून या पदाचे महत्त्व आहे. 'हे गुरुपाय' या पदात गुरूबद्दलची अनन्यसाधारण भक्ती व्यक्त झाली आहे. 'हे गुरुपाय' हे पालुपद आहे. समर्थांचे गुरू प्रत्यक्ष श्रीरामचंद्र हेच असल्याने गुरूचे पाय याचे त्यांना वाटणारे महत्त्व पटायला वेळ लागत नाही आणि त्यामुळे गुरुप्रेमाची ही उत्कटता या पदात प्रतीतीला येते. 'कां भुललासी' हे पद उपदेशात्मक असले तरी रचनाकौशल्य, विचारांच्या मांडणीची एक विशिष्ट दिशा आणि प्रपंचाच्या मिथ्यत्वासंबंधीचा उपदेश इ. गोष्टींमुळे हे पद परिणामकारक वाटते. हे निर्दोषही आहे.

## भिन्न बाडे

बाड क्रमांक १२४० हे दासकृत दासगीता असलेले बाड आहे. ही दासगीता संस्कृत असून हिचे चार अध्याय आहेत. परंतु संस्कृत ग्रंथाचा विचार येथे प्रस्तुत नाही.

'गुरुगीता' असलेली बाडे खालीलप्रमाणे आहेत : (१) बाड क्रमांक १९०९ (२) २२२१ (३) २२६६ (४) ४३५. ही चारी बाडे धुळे येथील समर्थ वाग्देवता मंदिरात आहेत आणि माझ्या स्वत:जवळ एक हस्तलिखित गुरुगीता आहे. ते पाचवे, या प्रतींची (बाडांची) माहिती खालीलप्रमाणे आहे–

माझ्याजवळच्या हस्तलिखिताला येथे 'क' प्रत म्हणून संबोधले आहे. ही पोथी ६ १/२ × ४ इंच एवढ्या आकाराच्या साध्या कागदावर लिहिलेली आहे. कागद जुना आहे. Government of India England व काही नक्षी असे Water-marks आहेत. काही कागदांवर Water-marks फक्त उभ्या रेषांचे आहेत. एकूण कागद १७ असून पोथी दोन्ही बाजूला (पाठपोट) लिहिलेली असल्याने पोथीची एकूण पृष्ठे ३४ आहेत. ओव्यांची संख्या १४९ आहे. हिचा लेखनकाल असा दिला आहे : 'मिती फाल्गुन कृ. ३० शके १८२४.' ही ७०-७१ वर्षांपूर्वी लिहिलेली पोथी कोठल्यातरी पोथीवरून उतरून घेतलेली आहे हे उघडच आहे. अक्षरांचे वळण जुन्या पद्धतीचे आहे. काही ठिकाणी खाडाखोड आहे, पण तीच अक्षरे पुन: लिहिली आहेत. 'ईश्वर' हा शब्द ऱ्हस्व लिहिला आहे. पण एकूण शुद्धलेखन बऱ्यापैकी आहे. 'भ' हे अक्षर 'म' असे काढले आहे.

बाड क्रमांक १९०९ ची धुळ्याच्या संग्रहातील पोथी. हिच्यात एकूण २० पाने आहेत. पहिले पान गहाळ झाले आहे. कागदाचा आकार ६'४ इंच आहे. लेखनकाल 'शके १६९३ खरनाम संवत्सर अधिक आषाढ वद्य १४' असा असून 'अनंतेन लिखित्वा' असा उल्लेख आहे. ही पोथी 'ख' असे आपण समजू या.

तिसरी पोथी बाड क्रमांक २२६६ ची. ही 'ग' पोथी असे आपण मानू. ओवी संख्या – आहे. कागदाचा आकार —– असून लेखनसमाप्तीचा काल? असा सांगितला आहे. फक्त लेखकाल वेगळा आहे.

चौथी पोथी बाड क्रमांक २२३१ ची आहे. २४ पानांची त्रुटित पोथी आहे. ही 'ध' पोथी

असे समजू. हिचा विचार स्वतंत्रपणे करण्याची आवश्यकता नाही.

पाचवी पोथी 'ड' पोथी बाड क्रमांक ४३५ ची. एकूण ओवीसंख्या १२७ असून पुढील ओव्या नाहीत. पोथी अपूर्ण. केवळ अपूर्ण आहे एवढेच नसून ही रामदासकृत गुरुगीता वेगळीच आहे असे दिसते. म्हणजे 'क' ते 'ध' या पोथ्यांत पूर्ण-अपूर्ण कसाही असला तरी एकच ग्रंथ लिहिलेला आहे.. मात्र रामदासकृत गुरुगीताच. तेव्हा आता फक्त 'क' ते 'ध' प्रतींतून मिळत असलेल्या ग्रंथाचा अभ्यास सादर करावयाचा व त्याचबरोबर 'ड' प्रतीतील ग्रंथाचाही विचार करावयाचा.

यांपैकी 'ड' प्रतीतील गुरुगीतेची १८ पाने आहेत. १२७ ओव्या. शेवटी शेवटी फलप्राप्ती सांगितलेली आहे. म्हणजे अधिकात अधिक आणखी १०-१५ ओव्यांचा हा ग्रंथ असावा. ग्रंथाची भाषा व ओव्यातील विषय मांडण्याची धाटणी रामदासांची नाही. लिहिण्याच्या पद्धतीवरून व 'स्थिती'बद्दल 'स्छिती' अशासारख्या अक्षरावरून ही गीता समर्थकालीनची मानण्यास हरकत नाही. पण समर्थांची वैशिष्ट्ये या काव्यात दिसत नाहीत म्हणून हा समर्थांचा ग्रंथ नसावा असे समजतो.

## गुरुजीता

बाड क्रमांक ४३५ मधील गुरुगीता समर्थकृत नव्हे असे वाटते हे वर म्हटलेले आहे, पण बाकीच्या तीन बाडांतून एकच 'गुरुगीता' हा ग्रंथ रामदासस्वामीकृत असा छाप असलेला पाहिला म्हणजे या ग्रंथाच्या कर्तृत्वासंबंधीचा प्राथमिक संशय दूर होतो. परंतु देवांनी बाड क्रमांक २२६६ च्या बाबतीत मात्र संशोधनाच्या चतुर्थ खंडात एक टीप दिली आहे. 'परंतु हा ग्रंथ समर्थांचा असेल असे वाटत नाही' असे म्हटले आहे ते त्याचे प्राथमिक मत म्हणूनच मानले पाहिजे. नाहीतर बाड क्रमांक ४३५ च्या खाली त्यांनी तशी टीप दिली असती. कदाचित पुनर्वाचनाच्या वेळी त्यांचे हे मत बदललेही असते. 'रामदासकृत गुरुगीता समाप्त' असाही शेवटी उल्लेख आहे. अन्य कोणीतरी रामदास या नावाचा कवी होऊन गेला असे सिद्ध होईपर्यंत याच रामदासांची ही रचना आहे. गृहीत तरी धरले पाहिजे. पण हा तार्किक पुरावा झाला. आंतरिक पुरावा जर याला अनुकूल मिळेल तर संशय राहणार नाही.

*शरीर हे विवारिता । कृपाकीटक दुर्गंधिता । मळमूत्र श्लेष्मा रक्ता । पार नाहीं ॥३६ ॥ अस्थिमांसाचा गोळा । आळविता वाटे कंटाळा । गुरुभजने सार्थकी लागला । तरीच बापा ॥३७॥*

ही भाषा समर्थांचीच आणि यातील शैलीही त्यांचीच. त्याचप्रमाणे–

*जो माझा गुरुनाथ । तोचि जगाचा नाथ । सर्वोत्तम विश्वनाथ । गुरुदेव सर्व माझा ।*

यातील 'माझा गुरू' हा भाव समर्थांच्याच शैलीचा द्योतक आहे. 'ते सरी न पवती (५४)' 'सहस्रायुष्य करून (५५), 'गुरुप्रसादे करूनि (५८)' ही करूनि' ची शैली समर्थांचीच.

*हृदयाकासी निर्मळ । स्फटिका ऐसा सोज्वळ । की दर्पणचि केवळ । झळफळण ॥(९३)*

यातील 'झळफळण' हा शब्द खास रामदासी छापाचाच.

'चहाडाचे मुखबंधन (११४)' ही शब्दरचनाही रामदासांच्याच पद्धतीची.

*अभक्त क्रोधी कपटी । कर्णेचि न करी चावटी । देहा कुचरहाटी । पाशांडी जो ॥*

'कुचरहाटी', 'चावटी' या शब्दांचे वळण रामदासांचेच.

*ऐसा आवडी असता । सोडोन जाता कुळदेवता । कीर्ति पुष्टी चिंता । गुरुदेव चि सर्व ॥२७॥*

ही कुळदेवतेची महती रामदासांचेच वैशिष्ट्य.

अशा प्रकारे अंत:साक्ष पुराव्यावरूनही ही गुरुगीता रामदासांनीच लिहिलेली असे मानले पाहिजे.

ही गुरुगीता म्हणजे पार्वतीला शंकरांनी पटवून दिलेले गुरूचे महत्त्व. गीता म्हणजे उपदेश असाच अर्थ येथे घेतलेला आहे. कोणत्या उपायाने ब्रह्मप्राप्ती होईल, असा पार्वतीचा प्रश्न आणि त्या प्रश्नाचे निमित्त करून शंकराने केलेला उपदेश ती ही गीता होय. सद्गुरूशिवाय कोणीच थोर देव नाही, असे अनन्यसाधारण महत्त्व गुरूचे असते हा भाव. गुरूच अज्ञान नाशून ज्ञान देतात. त्रिविध तापांचे निवारण गुरूच करतात. सद्गुरूच्या नामाचा उदय होताच मायेचा नाश होऊन जातो, सकळ पापांचे दहन होते, जन्मकर्म निवारण होते, असा हा तपशीलवार गुरुमहिमा या गुरुगीतेत वर्णिलेला आहे आणि नंतर फलश्रुती आहे.

१४९ ओव्यांत रचिलेली ही गीता मधून मधून अलंकारांनी युक्त आहे.

'कृपेचे सागरु', 'भवसिंधूचे तारण', 'गुरुचरणाचे निवासस्थान तीच काशी', 'गुरू तोच ज्योतिर्लिंग', 'गुरुचरणी मस्तक तोच प्रयोगाचा अक्षय वट ।', 'गुरुचरणीचे तीर्थ तीच भागीरथी', अशा ही छोटी छोटी रूपके गुरुमहिमा भक्तीने वर्णिला असल्याचे सिद्ध करतात. 'संसारकुहरी आगमन । घडे मंत्रनामे (६०)' हे रूपकही छोटे असून प्रत्ययकारी आहे.

*गुरुमुखें ब्रह्म असे । भक्त पावती अनायासें । व्याभिचारिणीचे चित्त जैसे । परपुरुषासी ॥*

यातील उपमा नित्यपरिचयाची असूनही हृद्य आहे. हृदयाकासी निर्मळ । स्फटिका ऐसा सोज्वळ ॥ (९२) यातील स्फटिकाची उपमा सार्थक आहे. अलंकारांच्यापेक्षा या गीतेची रचना सहज आणि सरळ आहे. शब्दांची रूपे अगदी शुद्ध आहेत आणि भाषाही आध्यात्मिक विषयाला साजेशी प्रौढ आहे.

तत्त्वज्ञानाच्या भूमिकेतून सांगितलेली असली तरी या गीतेत भक्तिभावना ही उत्कटपणे व्यक्त झाली आहे. शिवाच्या तोंडीही भक्तिभावना रामासंबंधीच असली पाहिजे, असे वाटते. पण गुरुभक्तीचे श्रेष्ठत्व या गीतेने मनावर बिंबवण्यास अडचण पडू नये. अन्यरसांचा उपयोग या काव्यात अपेक्षितही नाही.



# ११. रामदासांचे कवित्व

'कवित्व शब्द सुमनमाळा' अशी रामदासांची वाणी त्यांच्या काव्यात असल्याचे आपणांस दिसून येते. त्यांचे शब्द 'जाड' तर आहेतच, पण त्याचबरोबर भावगर्भही आहेत. त्यांची भाषा रसवती आहे, ओघवती आहे, त्यांचे अंत:करण भावमय, प्रेममय, उदार, उदात्त आणि व्यापक आहे, त्यांची बुद्धी चतुरस्र आहे, तर्कशुद्ध आहे, त्यांचे ज्ञान सर्वंकष असल्याचा प्रत्यय आल्याशिवाय राहत नाही. त्यांचे काव्य विविधता, विपुलता आणि वैचित्र्यांनी युक्त असून शब्दकळा, रसकळा आणि भावकळा ह्यांचा त्यांच्या काव्यात अभाव नाही म्हणूनच डॉ. श्री. व्यं. केतकरांना रामदासांच्या दासबोधाला 'तो एक ज्ञानकोश आहे' असे म्हणावेसे वाटले. रामदासांचे बोलणे प्रत्ययाचे. त्यांच्या काव्यांना एक प्रकारचे वजन आणि अभिजातता प्राप्त झाली आहे. काव्याची प्रमुख अंगे जी शब्द, अर्थ, अलंकार, रसवत्ता, वर्णन-सौंदर्य, भावोत्कटता, प्रतिमाने, शब्दचित्रात्मकता, व्यक्तिचित्रांचे चित्रण, गांभीर्य, उदात्तता इ. आहेत त्यांत रामदास कोठेही कमी पडत नाहीत. रामदास हे शब्दप्रभू होते, शब्दसृष्टीचे ईश्वर होते, हे त्यांच्या कोणत्याही काव्याची कोणतीही ओवी काढून पाहिल्यास अनुभवाला येते.

## रामदासांची शब्दसंपत्ती

रामदासांनी वापरलेल्या शब्दांचे वैभव अपार आहे. प्राध्यापक ग. के. कानेटकर (गिरीश) यांनी त्यांच्या शब्दशक्तीबद्दल खालीलप्रमाणे उद्गार काढले आहेत :

'त्यांचे (रामदासांचे) अंत:करण, हे आदिशक्तीचे ठेवणे होते, त्यामुळे ते अक्षय आनंदाने व तीव्र तळमळीने वेळोवेळी उतटले आणि त्यांतूनच त्यांच्या शब्दशक्ती प्रगट झाल्या. अंत:करण भाव रसाने उचंबळले म्हणजे तेथे शब्दांचा जन्म आपोआप होतो. कवीला शब्दांसाठी थांबावे लागत नाही. समर्थांचे भाव असेच वेळोवेळी अनेक कारणांनी उतटले व त्यांची अभिव्यक्ती भावपूर्ण, अन्वयार्थक नि सामर्थ्यसंपन्न शब्दांनी झाली. या सामर्थ्यसंपन्नतेच्या बुडाशी ओजस्विता व उत्कटता हे गुण आहेत, हा त्यांचा विशेष पाहण्यासारखा आहे. जे सांगावयाचे असेल ते त्यांनी अत्यंत कळकळीने व ठसठशीतपणे सांगितले आहे. 'कोंवसा, सुघडु (नाना मतांचे), देखणे (पेखणे), ज्ञातेपणे, जाणपणे (आंताचे पडळ), धरभंग, धरवात, अमृतकळा (गालफडे बसणे), चंद्री लागणे, उभड आला, लोंबे मांस चिरगुटासारखे, गालोदे, मंत्रचळ, पडशाळा, हुंबरे, कणव, गोंडाळ, न्याहार या शब्दातील अर्थसौंदर्य व शब्दसौंदर्य मनाला मोहिनी घालणारे आहे.'[१]

## साभिप्राय विशेषणे

रामदास विशेषणे वापरताना ती साभिप्राय असल्याची काळजी घेताना दिसतात. 'अंती विषय वेळ आली,' 'नाथिलीच लागे देह अहंता', 'निखळ निर्गुणी आपण', 'दामोदरे (रत्नखचित) मंदिरे,' 'कवित्व असावे कार्तिवाड,' 'मौनगर्भ अनुमाना आणून सोडी', 'ते लुलू बराडे

बापुडी', इत्यादी मराठी वळणाचे शब्द योजण्यात रामदासांचा हात धरणारा कवी क्वचितच असेल. रामदासांचे शब्द सुंदर असतात. अर्थपूर्ण असतात आणि सामासिक असले तरी सोपे असतात. मराठी वळणाची शब्दघडण हे समर्थांच्या शब्दांचे एक वैशिष्ट्य आहे. शब्दांनी प्रतिमा उभी करता येते. रामदासांनी अशा अनेक प्रतिमा अथवा शब्दचित्रे उभी केली आहेत आणि त्याचबरोबर नादानुसारी शब्दरचना करून आपल्या काव्यातून त्यांनी प्रयत्नकारिताही साधली आहे.

विनोदबुद्धी– रामदासांच्या काही शब्दांतून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे दर्शन घडून जाते. गंभीर विषयाचे विवेचन चालू असता मध्येच विनोद करण्याची त्यांची बुद्धी जागी होते.

रामदासांची समर्थ शब्दयोजना ही संशयातीत आहे आणि त्या शब्दांच्या योगाने, तसेच त्यांच्या अंत:करणातील तळमळ, उत्कट भावात्मकता, व्युत्पन्नता, मतांची-विचारांची निश्चितता, उपासनामार्ग व फलश्रुती या गुणांमुळे त्यांच्या भाषेला एक प्रकारची धार आली आहे. रामदासांचे प्रत्ययाचे बोलण असल्याने त्यांच्या विधानात डळमळीतपणा, गुळमुळीतपणा, अनिश्चितता, विचारांचा कच्चेपणा या गोष्टी कधीही कोठेही आढळणार नाहीत. निश्चितपणा हा त्यांच्या भाषेचा विशेष आहे असे म्हटले तरी चालेल.

## भाषेची शुद्धाशुद्धता

रामदासांची भाषा अशुद्ध, ओबडधोबड असते असे अनेक वेळा म्हटले जाते. परंतु त्यांनी उपयोजिलेल्या शब्दांचा विचार करताना हे पाहिले आहे की त्यांच्या भाषेतील शब्द हे बहामनी-कालीन व शिवकालीन आहेत. भाषाशास्त्रीय अभ्यासात शुद्धाशुद्धतेचा विचार वेगळ्या रीतीने करावा लागतो. रूढ असलेल्या भाषेचा उपयोग केला तर त्यात अशुद्धतेचा दोष येत नाही. 'मंदिर' हा शब्द आता शुद्ध आहे आणि 'मंदीर' हा अशुद्ध. पण काही वर्षांपूर्वी ही स्थिती नव्हती. तेव्हा शुद्धाशुद्धतेचा विचार कालसापेक्षाने करावा लागतो. वेवस्ता, पराधीनता, आकोंचन, गायेमुख, संव्हार, वौंश इत्यादी शब्दांची रूपे बहामनी व शिवकालीन रूढ असलेलीच उपयोगात आणली तर अशुद्धतेचा दोष रामदासांवर लादणे न्याय्य होणार नाही. तसेच रामदासी वाङ्मयाचे ग्रंथ ज्या हस्तलिखितांवरून छापण्यात आले ती हस्तलिखिते ज्या शिष्यांनी तयार केली त्यांच्या शुद्धलेखनासंबंधीच्या अज्ञानाचा परिणाम म्हणून ती हस्तलिखिते अशुद्धच लिहिली गेली आहेत.

## सुभाषितत्व

रामदासांच्या वाङ्मयात असे अनेक उद्गार सहजतेने येऊन गेलेले आहेत की जे मराठी भाषेत सुभाषिते म्हणून प्रचारात आलेले आहेत आणि प्रचारात येण्यास पात्रही आहेत. या सुभाषितांत विचारांचे एक आगळे सौंदर्य असते. विचारही तितकाच महत्त्वाचा व प्रभावी असतो आणि त्याला दिलेली भाषेची जोडही तितकीच मनोहर असते. हे विचार सिद्धान्तस्वरूप असतात. गांभीर्य हा त्यांचा स्वभाव असतो. सखोलपणा हा त्यांचा धर्म असतो आणि या अर्थाने सुभाषिते ही काव्यरूप असतात.

(१) *स्नेहे तुटला तो क्या हा अडेना ।*[२] (२) *जना मनांवाचुनि सू- नाहीं । मनेंचि लाभे गुज सर्व काहीं ।*[३] (३) *क्रिया भ्रष्ट ते नष्ट जाणोन घ्यावे ।*[४]

## भावचित्रे

रामदासांनी शब्दचित्रांप्रमाणे भावचित्रेही सुंदर रेखाटली आहेत. काही भावचित्रे शब्दचित्रातच अंतर्भूत झालेली आहेत, तर काही स्वतंत्र आहेत. 'वृद्धापकाळ' हे वर्णन इतके शब्दचित्रात्मक आहे तितकेच ते हृदय हेलावून टाकणारे आहे. 'अहल्योद्धार' या काव्यात अहल्येच्या मनांतील भावांचे चित्र थोड्याच शब्दांत पण प्रभावीपणे रंगविले आहे. राम वनवासाला निघाला आहे. कौसल्या आई आहे. तिच्या दु:खाची सरी कशी वर्णन करता येईल? तिला वाटणारी चिंता ही सुद्धा नीटपणे व्यक्त करणे कठीण आहे. रामदासांनी हे भावचित्र यशस्वीपणे रंगविले आहे.

## शब्दचित्रांची रूपडी

रामदासांची शब्दचित्रेही मन:चक्षूपुढे प्रत्यक्ष दृश्ये उभी करतात.

'प्रपंचाचे वेड' हे एक आगळे शब्दचित्र आहे. हे भावचित्राशी संमिश्र आहे. शिवाय सृष्टीचा नाही, तर सामान्यबद्ध माणसाच्या प्रपंचाचा मोहाचा-वेडाचा आहे आणि अगदी साध्या भाषेत रंगविलेले आहे. 'निद्रा' हा समास शब्दचित्राचे उत्कृष्ट उदाहरण आहे. त्यात रामदासांच्या सूक्ष्म निरीक्षणाचाही प्रत्यय अत्यंत उत्कटपणे येतो. शिवाय रामदासांनी हास्यरसाची निर्मितीही त्यात स्वाभाविकपणे केली आहे. बीभत्सरसाचेही ओझरते दर्शन त्यात होते. झोपेत मनुष्य बेसावध असल्यामुळे त्याच्या देहाची कसकशी अवस्था होते याचे वर्णन मार्मिक आणि उत्कृष्ट आहे. रामदासांनी दिलेल्या उपमा काही वाक्योपमा असतात, तर काही केवळ शब्दोपमा असतात. पण शब्दोपमा असल्या तरी त्यांतून एक प्रतिमा निर्माण होते आणि उपमेचे सार्थकत्व लक्षात येते. मुंग्यांच्या वारुळाची उपमा अशीच. पोकळपणा-शून्यत्व हेच वारुळाचे वैशिष्ट्य. शरीर म्हणजे तरी काय? वारुळाव्यतिरिक्त त्यात कसले वैशिष्ट्य? या उपमेत वारुळाची प्रतिमा निर्माण झाली आहे हे स्पष्ट आहे. काही उपमा पूर्णोपमा आहेत तर काही लुप्तोपमा आहेत. काही मालोपमाही आहेत. रामदासांनी या अलंकाराचा अभ्यासपूर्वक उपयोग केल्याचे दिसून येते. या उपमा किंवा अन्य अलंकार मुख्य विषयाशी इतके तदात्म झाले आहेत की त्यांना वेगळे काढता येत नाही, म्हणजेच त्या-त्या उपमा बाजूला केल्या की मुख्य अर्थ हा प्रेतवत् वाटतो. आणि म्हणूनच म्हणावेसे वाटते की रामदासांचे कवित्व हे अलंकार घेऊनच जन्माला येते. स्वतंत्रपणे अलंकारांचा शोध घेऊन मग मूख्यार्थावर साज चढवायचा या प्रकारचे नाही.

या रूपकांपैकी काही सांगरूपके आहेत तर काही शब्दरूपके आहेत. उपमा-रूपकांची जितकी पखरण रामदासांच्या साहित्यात झाली आहे, त्याहीपेक्षा अधिक प्रमाणात दृष्टान्ताची पखरण झाली आहे. रामदासांची प्रतिमा दृष्टान्त-संपन्न आहे, हे सहज दिसून येईल. हे दृष्टान्त जसे व्यवहारातील, प्रपंचातील, निसर्गातील आहेत तसेच काही पारमार्थिकही आहेत. दृष्टान्त देताना विवेचनाचा ओघ कोठेही खंडित झालेला नाही. तो तसाच पुढे अनुस्यूत चाललेला आहे. अशा ओघातच काही काही समास संपले आहेत. प्रतिभेची कृत्रिमता मुळीच नसल्याचे हे द्योतक आहे. विरोधाभास, उत्प्रेक्षा, चेतनोक्ती, व्यतिरेक असे काही अन्य अर्थालंकारही आहेत.

## वर्णनकौशल्य

विषय कोणताही असो, रामदास त्याचे वर्णन करू लागले की, त्यात जिवंतपणा आलाच असे खुशाल समजावे. त्यांचा हस्तस्पर्श होताच वर्णनात जादू भरल्यासारखी होते. सृष्टिसौंदर्याचे वर्णन असो, म्हातारपणाचे असो, कौसल्येच्या अंतर्मनाचे असो, युद्धवर्णन असो, परिणामकारकतेने वाचकांच्या अंत:करणापर्यंत ते सहज पोचते. शब्दांची निवड, भाषेचा ओघ, अंत:करणातील तळमळ इ. अनेक गुणांनी युक्त असल्यामुळे ही वर्णने उत्कृष्ट काव्यपूर्ण होतात. वर्णनात बारीकसारीक तपशील तरी असतील, किंवा त्या-त्या पदार्थातील सौंदर्याचा जो प्रभाव रामदासांच्या अंत:करणावर झालेला असेल तो तरी आत्मीयतेने व्यक्त केलेला असेल किंवा एखाद्या व्यक्तीच्या मनातील करुण किंवा अन्य भावांचे सूक्ष्म वर्णन तरी असेल, समर्थ करुण किंवा सूक्ष्म वर्णन या सर्वांशी समरस होतात आणि म्हणून या वर्णनातील अनुभूती प्रामाणिक असल्याचे रसिकांना जाणवल्याशिवाय राहवत नाही.

(१) *थोरपणासि पाडिलें । वैभवासि लिथाडिलें । महत्वासि झिंजाडिले । विरक्ति बळें ।। भेदाचा मडघा मोडिला । अहंकार सोडूनि पाडिला । पाई धरून आपटिला । संदेह शत्रु ।*

हाही समास शेवटपर्यंत अशाच वीरश्रीयुक्त वर्णनाने भरलेला आहे. आलंकारिक असूनही ह्या वर्णनातील आवेश उत्साह उत्पन्न करणारा आहे. वीररसात्मक वर्णनात अध्यात्म रंगविणे ही रामदासांची हातोटी इतरत्र क्वचितच दिसेल.

(२) *पृथ्वीस होईल अंत । भूतांत मांडेल कल्पांत । ऐसा समाचार साद्यंत । शास्त्री निरोधिला ।।*

या समासात प्रलयाचे वर्णन प्रलयकारी आहे. ओघवत्या भाषेत केलेले आहे, शब्दचित्रात्मक आहे.

## रसवत्तेचा अमृतकलश

नवरसांमध्ये वीररस हा रामदासांचा आवडता रस असला तरी अन्य रसांची निष्पत्तीही त्यांच्या काव्यसृष्टीत झालेली आहे. याहीपेक्षा 'हरिरस' किंवा 'ब्रह्मरस' हा त्यांचा प्रिय रस. ब्रह्माचे वर्णन करताना समर्थ कंटाळत नाहीत. जितक्या विविध प्रकारे ब्रह्माचे वर्णन करणे शक्य होते तितक्या प्रकारे त्यांनी ते अगदी तदात्म होऊन केले आहे. सीतेच्या दुःखाचे करुणरसातील हृदयद्रावक वर्णन, अहिरावण-महिरावण युद्धातील रामलक्ष्मणांना बळी देतानाचे त्यांचे करुण चित्र, सती सुलोचनाच्या मनोभंगाचे दारुण चित्र, लंकेत हनुमानाने केलेल्या रावणाच्या फजितीचे हास्यचित्र, श्रीरामाचे अनेक ठिकाणी केलेले भक्तिरसयुक्त वर्णन, संसारात गुरफटलेल्या बद्धाच्या संसाराचे धिंडवडे निघाले त्याचे मार्मिक चित्रण, गोपींच्या शृंगाराचे वर्णन अशी कितीतरी रसयुक्त वर्णने रामदासांच्या काव्यविश्वात आढळतात.

*तुवां आशंका नाही घेतली । परंतु मज तुझी चिंता लागली ।।* आ. १-२९

(२) *माझे आराध्य दैवत । परमगुह्य गुह्यातीत । गुह्यपणाचीही मात । न चळे तेथें ।। जे स्पर्शलें नाही वेदवाणीं । जे वर्णवेना सहस्रफणी । जेथे अनुभवाची कडसणी । आटोनि जाये । जे शब्दास अवोडन । जे निज शब्दांचे बीज । जे शंकराचे गुज । समाधी शोभा ।।*

## आत्माविष्कार

रामदासांची एकही कविता अशी नाही की जीत आत्माविष्कार प्रकट झालेला नाही. या दृष्टीने पाहिल्यास त्यांची सारी कविता म्हणजे त्यांचे व्यापक आत्मचरित्रच आहे. त्यांनी घेतलेल्या जीवनानुभवांवरच त्यांची सारी काव्यसृष्टी उभी आहे. त्यामुळे तर त्यांच्या काव्याला एवढे तेज आले आहे. हे तेज अनुभूतीचे, सहानुभूतीचे आहे, प्रेम-भक्तीचे आहे. जगदोद्धाराविषयी वाटणाऱ्या जिव्हाळ्याचे-कळकळीचे आहे. रामदासांची कविता त्यांच्या जीवनातून निर्माण झाली आहे. म्हणून ती जिवंत आहे. त्यांना ईश्वरी साक्षात्कार, त्यांना भोगावी लागलेली शारीरिक व मानसिक दु:खे, त्यांची रामभक्तीची उत्कटता, तीर्थयात्रेत पाहिलेले अत्याचारांचे भीषण प्रसंग असे कितीतरी प्रसंग त्यांनी आपल्या काव्याचे आधार म्हणून उपयोगात आणलेले आहेत. त्यांनी मनाला केलेला उपदेश तर त्यांच्या मन:स्थितीचे उत्कृष्ट दर्शन घडवितो.

## परतत्त्वाचा स्पर्श

प्रसंग आणि अनुभूती यात फरक आहे. जीवनात अनेक प्रसंग येतात. सर्वांच्याच जीवनात येतात. पण त्या प्रसंगाची उत्कटता कवीला जाणवते तेव्हा तो प्रसंग कवीची अनुभूती बनतो. रामदासांनी अशा अनेक प्रसंगांचे अनुभूतीत परिवर्तन केले आहे. परमार्थ हा त्यांचा आवडता विषय. लहानपणी झालेल्या साक्षात्कारावर संतुष्ट न राहता त्यांनी साधना कायम चालू ठेवली आणि आपल्या कवितेला सुद्धा परतत्त्वाचा स्पर्श घडविला. उदात्तता हा त्यांच्या काव्याचा गुण या परतत्त्वाच्या स्पर्शानेच आलेला आहे. श्रीरामचंद्राच्या वर्णनात साक्षात्काराचे अनेक क्षण प्रतिबिंबित झाले आहेत आणि आपल्या कवितेत त्यांनी या क्षणांना प्रकाशित करून टाकले आहे.

## ओघवती भाषा

रामदासांच्या भाषेचा ओघ अखंडपणे चाललेला आहे. त्यात कोठेही अडथळा नाही, खंड नाही. अनुस्यूतपणे प्रवाह चालला आहे. प्रतिभाशक्ती काम देत नाहीशी झाली असे कधीच घडले नाही, 'शब्दांनो, मागुते या' असे म्हणण्याची कधी पाळी आली नाही, ते भावनेने भारावून जातात आणि कविता संपेपर्यंत थांबण्याचे नाव घेत नाहीत. एकामागून एक अशा कल्पना त्यांना सुचत जातात आणि सारे काव्य सुंदर आकार धारण करते. या ओघवती भाषेमुळेच त्यांची कविता अधिक आकर्षक झालेली आहे. ओघात जेवढा तपशील येईल तेवढा सर्व ते मांडून टाकतात. भाषेच्या या प्रवाहात सर्व भावभावना पुनीत होऊन जातात.

उदा. *प्रपंची खाती जेविती । परमार्थी काय उपवास करिती । उभयतां सारिखे दिसती । विषया विषई ॥* दा. ११-७-५ *फुटक मन एकवटिले । तेणे तुटक ध्यान केलें । तेथ कोण सार्थक जालें । पाहाता का? ॥* १४-८-३६

## जीवनाचे भाष्यकार : रामदास

रामदासांचे कवींतील स्थान वेगळेच आहे. काव्यासाठी काव्य त्यांनी कधीच केलेले नाही. केवळ स्वत:चेच जीवन न्याहाळून त्यांनी काव्यातून ते गुंफले असे नाही, तर उघड्या डोळ्यांनी

समाजाची सारी सुखदुःखे पाहिली, न्याहाळली, आणि खऱ्या अर्थाने त्यांच्याशी सह-अनुभूती अनुभवली. ती अनुभूती आपोआपच काव्यमय रूप घेऊन प्रकट झाली. खऱ्या कवीला काव्यविषय केवळ स्फुरत नाही, तर पश्यन्ती वाणीला तो प्रत्यक्ष समोर दिसतो. म्हणून तर 'पश्यन्ती' असे नाव त्या वाणीला पडले नसेल? तत्त्वज्ञानात पश्यन्तीचे कार्य काय असेल ते असो, पण रामदासांसारख्या कवीला तरी समाजाचे विदारक चित्र मूर्तिमंत दिसत होते आणि कळवळा येऊनच त्यांनी आपल्या काव्यातून शिष्याला माध्यम करून उपदेश केला. बद्ध, मुमुक्षु, साधक, सिद्ध, मूर्ख, पढतमूर्ख, करंटा, उत्तम पुरुष, महंत, ढोंगी, बहुधा गोसावी, राजा-धर्माचा कैपक्षी राजा, गबाळ राजा, कामाला न जाणारा साहेब, श्रोता, वक्ता, भक्त, भोंदू, तारुण्यावस्था, वृद्धापकाळ, रोगी-निरोगी माणसे, जन्म-मृत्यूचे दुःख, संसारात होणारी परवड, संसाराचे वास्तवचित्र, मायामोहाचा परिणाम, बाष्कळपणा, मत्सरग्रस्त लोक, व्यवहारज्ञान, कवित्व लक्षण, लेखन-अक्षर याबद्दलचा उपदेश, ग्रंथ लक्षणे व ब्रह्मस्वरूप सगुण-निर्गुण वर्णने, नवविद्या भक्तीचे तपशिलासह वर्णन, सृष्टिवर्णने, रामकृष्ण चरित्रे, शृंगारासहित नवरसांची वर्णने, अशा प्रकारचे जीवनाचे विविध पैलू रामदासांनी आपल्या कवितेत प्रकट केले आहेत आणि जीवनाचा अर्थ नीट तपासून पाहून समजावून दिला आहे. डॉ. केतकरांनी दासबोधाला ज्ञानकोश हे नाव दिले आहे. पण तो केवळ ज्ञानाचा कोश नाही, तर भाष्यासहितचा कोश आहे. सर्व समाजाला उपदेश करून त्याची उन्नती करण्यासाठी रामदास कटिबद्ध झाले आणि आपल्या हयातभर उद्योगाने तो उद्देश पार पाडला.

रामदास निराश कधी झाले नाहीत असे नाही. परिस्थितीच इतकी भयानक होती की निराशा आली नसती तरच आश्चर्य होते. परंतु निराशेचा हा स्पर्श त्यांनी इतरांना होऊ दिला नाही. निराशा ते पचविली आणि उत्साह, आशा, महत्त्वाकांक्षा, कर्तव्यनिष्ठा, उत्कटभक्ती या जोरावर सारा समाज चैतन्ययुक्त करून टाकला. चाफळच्या उत्सवाचे वर्णन हे केवळ रथोत्सवाचे वर्णन नाही, तर त्यांनी केलेल्या चैतन्योपदेशाचे, स्फूर्तीचे, उत्साहाचे मूर्तिमंत दृश्य होय आणि हे परिणामफळ 'दास डोंगरी' राहूनच देवाच्या यात्रेच्या रूपात पाहातो असा त्याचा सूचितार्थ आहे. जीवनाचे भाष्यकार, जीवनाचा प्रत्यक्षोपदेश देणारे, जीवन घडविणारे, जगदोद्धार करणारे रामदास अन्य संतकवींहून वेगळे वाटल्यास आश्चर्य नाही.

## रामदासांच्या काव्यावरील आक्षेप आणि परामर्श

रामदासांच्या काव्यसंपदेवर मुख्यतः पुढील आक्षेप आजवर घेतले गेले आहेत :

(१) रेखीव अवयव नसलेला, कलाकुसरीचे अलंकार नसलेली अशा स्त्रीप्रमाणे समर्थांची भाषा आहे.[५]

(२) मृदु, मंजुळ, कोमल, गौत्य, माधुर्य, रसाळ असे कवित्व असावे असे ते (रामदास) म्हणतात. शब्दांचे अर्थ कितीही ताणले, तरी हे शब्द रामदासांच्या कवित्वास लागू पडणारे नाहीत. कवित्व कसे नसावे याबद्दलचे रामदासांचे पुढील उद्गार पाहण्यासारखे आहेत : 'कवित्व नसावे पाल्हाळ', 'बोलिलेंचि न बोलावें', 'छंदभंग न करावे' 'कवित्व नसावे रसभंग', 'दृष्टान्तहीन'– हे निषेधाचे उद्गार बहुतांशी त्यांच्या स्वतःच्याच कवितेचा निषेध करीत आहेत असे वाटते.[६]

(३) एकंदर विचार केला असता, दासबोध हा ग्रंथ काव्य नाही. ह्या ग्रंथाचे रूप पद्य आहे, परंतु ह्यात जे विषय निरूपिले आहेत ते काव्याचे विषय नाहीत.[७]

श्री. यशवंत रामचंद्र दाते, प्रा. रा. श्री. जोग व इतिहासचार्य राजवाडे यांचे रामदासांच्या कवित्वावरील आक्षेप वर दिलेले आहेत.

रामदास हे भिन्न भिन्न रसांच्या निर्मितीच्या वेळी कशी अनुकूल भाषा वापरतात याची उदाहरणे याच प्रबंधात अनेक ठिकाणी येऊन गेली आहेत. जेथे जनसामान्यांना उपदेश करावयाचा तेथे रांगड्या भाषेचाच प्रयोग युक्त होय. जेथे काव्यात भाव मांडायचे आहेत तेथे भाषेचा फुलोरा अंलकारांनी नटविणे योग्य होय. रामदासांनी हे तारतम्य पाळलेले आहे. परंतु रामदासांची सारी कविता वाचून विधान करण्याची काळजी कोणीच न घेतल्याने आक्षेपकांना रामदासांची भाषा सर्वच ठिकाणी रांगडी, कलाकुसरीचे अलंकार न ल्यालेल्या स्त्रीसारखी वाटल्यास नवल काय? रामदासांच्या भाषेत रांगडेपणा आहे– अवश्य आहे. पण जेथे विचार बळकटपणे मांडावयाचे आहेत, समोरच्या जनसामान्याच्या बुद्धीला व परंपरागत अज्ञ समजुतीला धक्का द्यावयाचा आहे, मढ्यासारख्या अवस्थेत जातिवंत चैतन्य निर्माण करावयाचे आहे तेथे गौलपता, माधुर्य नसणे उचित आणि मग रामदासांची भाषा रांगडी, अलंकारविहीन आहे असे म्हणण्यात काय अर्थ आहे. डॉ. रा. श्री. जोगांनीही असे आक्षेप घ्यावेत याचे मात्र आश्चर्य वाटते. कारण त्यांच्यासारख्या एका काव्यमर्मज्ञ रसिकाने दासबोध सोडून इतर ग्रंथांतील काव्य वाचून मग असे आक्षेपार्ह विधान करावयास हवे होते. दासबोध हा ग्रंथ उघड उघड तत्त्वज्ञानप्रधान, उपदेशांचा ग्रंथ आहे. त्यात काव्याची अपेक्षा करणेच चुकीचे आहे. या सर्व टीकाकारांच्या नजरेसमोर 'ज्ञानेश्वरी' हा ग्रंथ असतो आणि ज्ञानेश्वरीचा निकष लावून त्या मापाने सर्व ग्रंथाची परीक्षा ते करतात. असे केले तर मराठीतील एकही ग्रंथ काव्यग्रंथ म्हणून मान्यता पावणार नाही. पण प्रत्येक ग्रंथाचे कार्य वेगळे असते हे लक्षात घेऊन त्याचे मूल्यमापन केल्यास जोगांनाही आपले आक्षेप मागे घ्यावे लागतील असे वाटते. करुणाष्टके, धाट्या, सवाया, मनाचे श्लोक, अध्यात्मपर लघुकाव्यातील काही काव्ये, दासबोधातील सगुणपरीक्षादी अन्य समास, दृष्टान्तमाला, रूपके, शब्दचित्रे, व्यक्तिरेखा, रामायणातील युद्धवर्णन, स्वभावरेखा, भावचित्रे, शब्दचित्रे, आत्माविष्कार, कृष्णचरित्रातील माधुर्य व शृंगाराचे वर्णन अशी अनंत उदाहरणे काव्यशक्ती म्हणून देता येणे शक्य असताना तिकडे दुर्लक्ष करून रामदासांच्या कवित्वशक्तीवरच आक्षेप घेणे औचित्याला सोडून आहे. यामुळे रामदासांवर अन्याय झाला आहे हे स्पष्ट आहे. श्री. राजवाडे यांचाही आक्षेप 'दासबोधा'वर आधारलेला आहे. यामुळे जोगांच्या आक्षेपांचे निरसन केले आहे तेच राजवाडे यांच्या आक्षेपालाही लागू आहे. रामदास हे कवी होते, उत्कृष्ट कवी होते, काव्यशक्तीत इतर संतकवींहून ते कमी नाहीत असे म्हणणेच बरोबर आणि न्याय्य होईल.



# १२. रामदासांचे विभूतिमत्त्व

रामदासांच्या काव्यसृष्टीचा अभ्यास करताना त्यांच्या कवित्वशक्तीचा जसा परिचय होतो तसाच त्यांच्या विभूतिमत्त्वाचाही साक्षात्कार होतो. रामदास हे आपल्या समकालीन कवींत तर मोठे होतेच, पण पूर्वसूरींच्यापेक्षाही त्यांच्यात काही आगळे-वेगळे गुण होते, त्यांच्याहून रामदासांचे कार्यही वेगळे होते. त्यांच्या काव्यांच्या आधारेच त्यांच्या विभूतिमत्त्वाचाही तुलनात्मक विचार करावा असे वाटते.

या तुलनेत पूर्वसूरींच्या कर्तृत्वाचा, कवित्वाचा अथवा विभूतिमत्त्वाचा अधिक्षेप करावा असा अर्थातच उद्देश नाही. नामदेव, ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकारामादी संत आपापल्या परीने महान संत होते, त्यांचे कार्य आणि काव्य अलौकिक होते, याबद्दल कसलीच शंका वाटण्यासारखी नाही आणि रामदासांचे विभूतिमत्त्व पाहात असता या महान संतांच्या संबंधी चुकूनही अपमानाचा शब्द निघावा असे वाटणे शक्य नाही. येथे रामदासांच्या व्यक्तिमत्त्वाचा – विभूतिमत्त्वाचा विचार अगदी स्वतंत्रपणे केला आहे. गोरखनाथ, एकनाथ, तुकाराम इ. महान विभूतींशी रामदासांची तुलना एवढ्याचकरिता करावीशी वाटते की त्यामुळे रामदासांच्या महानत्वाची कल्पना यावी.

## रामदास आणि गोरखनाथ

श्री समर्थांवर गोरखनाथांची कृपादृष्टी होती असे भीमस्वामींनी नमूद करून ठेवले आहे. भक्तलीलामृतातील एका अभंगात खालीलप्रमाणे उल्लेख आहे–

*"मनीं आले कांही हत्यार असावे । गोरखस्वभावें आले तेथे ।। तीरकमटा त्यांनी दिधला हातांत । ऐसी मार्गाआत चिन्हे जालीं ।।*[१]

यातील हकीगत खरी असो वा काल्पनिक, रामदासांच्या शिष्यांत रामदास आणि गोरखनाथ यांच्याविषयी काय धारणा होती यावर या अभंगाने प्रकाश पडतो. गोरखनाथांचा काळ आणि रामदासांचा काळ लक्षात घेता दंतकथेचा आधार संपतो. अद्भुताचा विचार करण्याचे येथे कारण नाही. पण गोरखनाथांचे कार्य रामदासांना मार्गदर्शक झाले असण्याचा संभव आहे.

गोरखनाथ म्हणजे खरोखरच एक प्रभावी व्यक्तित्व होते. लहान वयातच योगी जीवनाचा स्वीकार करून गोरखनाथांनी आमरण ब्रह्मचर्य व्रताचे पालन केले. गायनवादनात ते प्रवीण होते. मच्छींद्रनाथाला जागृती आणण्याचे काम त्यांनी मृदंग वाजवूनच केले. स्वयंप्रज्ञा, मौलिक अध्ययन, चिंतन आणि लोककल्याणाची तळमळ यांमुळे त्यांच्या वाणीला तप:पूत तेज चढले होते. त्यांनी आपले अनेक शिष्य निर्माण केले होते. गोरखनाथांनी ग्रंथही विपुल लिहिले. संस्कृत आणि प्राकृतही. "गोरखनाथांचा पंथ हा आत्म्याचे अमरत्व अनुभवणे, नादमधूचा आनंद भोगणे व शिवशक्तीच्या सामरस्याचा आनंद भोगणे याकरिता आहे."[२] असे गोरखाच्या नाथ पंथाचे उद्दिष्ट होते. "गोरखनाथ ही मध्ययुगीन भारतातील एक प्रभावी शक्ती होती. त्याची संघटनशक्ती अपूर्व होती. मध्ययुगीन भारतात गोरखाइतके श्रेष्ठ व्यक्तिमत्त्व असलेला दुसरा

पुरुष आढळणार नाही. स्फटिकासारखे निष्कलंक चारित्र्य व कुशाग्र बुद्धिमत्ता यामुळे त्यांचे तेज वाढले होते. या काळात भारतीय साधना अध:पतित झाली होती. गोरखनाथाने मृत्युंजयी निग्रहाने वज्रकठोर सत्यनिष्ठेने भारतीय साधनेचे उत्थान घडविले आणि तिच्यात नवी प्राणशक्ती ओतली.''[३]

रामदासांनीही बालवयात तपश्चर्येला प्रारंभ केला, आमरण कडकडीत ब्रह्मचर्य पाळून स्वत:च्या हिमतीवर परमेश्वराचा साक्षात्कार करून घेतला. सारे जीवन संयमाने ब्रह्मचर्य व्रताने घालवून साधनेने स्वत:ची शक्ती अमर्यादपणे वाढवून ती सारी शक्ती धर्मकारणासाठी, जगदोद्धारासाठी, राजकारणासाठी उपयोगात आणली. अमूल्य ग्रंथ निर्माण केले आणि आसेतुहिमाचल हिंडून कार्यक्षेत्र निश्चित करून जीवनभर हाती घेतलेले जगदोद्धाराचे काम तडीस नेले. रामदासांना योगीही म्हणतात. गोरखनाथ आणि रामदास यांच्यात विलक्षण साम्य आहे. रामदास हे सोळाव्या शतकातील गोरखनाथच होते असे म्हटले तर वावगे होणार नाही.

## रामदास आणि एकनाथ

एकनाथ आणि रामदास हे दोन भिन्न पिढ्यांचे प्रतिनिधी होते. दोघांचे कार्य मौलिक स्वरूपाचे आहे. एकनाथांची वृत्ती शांत व सौम्य होती. रामदासांचा स्वभाव निर्भिड व सडेतोड होता. एकनाथांच्या वेळेस समाजात स्वाभिमानाचा व स्वत्वभावनेचा नुकताच उदय होत होता. रामदासांच्या काळात मराठा शिलेदार स्वातंत्र्याच्या दिशेने दौडू लागला होता. अशा स्थितीत दोघांच्या कार्यपद्धतीत फरक पडला तर आश्चर्य नाही. एकनाथांचे धोरण धीमेपणाचे व सहिष्णुतेचे असल्याने त्यात कुठेही 'हलकल्लोळ' नाही. म्हणून स्थूल दृष्टीला त्यांच्या विवेकशीलतेत व सौजन्यात दुबळेपणाचा अंश दिसतो. परंतु एकनाथांची मनोवृत्ती जितकी उदार व कोमल आहे तितकीच ती खोल व खंबीर आहे. दोघेही समर्थच आहेत. पण त्यांचे सामर्थ्य एकाच तऱ्हेचे नाही. एकनाथांच्या वाणीत प्रबोधक शक्ती आहे, तर रामदासांच्या वाक्प्रवाहात प्रक्षोभक तेज आहे. दोघांच्याही अंत:करणात धर्मसंस्थापनेची आच आहे. मात्र एकनाथांच्या दृष्टीत आत्मसंरक्षणाचा निर्धार आहे. पण रामदासांच्या पवित्र्यात आक्रमणाची आकांक्षा आहे. एकनाथांनी लोकसंग्रहाचा उपक्रम केला, रामदासांनी मजबूत संघटना बांधली. एकनाथांनी समाजाच्या अंतरंगाची निगा राखली, रामदासांनी बाह्य जीवनाला बळकटी आणली.''[४]

''रामदासांनी महाराष्ट्राला बलोपासनेचा मंत्र दिला. शक्तीला बुद्धीची जोड हवी, त्याशिवाय पराक्रम यशस्वी होणार नाही असे त्यांनी वारंवार प्रतिपादिले. 'विवरावेचि विवरिले पुन:पुन्हा' या न्यायाने पुन:पुन्हा विवेकाचे विवरण केले. दुबळ्या जीवांना जगात कोणी वाली नाही. 'समर्थांची नाही पाठी, तयास भलता कुटी' याच नैतिक आणि भौतिक अशा दोन्ही प्रकारच्या सामर्थ्याची जोपासना केली पाहिजे.... समर्थांचा शिष्यपरिवार फार मोठा होता... लोकसंग्रहाची हातोटी त्यांना (समर्थांना) उत्कृष्ट साधली होती.... रामदासांनीच महाराष्ट्रात, कदाचित भारतातही, संघटितपणे धर्मस्थापनेचे कार्य करण्याची प्रथा निर्माण केली.''[५] समर्थ बालब्रह्मचारी तर एकनाथ प्रापंचिक. तथापि एकनाथ संसारी असूनही तपस्वी होते. रामदास ब्रह्मचारी असूनही राष्ट्राचा-समाजाचा प्रपंच त्यांनी जीवनभर रेटीत नेला आहे. धार्मिक प्रवृत्तीत कोणी कोणाला हार जाणारे नव्हते. साक्षात्कार दोघांनाही झालेला. आध्यात्मिक पातळी दोघांचीही सारखीच उंचावलेली. एकनाथांच्याबद्दल समर्थांच्या मनात नितांत आदर वसत असलेला दिसतो. रामदासांची राजकीय

कामगिरी एकनाथांच्या राजकीय कामगिरीपेक्षा अधिक होती असे म्हणावे लागते. रामदास हे एकनाथांप्रमाणेच प्रत्यक्ष विभूती होते.

## रामदास आणि तुकाराम

"बाह्य दृष्टीने पाहाता तुकाराम व रामदास यांच्या चरित्रात, स्वभावात, जीवनक्रमात व एकंदरीत मनाच्या बैठकीतही विलक्षण तफावत दिसते. एक संसारी, तर दुसरा नि:संग; एक स्वत:चा प्रपंच करताना टेकीस आलेला, तर दुसरा सबंध राष्ट्राचा प्रपंच करण्याची उभारी धरणारा; एक दरिद्री, तर दुसरा वैभवशाली; एकाचे दैन्य कधी फिटले नाही, तर दुसऱ्यास दैन्य कसे ते ठाऊक नाही; एकाने देहू गाव कधी सोडले नाही, तर दुसऱ्याने कोणतेच गाव कायमचे धरले नाही. एकाची परंपरा बेताबाताची, तर दुसऱ्याची अफाट, म्हणजे थेट तंजावरपर्यंत जाऊन पोचणारी; एक घरी चालून आलेला राजाश्रय अव्हेरतो, तर दुसरा प्रत्यक्ष शिवरायास पाठीशी घालतो; एकाची ग्रंथरचना एकरंगी व एकनादी, तर दुसऱ्याची वैचित्र्याने व विविधतेने परिपूर्ण." परंतु दोघांचे पारमार्थिक अंतरंग पाहिल्यास ते अगदी एक आहे याची साक्ष पटेल... ते आतून एक आहेत. त्यांचा पारमार्थिक अनुभव एक आहे, त्यांची पारमार्थिक निष्ठा एक आहे. दोघेही आत्मानुभवी संत आहेत, सर्वसामान्य मानवी मनात अखंड चालू असणारा झगडा या दोन असामान्य मनांतही चालू आहे, म्हणून ते एक आहेत.

तुकाराम आणि रामदास या दोघांची पारमार्थिक चरित्रे पाहिल्यास त्यांच्या पारमार्थिक जीवनाचे प्रारंभ भिन्न दिसले तरी त्यांची परिणती एकच आहे असे दिसून येईल... तुकाराम प्रारंभी आर्त भक्त दिसतात, तर रामदास जिज्ञासू भक्त वाटतात.. दासांचे दु:ख विश्वात्मक आहे. तुकाराम स्वत:चा उद्ध्वस्त झालेला प्रपंच पाहून दु:खी-कष्टी होतात, तर रामदासांची कासाविशी एक प्रकारच्या सर्वसाधारण औदासीन्यातून निर्माण होते... त्यांची आर्तता वैयक्तिक स्वरूपाची नाही. एकदा परमार्थाच्या वाटेस लागल्यावर मात्र दोघेही एकाच मार्गाने गेलेले दिसतात.

तुकाराम हे शूद्र असल्याने त्यांना वेदाध्ययनाचा अधिकार नव्हता. तेव्हा त्यांनी संतवचनांच्या श्रवणाने, वाचनाने व मननानेच विचारधन जोडले, आणि अनुभवाच्या आगीतून ते तावून-सुलाखून घेतले. या दृष्टीने त्यांचे मोठेपणे हे स्वयंनिर्मित आहे... तुकारामाच्या खास कार्यक्षेत्रांत त्यांच्या बुद्धीची कुशाग्रता, विचारांची सर्वंकषता, अवलोकनाची सूक्ष्मता, मनाची तीव्र संवेदनक्षमता आणि स्वभावातील आक्रमणशीलता ही दिसून आल्याशिवाय राहात नाहीत. रामदास हे ब्राह्मण-क्षत्रियांचे प्रतिनिधी होते. श्री. गं. बा. सरदारांच्या मते– 'महंते महंत करावे । युक्तिबुद्धीने भरावे । जाणते करून विखरावे । नाना देशी ।' ही समर्थांची कार्यपद्धती उठावदार व आकर्षक आहे, पण 'उपदेसी तुका । मेघवृष्टीने आईका' या धोरणाने तुकारामांनी केलेली लोकजागृती सामाजिकदृष्ट्या अधिक मूलगामी व महत्त्वाची आहे.[६]

## रामदास आणि तुलसीदास

उत्तर भारतात आजही प्रत्येकाच्या घरी तुलसी रामायणाची प्रत आहे. आणि ती वाचली जाते, गाइली जाते. इतकी जनमनाची जबरदस्त पकड तुलसी रामायणाने घेतलेली आहे. काशी क्षेत्री गंगेच्या काठी राहून श्रीरामाचा प्रत्यक्ष साक्षात्कार करून घेतलेले तुलसीदास आणि हट्टाने

मारुतीच्या मंदिरात जाऊन श्रीरामाचा साक्षात्कार करून घेतलेले रामदास या दोघांत भक्त या नात्याने कसलाच फरक नव्हता. दोघेही दाशरथी रामाची सगुण रूपात भक्ती करणारे, पण आपल्या आराध्य दैवताला सर्वव्यापक परब्रह्मरूपात पाहाणारे होते. सगुण रूपातील रामचंद्राला तेवढ्याच मर्यादित रूपात दोघांनी कधीच मानले नाही. दोघांनी कथा गाइली आहे सगुण रूपात, पण अंतरात दृढ भावना अशी की, हा श्रीरामच जगाचा कर्ता, धर्ता, उत्पत्तिकर्ता आहे, तो सर्वसाक्षी, सर्वव्यापक आहे.

दोघांची भक्तिभावना इतकी दृढ होती की एकाने पत्नीचाही त्याग केला, तर दुसऱ्याने पत्नीचा स्वीकार करण्याचा प्रश्नच उद्भवू दिला नाही. अखंड तपश्चर्या ही वृत्ती दोघांच्या जीवनात समान स्वरूपाची दिसते. ठिकठिकाणी जनकल्याणासाठी व रामभक्तीचा प्रचार करण्यासाठी या दोघांनी मारुतीची स्थापना केली आहे. उत्तर भारतात वैष्णव व शैव यांचा झगडा चालू होता. तुलसीदासांनी तो मिटवून टाकला आणि काशी विश्वेश्वराची आराधना लोकांना महत्त्वाची वाटत होती त्याचबरोबर श्रीरामकथाही त्यांनी घरोघर नेऊन पोचविली. तुलसीदासांनी रामायणरचना स्वांत:सुखाय केली हे खरे, पण त्याचा प्रचार अतिशय व्यापक झाला. तुलसीदास अत्यंत शांत प्रवृत्तीचे होते. गंगेच्या काठी ते कितीतरी दिवस होते. रामभक्ती हेच त्यांच्या जीवनाचे सारसर्वस्व होते. उत्कट भक्तीत तुलसीदास कोणाला हार जाणार नाहीत. सात्त्विक वृत्तीने लोकांना मदत करणे, त्यांना उपदेश करून मार्गाला लावणे हे त्यांचे सामाजिक कार्य होय.

रामदासांचे राजकीय व सामाजिक कार्य अधिक व्यापक होते. रामदासांचा स्वभावही तुलसीदासांच्यापेक्षा कितीतरी वेगळा होता. परंतु आध्यात्मिक क्षेत्रात ते दोघेही समान योग्यतेचे होते. तुलसीदासांनी चमत्कार केल्याच्या दंतकथा नाहीत. रामदासांच्या बाबतीत आहेत. तुलसीदासांची सात्त्विक सोज्वळ वृत्ती त्यांच्या कोणत्याही ग्रंथांतून सहज दृष्टीला पडते. रामदासांनी आपल्या वाङ्मयात सर्व रस आणि गुण यांचे वाङ्मय निर्माण केले आहे. अन्याय दोघांनाही खपत नव्हता. पण एक त्याचे परिमार्जन परमेश्वराची प्रार्थना करून करू इच्छित होता, तर दुसरा (रामदास) स्वत:च्या कर्तबगारीवर सर्व प्रश्न सोडविण्याच्या प्रयत्न करीत होता. ईश्वरनिष्ठा दोघांचीही सारखी होती.

## रामदास आणि कबीर

कबीर एक मनस्वी संतकवी होता. रामभक्त कबीर, पण त्याचा राम दशरथपुत्र राम नव्हे. निरंजन, परब्रह्म राम हे त्याचे दैवत होते. सगुणरूपात्मक भक्ती कबीराला मान्य नव्हती. दगडाच्या मूर्तीची पूजा करण्यापेक्षा जात्याची (चक्की) पूजा केली तर अधिक उपयोगी होईल कारण जात्यात धान्याचे पीठ तरी होते असे परखड विचार कबीराने मांडले आहेत. परंतु निर्गुण भक्ती, योगसाधना, नामस्मरण, शील आणि नीतिमत्ता या सर्वांचे महत्त्व कबीराला फार वाटत होते. शरीर कारणी लावले पाहिजे असे त्याचे मत होते. आपण आपली शरीररूपी चादर परमेश्वराने जशी दिली तशी निर्मळ ठेविली असल्याचा दावा कबीराने केला आहे. लिहिता-वाचता येत नसल्याने त्याने तोंडीच भजन गावे आणि दुसऱ्यांनी ते लिहून काढावे असे चाले. या दृष्टीने कबीर किती स्वयंभू होता हे दिसून येईल. हिंदू-मुसलमान यांच्या धर्मात तो भेद करीत नाही, ईश्वर एक आहे आणि तो निर्गुण आहे. चालीरिती-रूढी या सर्व थोतांड असल्याचे

त्याने अनेकवार स्पष्ट म्हटले आहे. आपले विचार अत्यंत परखडपणे मांडणारा, योगाचा अनुभव घेतलेला, ईश्वराचा साक्षात्कार झालेला आणि समाजातील अज्ञान नाहीसे करण्यासाठी धडपडणारा हा संतकवी आपली कविताही तितकीच परखडपणे करून जातो.

रामदासांचा स्वभावही असाच होता. त्यांनी आपला उपदेश मोठ्या ठणठणीतपणे सांगितला आहे. भीडमुर्वत हा प्रकार रामदासांच्या बाबतीत नाही. कबीरांतही नाही. ईश्वर एक निर्गुण आहे हे मत दोघांनाही मान्य आहे. पण सगुणरूपाचे महत्त्व रामदासांनी गाइले आहे. कबीराला ते सुतराम मान्य नाही. चालीरीती, सोवळे-ओवळे, आचारातील कट्टरपणा कबीराला मान्य नव्हता. रामदासांनीही 'ऐसे कैसे रे सोवळे शिवता होतसे ओवळे' असे म्हटले आहे. परंतु दैनंदिन व्यवहारात 'एकंकार' त्यांना मान्य नव्हता. म्हणून त्यांना 'एकंकार गजावरी सिंह' अशी पदवी बहाल केलेली आहे. परंपरागत आचार पाळावा पण त्यातील तत्त्व विसरू नये असा मध्यममार्ग रामदासांनी चोखाळला होता. दोघेही महान् संत होते. साक्षात्कारी होते. नामस्मरणाच्या भक्तीचा पुरस्कार करणारे होते. सामाजिक कार्यात जनजागृती करणारे दोघेही सिंह होते.

## रामदास आणि जोसेफ मॅझिनी

ज्या धर्माकरिता रामदासांनी आपले आयुष्य वाहिले तो धर्म जगातील सर्व धर्मांच्या व संप्रदायांच्या पितृस्थानी शोभणारा, त्यांना पित्याच्या प्रेमाने जवळ करणारा, त्यांनाही व्यापून पुनः शिल्लक उरणारा व सर्व विश्वाने ज्याला मस्तकी धारण करावे अशा थोर योग्यतेचा होता. जुलुमाविरुद्ध चवताळून उठणारा, अन्यायावर तुटून पडणारा व सज्जनांच्या संरक्षणाकरिता दुर्जनांचा विनाश करणारा असा तेजस्वी तो धर्म होता. अशा थोर धर्माचा पुरस्कार रामदासांनी केला. अशाच अर्थाचा उपदेश मॅझिनीनेही केला आहे. 'तरुण इटली' या संस्थेची नैतिक तत्त्वे काय आहेत हे सांगताना ते लिहितात, ''मनुष्य हा अत्यंत महत्कार्यास्तव जन्माला आलेला असून त्याच्या जीवनाचे अंतिम ध्येय त्याच्या सर्व शक्तींची परिपूर्ण व सुव्यवस्थित झालेली वाढ हे होय.'' मनुष्याने परिपूर्ण व्हावे असे मॅझिनी म्हणतात, तर नर तोच नारायण आहे हे समजून घ्यावे असे रामदासांचे म्हणणे आहे. मॅझिनीच्या मते मनुष्याची वाढ व्हावयाची आहे. रामदासांच्या मते आधीच असलेली पूर्णावस्था समजून घ्यावयाची आहे. पण हे समजून घेण्यालाच केवढ्या तरी प्रयत्नांची जरूर आहे. दोघांची विचार करण्याची पद्धती व विचार-साधने भिन्न असल्यामुळे परिभाषेत भेद असला तरी मनुष्याच्या अंतिम ध्येयासंबंधाने त्यांच्यात एकवाक्यता आहे.

## रामदासांचे दासपंचायतनातील स्थान

श्रीसमर्थ रामदास, केशवस्वामी भागा नगरकर, जयरामस्वामी वडगावकर, आनंदमूर्ती ब्रह्मनाळकर आणि रंगनाथस्वामी निगडीकर यांचे मिळून दास पंचायतन होते. यात श्रीरामदास हे रामभक्त होते. जयरामस्वामींचे गुरू कृष्णाप्पा. त्यांनी कृष्णभक्तीचा प्रचार करण्याचा जयरामस्वामींना आदेश दिला. रंगनाथस्वामींनी आपल्या वडिलांकडूनच उपदेश घेतला. केशवस्वामी हे कृष्णभक्तच. आनंदमूर्ती रघुनाथस्वामींचे शिष्य. म्हणजे गुरुबंधू या नात्यानेही हे संत जवळ येणे शक्य नव्हते. पण रामदासांच्या कर्तृत्वाने हे पाचही संत एका पंचायतनात गणले जाऊ

लागले. हे सर्वच भक्त होते. पण कर्तृत्वात समर्थच केवळ श्रेष्ठ होते. आध्यात्मिक अधिकारात कदाचित सर्व समान असतील. पण जे कार्य रामदासांनी स्वशिरावर घेतले, त्याचा प्रचार केला, त्यासाठी फिरले ते कार्य राजकीय, सामाजिक स्वरूपाचे होते, पण दासपंचायतनातील बाकीचे संतकवी भक्तिरसात बुडून गेल्याकारणाने त्यांनी रामदासांप्रमाणे इतर कार्यात लक्ष घातले नाही. त्यामुळे या दृष्टीने पंचायतनात समर्थांचे स्थान उच्च होते.



# १३. रामदासांचे टीकाकार

## डेमिंग

डेमिंग हे साताऱ्याचे कलेक्टर म्हणून काम करीत होते. त्या वेळी त्यांनी 'Ramdas & the Ramdasis' हा संशोधनात्मक ग्रंथ लिहिला. त्या ग्रंथात त्यांनी रामदासांच्या बाबतीत खालील प्रकारचे आक्षेप घेतले आहेत :

(१) रामदासांनी साकार व निराकार देवासंबंधी जे मत प्रतिपादन केले आहे, त्यात बराच गोंधळ आहे व साकार ही कल्पना धार्मिक असून, निराकार तात्त्विक आहे, या उपपत्तीने दोहोंमधील भेद नाहीसा करण्याचा अलीकडे प्रयत्न झाला असला तरी मि. डेमिंग धार्मिक कल्पनेस जास्त महत्त्व देतात व तात्त्विक कल्पना त्यास मान्य नाही.[१] "..........and to say that God can be both personal and impersonal at the same time leads to grave confusion of thought."[२]

(२) श्रीरामदासांची मोक्षाची कल्पना नकारात्मक असून परमेश्वराच्या साक्षात्काराने जीवनात जो निरतिशय आनंद वाटतो, त्याचे वर्णन न करता श्री रामदासांनी मानवी जीवनातील दुःखाचेच वर्णन केले आहे.[३]

"His attitude toward life itself tended to be pessimistic, so that his thought about salvation was negative rather than positive, emphasizing the idea of escape from the world rather than salvation for a fuller and richer life."[४]

(३) श्रीरामदासांची अवताराची कल्पना बाह्यतः सत्य वाटते. कारण त्यांच्या मते देव मनुष्याचे रूप घेतल्यासारखा दिसतो, परंतु वस्तुतः तो ते रूप घेत नाही. याचा अर्थ असा की हिंदूंच्या कल्पनेप्रमाणे देव नटाचे काम करतो, व मनुष्यरूपाने अवतार घेतल्याचा भास होतो.[५]

"These successive incarnations did not imply that Vishnu actually appeared upon the earth, but rather than he seemed to become man, just as an actor pretends to someone else. It was more like the playing of a dramatic role than the personification of the god himself."[६]

या आक्षेपांना गु. डॉ. रा. द. रानडे यांनी उत्तरे दिली आहेत.

(१) अनुभूतिशास्त्राच्या दृष्टीने साकार वा निराकार देवाच्या कल्पनेला महत्त्व नसून परब्रह्म साकार - निराकारापलीकडे आहे व म्हणून खऱ्या अध्यात्मशास्त्रात या कल्पनेस स्थानच नाही – ही गोष्ट डेमिंग विसरतात.

(२) श्रीरामदासांनी मानवी जीवनात आध्यात्मिक आनंद अत्यंत महत्त्वाचा आहे असे ठिकठिकाणी अनेकदा प्रतिपादल्याचे दिसून येईल. यावरून त्यांची मोक्षाची कल्पना नकारात्मक वा दुःखमय होती हे डेमिंग यांचे विधान सर्वस्वी खोटे आहे हे सिद्ध होते.

(३) सर्व हिंदी वाङ्मयात देवाचा 'अवतार' ही सत्य व खरोखर घडणारी गोष्ट मानली

असून तो नुसता भास आहे असे कोठेच म्हटलेले नाही. जेव्हा जेव्हा धर्माचा ऱ्हास होतो तेव्हा तेव्हा त्याच्या अभ्युत्थानासाठी परमेश्वर अवतार घेतो असे भगवत्‌गीतेत सांगितल्याचे सर्वांस माहीतच आहे.[७]

## श्री. न. र. फाटक

न. र. फाटक यांचे म्हणणे असे की रामदासांनी राजकारण हा शब्द केवळ 'चातुर्य' या अर्थाने योजिला होता.[८] या आक्षेपाला अनेकांनी उत्तरे दिली आहेत. श्री देव, अनंतदास रामदासी, ज. स. करंदीकर यांनी फाटकांच्या आक्षेपांना उत्तरे देऊन राजकारण व चातुर्य यातील समर्थांना अभिप्रेत असलेला भेद त्यांनी स्पष्ट केला आहे.

## पं. बाळाचार्य खुपेरकर

रामदास हे माध्व संप्रदायी होते असे मत पं. खुपेरकरशास्त्री यांनी मांडले आहे आणि त्यासाठी काही रूढींचा आधारही ते देतात. सर्व स्वयंपाकाचा नैवेद्य दाखविण्याची माध्वसंप्रदायाची प्रथा रामदासांनी पाळली होती इ. उदाहरणे त्यांनी दिली आहेत. परंतु या त्यांच्या शंकेला श्री. काका कारखानीस यांनी उत्तरही दिले आहे.

पं. खुपेरकरांनी मुद्दे उपस्थित केले आहेत ते असे :

(१) ठोसर कुलपरंपरेने माध्व आहेत, समर्थ त्याच घराण्यातील म्हणून तेही माध्व संप्रदायी.
(२) श्री मध्वाचार्य हे वायूचे अवतार, समर्थही वायुपुत्र हनुमानाचे अवतार.
(३) श्री. मध्वाचार्यांचे उपास्य दैवत श्रीरामचंद्र, समर्थांचेही तेच.
(४) समर्थ संप्रदायातील मुद्रा धारणाचा विधी माध्वांच्या अंकन भक्तीचाच अवशेष.
(५) उभय संप्रदायात मारुतीची उपासना प्रामुख्याने आहे.
(६) माध्वाप्रमाणेच समर्थ जगत्सत्यत्व मानतात.
(७) 'भेद ईश्वर करोनि गेला' इ. वाक्याधारे समर्थ माध्वमतानुयायी होते.
(८) प्रपंच व परमार्थ यांचा समन्वय करणार श्रीसमर्थ प्रपंचाला मायामय मिथ्या म्हणणे शक्य नाही.

या आक्षेपांना उत्तरे दिली आहेत ती सारांशरूपाने अशी :

(१) *आत्मा म्हणजे तो अद्वैत जेथ नाही द्वैताद्वैत ।।* (४-९-१८)
(२) *ज्ञान म्हणजे अद्वैत ।* (५-६-९)

समर्थ द्वैती नव्हते याला उदंड प्रमाणे कारखानीसांनी दिली आहे आणि एकदा ते द्वैती नव्हते असे सिद्ध झाले की मग बाकीचे आक्षेप तुच्छ आहेत. परंपरा अथवा रूढीसंबंधी आहेत. त्या रूढी बदलू शकतात, इत्यादी.[९]

## इतिहासकार देशमुख

भारताचा मध्ययुगीन इतिहास लिहिणारे श्री देशमुख यांनी आपल्या इतिहासात रामदासांना औरंगजेबाचे हेर म्हटले आहे. या आक्षेपाचा खरपूस समाचार आचार्य अत्रे यांनी आपल्या

'मराठा' वर्तमानपत्रात घेतला आहे.

(१) समजा की रामदास औरंगजेबाचे हेर होते, तर मग शिवाजीने त्यांना सज्जनगडावर राहू का दिले? यावरून असे म्हणणे भाग पडेल की शिवाजीला किल्ल्यांचे महत्त्वच कळले नव्हते किंवा रामदासांना शिवाजी पूर्ण ओळखू शकला नाही.

काही असले तरी शिवाजीची यात बेअब्रू होते हेही देशमुखांच्या ध्यानात आलेले नाही.

(२) आणि दुसरे असे की देशमुखांनी लिहिलेला इतिहास 'इतिहास' या नामाभिधानाला पात्र आहे काय? कारण त्यात काही विधाने केवळ अनुमानाने केलेली आहेत. तेव्हा हा त्यांचा आक्षेप गळून पडतो.



# १४. रामदासांचे विचारविश्व

समर्थ रामदास केवळ अध्यात्म अथवा परमार्थ विषयी प्रतिपादन करीत नाहीत. त्यांनी नंतर सविस्तरपणे केलेले आहेच. परंतु त्याबरोबरच त्यांनी काही समाजचिंतन केले आहे. समाजाच्या उत्थानासाठी जोरकस शैलीत आपले परखड विचार मांडले आहेत. त्यांनी राजकीय, सांस्कृतिक शिक्षण इत्यादीविषयक मननही केले आहे. ते आजही विचारणीय वाटेल.

## रामदासांचे पारमार्थिक विचार

### ब्रह्म आणि माया

ब्रह्म मुळात शाश्वत, निर्गुण, निरंजन आहे. निश्चळ आहे आणि माया ब्रह्मापासून झाली. पण ब्रह्माचे सर्व गुण मायेत उतरले नाहीत.

ब्रह्म निर्गुण, निराकार, तर माया सगुण, साकार
ब्रह्मासी पारावार नाही, तर मायेसी आहे
ब्रह्म निर्मळ, निश्चळ, तर माया चंचळ, चपळ
ब्रह्म निरोपाधी केवळ, तर माया उपाधीरूपी
ब्रह्म दिसेना, भासेना, तर माया दिसे, भासे
ब्रह्म नासेना कल्पांतकाळी, तर माया नासे
ब्रह्म रचेना, रुचेना, खचेना, तर माया रचे, रुचे, खचे
ब्रह्म उपजेना, मरेना, तर माया उपजे, मरे
ब्रह्म धरेना धारणेसी, तर माया धरे धारणेसी
ब्रह्म फुटेना, तुटेना, विटेना, तर माया फुटे, तुटे, विटे
सारांश जे जे दृश्य, चल ते ते माया, आणि परमेश्वर सबाह्यअभ्यंतरी.[१]

ब्रह्म हे सृष्टीचे आदिकारण आहे आणि सृष्टीचा लयही तेथेच व्हावयाचा असल्याने ब्रह्म हे सृष्टीचे लयस्थानही आहे. माया ही स्फूर्तिरूप असल्याने सृष्टीच्या विलयाबरोबरच दृश्य मायेचे अस्तित्वही संपते. मात्र प्रलयानंतर पुनः सृष्टीची उत्पत्ती व्हावयाची असल्याने मायेचे कार्य संपत नाही.

### जड, जगत् (जीव) आणि जगदीश्वर

ब्रह्माला स्फुरण झाले आणि माया निर्माण झाली आणि त्या मायेने अष्टधा प्रवृत्ती निर्मिली. सृष्टीच्या उत्पत्तीमध्ये जीवसृष्टी निर्माण झाली आणि जडही निर्माण झाले. जडात चैतन्याचा वास अत्यंत सूक्ष्मरूपाने का असेना असतो. पण जीवसृष्टीच्या तुलनेने ते जड वाटते इतकेच.

जगदीश म्हणजे ब्रह्माचा जीवात वास्तव्य करणारा अंश. अन्य तत्त्वज्ञानापेक्षा हे तत्त्वज्ञान वेगळे आहे. अद्वैताकडे झुकलेले आहे. प्रकृतीचे स्वतंत्र अस्तित्व मानून पुरुषाचे अस्तित्व

वेगळे मानून दोघांच्या संयोगाने सृष्टीची-जीव सृष्टीची उत्पत्ती झाली असेही काही तत्त्वज्ञानी म्हणतात. रामदास जडातही जगदीशाचा वास असतो असे मानणारे दिसतात.

## सृष्टीची उभारणी

मुळात ब्रह्म निर्मळ, निश्चळ, शाश्वत, अमळ, विमळ, असे आहे. ते 'अवकाश धन पोकळ गगना ऐसे' आहे. त्याचे स्वरुप थोडक्यात असे आहे :

*तयास करणे ना धरणे । तयास जन्म ना मरणे । तेथे जाणणे ना नेणणे । तसुन्मातीत । ते रचेना ना खचेना । ते होयेना ना जायेना । मायातीत निरंजना । पारचि नाही ।।*[२]

पुढे 'संकल्प उठला' तीच मूळ माया. ही मूळमाया बहुगुणी आणि गुणक्षोभिणी म्हटली जाते. हिच्यापासून गुणत्रय (सत्त्व,रज,तम) निर्माण झाले. मग त्यापासून विष्णू, ब्रह्मा आणि रुद्र निर्माण झाले आणि 'सकळ कर्तेपणा तेथेच आले' तेथून पंचमहाभूते स्पष्ट दशेते पावली. अशा रीतीने पंचमहाभूते आणि त्रिगुण मिळून अष्टधा प्रकृती बनली. वायूच्या दोन झुळुका. उष्ण झुळकेपासून सूर्य झाला आणि शीतलापासून मयंक (चंद्र) झाला. तेजापासून आप,आप आळून पृथ्वी आणि पुढे नाना प्रकारच्या औषधी निर्माण झाल्या. औषधापासून नाना रस, नाना बीजे, अन्नरस, चौऱ्यांशी लक्ष जीवयोनींची निर्मिती झाली.

## सृष्टीची संहारणी

पृथ्वीचा अंत होईल. भूतांना कल्पांत मांडेल.शतवर्षे अनावृष्टी होईल. त्यामुळे सृष्टी जळून जाईल. सूर्य बारा कळी प्रकाशेल. किरणांपासून ज्वाळा निघतील. शतवर्षे हा भूगोल जळत राहील. महाभूते खवळतील. प्रलयवात सुटेल.

*महद्भूत मूळमाया । विस्मरणे वितुळे काया । पदार्थमात्र राहावया । ठाव नाहीं ।।*[३]

अशा तऱ्हेने दृश्य तेवढे सर्व नासेल. प्रलय होईल, उभारलेल्या सृष्टीची संहारणी होईल.

## धर्म–

रामदासांची धर्माची कल्पना अधिक विशद करून सांगितली पाहिजे. ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांचा वर्णाश्रम धर्म, महाराष्ट्र धर्म, राजधर्म, क्षात्रधर्म, स्वकर्तव्य म्हणजे स्वधर्म अशा अनेक संदर्भात धर्म हा शब्द रामदासांनी उपयोजिला आहे, आणि स्वधर्माचे पालन करण्याचा आग्रहपूर्वक उपदेश केला आहे. परंतु हा उपदेश कर्तव्याच्या संदर्भातच आहे हे लक्षात ठेविले पाहिजे.

अशासारख्या स्वधर्मभ्रष्ट लोकांची रामदासांनी निंदा केली आहे. म्हणजेच आपआपला ज्ञातिधर्म, समाजधर्म हा पाळलाच पाहिजे. तो सोडू नये ही रामदासांची विचारसरणी.

परंतु याहीपेक्षा 'स्वधर्म' हा वेगळाही असल्याचे रामदासांनी सांगितले आहे.

## ज्ञान

ज्ञान म्हणजे आत्मज्ञान. सृष्टीतील पदार्थाचे ज्ञान वेगळे आणि आत्मज्ञान वेगळे. ज्ञाता, ज्ञेय आणि ज्ञान या त्रिपुटीचाही लय झाला पाहिजे, देहबुद्धी नाहीशी झाली पाहिजे, 'अहं ब्रम्हास्मि' अशी वृत्ती झाली पाहिजे म्हणजे स्वरूप ज्ञान झाले असे म्हणता येते. शोक असूनही

तो लौकिक व्यवहार करीत असतो पण तो 'स्थिती' तच असतो.

*'शोधितां आपले मूळ स्थान । सहजचि उडे अज्ञान । या नांव म्हणिजे ब्रम्हज्ञान । मोक्षदायेक ।'*[४]

ज्ञान म्हणजे प्रत्यक्ष ब्रम्हाशी एकरूप होणे. एकरूप झाल्यानंतर वेगळेपण राहात नाही. मग ज्ञान झाले असे कसे म्हणायचे? पण हा प्रश्न उद्भवत नाही. कारण जोपर्यंत देहस्वभाव जात नाही, तोपर्यंत ज्ञान नाही. आणि ज्ञान झाले की देहस्वभाव संपतो. यामुळे ज्ञान, ज्ञाता यांचा ज्ञेयांमध्ये लयच होऊन जातो आणि तेच ज्ञान, अन्यथा अज्ञान.

'सर्वत्र अंतरात्मा आहे म्हणून सर्वांचे मनोगत जाणून त्यांना तोषवावें, याचे नाव उपासना. यावरून उपासना म्हणजे विश्वाचा प्रतिपाळ करणे असा अर्थ होतो.'

*''कोणी येथे जगदीशाचे । भजन करावें । उपासना प्रगट जाली । तरी हे विचारणा कळली । या कारणे पाहिजे केली । विचारणा देवाची । उपासनेचा मोठा आश्रयो । उपासनेविण निराश्रयो ।*

आपण कोण ही विचारणा केली पाहिजे. ही विचारणा ही एक उपासनाच आहे. भजन, साधन, अभ्यास ही उपासनेची पूर्व अंगे आहेत.

*'उपासना ज्ञानस्वरूप'*[५] *'उपासना म्हणजे ज्ञान'*[६] *विचार नेहटूनसा पाहे । तरी उपासना आपणचि आहे ।'*[७]

उपास्य आणि उपासक असे दोन देह आहेत, त्यांपैकी एक जातो, एक राहतो म्हणजे उपासक जाऊन उपास्य बनतो. ही उपासना. नित्यकर्म ही उपासना नव्हे, ती साधना. साधना ही उपासनेकडे नेणारी असते. साधना सिद्ध झाली म्हणजे उपासना. म्हणजेच सर्वांभूती परमेश्वर आहे अशी धारणा झाली की उपासना सुरू झाली.

## सिद्ध

सिद्धाचे प्रकार पुष्कळ आहेत. एक एक प्रकारची सिद्धी मिळविलेले सिद्धच होत. मनोसिद्ध, वाचासिद्ध, कल्पसिद्ध, सर्वसिद्ध असे अनेक सिद्ध आहेत. योगी गुप्तपंथाने ब्रम्हभुवनाला जातात. वैकुंठाला गेलेले, सत्यलोकी राहिलेले, कैलासावर शिवरूप होऊन बसलेले, इंद्रलोकी इंद्र झालेले, पितृलोकी मिळालेले.. *'ऐसे सिद्ध साधुसंत । स्वहिता प्रवर्तले अनंत ।'*[८] जो स्वरूपचि जाला तोच सिद्ध होय.

## पुनर्जन्म

पुनर्जन्मावर रामदासांचा पूर्ण विश्वास आहे असे म्हणणेही थोडे चमत्कारिक आहे. कारण जन्म- मृत्यूचे त्यांचे तत्त्वज्ञान आहे. चौऱ्यांशी लक्ष जीवयोनीतून भटकून मगच जीव मनुष्यजन्मास येतो. या नरदेहाचे महत्त्व समर्थांनी एक समास घालून केले आहे. नरदेहाचा लाभ घेऊन ते शरीर कारणी लावावे. हरिभक्ती, उपासना, ज्ञान आदीच्या मार्गाने जन्ममरणाचा फेरा चुकविणे हेच तर माणसाचे ध्येय, सर्व धर्मकर्म उपासना, साधना तेवढ्यासाठीच. यालाच मोक्ष म्हणायचे. जन्ममृत्यू नसला की मोक्षच. पुनर्जन्म हा आपल्या कर्मावर अवलंबून असतो. सत्कर्म, सदाचार, नीती, शील, ब्रम्हचर्य इ. साधनांनी उपासना करायची. नामस्मरण, नित्य पूजापाठ (सगुणाची) हाही पुनर्जन्म टाळण्याचा उपाय आहे. पण सर्वांत महत्त्वाचे साधन आत्मनिवेदन भक्ती. विवेक

वैराग्याने ही स्थिती आणता येणे सुलभ होते. पापी नरकात जातो. पुण्यवान आपापल्या योग्यतेप्रमाणे इंद्रलोकी, चंद्रलोकी, सूर्यलोकी इ, ठिकाणी जातात. पण पुण्य संपताच पुन: मृत्युलोकात येतात. केव्हा पुनर्जन्म आहे व तो माणसाला आपल्या कर्तृत्वावर चुकविता येतो. तो चुकविणे हेच माणसाचे कर्तव्य, ध्येय इ. सर्व काही.

योगविद्येत रामदास निपुण होते हे दाखविणाऱ्या अनेक आख्यायिका आहेत. योगासंबंधीची माहिती त्यांनी दिलेली आहे. 'साधके होवोनी बैसावे एकचित्त' ही प्रक्रिया त्यांना ठाऊक होती.

*महीसुत सरसाविला । सरसाऊन द्विधा केला । उभयेता मिळोन चालिला । कार्येभाग ।। स्वेतास्वेतांत गांठीं पडतां । मध्ये कृष्ण मिश्रित होतां । इहलोक सार्थकता । होत आहे । विवरतां याचा विचार । मुर्ख तोचि होये चतुर । सद्यप्रचित साक्षात्कार । परलोकीचा ।*[९]

'मही म्हणजे पृथ्वी आणि पृथ्वी म्हणजे हे शरीर. यात पहिल्याने उत्पन्न झाला तो श्वासोच्छ्वास.. श्वासोच्छ्वास 'सोऽहं' रूपी आहे. तो द्विधा केला तर स आणि ह असे झाले. सकार म्हणजे प्राण आणि ह कार म्हणजे अपान वायू. ह्या दोघांच्या मिळणीने सर्व प्रापंचिक व पारमार्थिक कार्यभाग चालू आहेत. इडा नाडी श्वेतवर्ण आहे. पिंगळा नाडी ताम्रवर्ण आहे. यांमध्ये कृष्णवर्ण रूपी सुषुम्ना मिळवली तर जीवा (धूम्रवर्ण) च्या इहलोकीची सार्थकता होऊन सुषुम्नेच्या द्वारे देवरूप होऊन जातो व त्याची इहलोकीची या क्षेत्राची सार्थकता होते. श्वेतवर्णात तांबूस रंग मिळविला तर तो पीतवर्ण होतो व पीतवर्णात कृष्णवर्ण मिळविला तर तो नीलवर्ण होतो. अर्थात इडा, पिंगळा या नाड्यांची मिळणी होऊन सुषुम्ना नाडी जागृत झाल्यावर ऊर्ध्व दृष्टी फेकली तर पहिल्याने मसुरेचे दर्शन होते. याचे विवरण व अभ्यास केल्यास मूर्ख चतुर होतो. सद्यप्रचीत होऊन परलोकाचा म्हणजे स्वर्लोक, महालोक अशा श्रेष्ठ लोकांचा अनुभव येतो.'[१०] वरील उताऱ्याखेरीज अनेक उतारे देऊन योग मार्गाचा समर्थांचा अभ्यास व त्याची तपशीलवार माहिती मिळते.

## रामदासांचे सामाजिक विचार

समाजातील त्या काळचा प्रमुख बुद्धिजीवी वर्ग म्हणजे ब्राम्हण. ब्राम्हणांनी समाजाला शिकवायचे, वळण लावायचे, त्यांनीच धर्माची प्रतिष्ठा राखावयाची. आदर्श ब्राम्हण कसा असावा याचे दिग्दर्शन रामदासांनी केले आहे. ज्या ब्राह्मणाच्या वचनाने शूद्रांनासुद्धा ब्राह्मणाची प्रतिष्ठा लाभते तो खरा ब्राह्मण. ब्रह्म जाणणारा तो ब्राह्मण हेही खरेच. वेद-विद्येचे अध्ययन, अध्यापन, संरक्षण, यज्ञयागादी क्रिया, नित्य देवतार्चन हे सर्व नियम आदर्श ब्राह्मणासाठी आहेत.

### क्षत्रिय, वैश्य, शूद्र

चातुर्वर्ण्य रामदासांना मान्य होते. ज्याप्रमाणे नामदेव, ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम यांनाही ते मान्य होते त्या अर्थाने रामदासांनीही या चातुर्वर्ण्याचा पुरस्कार केला. पण आता जसे जातीय भावनेतून त्यांकडे पाहिले जाते आणि चातुर्वर्ण्याचा पुरस्कार करणारे जातीय वृत्तीचे समजले जातात त्या अर्थाने संतांनी चातुर्वर्ण्याचा पुरस्कार केला नाही. प्रत्येकाने आपापला स्वधर्म पाळावा. हाच इतर संतांप्रमाणे समर्थांचाही आग्रह होता. वर्णांनां ब्राह्मणो गुरुः ही त्या वेळची वस्तुस्थिती होती आणि म्हणून जेव्हा ब्राह्मणच भ्रष्ट होतो आहे, असे रामदासांना दिसून आले

तेव्हा त्यांनी त्याविरुद्ध आवाज उठविला. क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांनीही स्वधर्माचे पालन करावे, असे त्यांना वाटत होते. धर्माविरुद्ध बंड करणे, ही कल्पनाच रामदासांना असह्य होती. ज्याप्रमाणे त्यांनी 'ब्राह्मणमंडळ्या मेळवाव्या' असे सांगितले त्याचप्रमाणे 'मराठा तितुका मेळवावा' असाही उपदेश केला. हा उपदेश जातीय नव्हता, तर ब्राह्मणादी सर्व वर्णांच्या लोकांनी आपापल्या धर्माचे पालन करावे हाच त्यांचा यामागे विचार होता.

## सामाजिक दारिद्र्य

सामाजिक दारिद्र्याने रामदास चिडून जात. प्रपंच करावयाचा तर तो संपन्नतेने करावा, वैभवाने करावा, प्रसन्नतेने तो भरून टाकावा, असाच त्यांचा आग्रह होता. 'प्रपंच नेटका करावा' असे त्यांनी आग्रहाने प्रतिपादिले आहे आणि तो 'आधी' करावा असे सांगितले आहे. 'मग घ्यावे परमार्थ-विवेका.' गृहस्थाश्रमाशिवाय संन्यास घेता येत नाही, हे रामदासांना पूर्णपणे ठाऊक असल्याने स्वधर्माप्रमाणे आचरण असावे, असा आग्रह धरणारे रामदास प्रपंच सोडायला सांगतीलच कसे? तो व्यवस्थितपणे करावा, असेच त्यांनी सांगितले. दारिद्र्याची त्यांनी अनेक वेळा निंदा केली आहे. दरिद्री माणूसच करंटा म्हणून त्यांनी आपल्या साहित्यात रंगविला आहे.

व्यक्तिगत दारिद्र्याचा अभ्यास हा तर रामदासांनी आवर्जून सांगितलाच, पण सामाजिक दारिद्र्यही नाहीसे व्हावे म्हणून त्यांनी उपदेश केला आहे. 'लक्ष्मी' पाहिजे असेल तर 'ज्याची लक्ष्मी तो आपण बळकट धरावा' असा युक्तिवाद त्यांनी केला आहे. आदर्श रामाचे व रामराज्याचे आदर्श चित्र उभे करताना त्यांनी आदर्श समाजाचे विचार प्रकट केले आहेत. त्यांत सर्व माणसे आर्थिक बाबतीत सुखी असावीत, असे विचारही व्यक्त केले आहेत.

## आदर्श समाज

समाजातील सर्व वर्णाचे लोक आपाआपल्या धर्माप्रमाणे वागत आहेत, न्याय-नीतीप्रमाणे चालत आहेत, आपआपली भाकरी कष्टाने मिळवीत आहेत, सर्व लोक साक्षेपी (उद्योगी) आहेत, काळ सार्थकी लावत आहेत, कोणी कोणाची निंदा करीत नाही, सर्वजण प्रसन्न-सुखी आहेत, ईश्वरावर सर्वांची श्रद्धा आहे, नित्य धर्माचरण चालू आहे, स्त्रियांना योग्य तो मान दिला जात आहे. ब्राह्मण अध्ययन-अध्यापनात व पुण्य संपादन करण्यात गर्क आहेत. क्षत्रिय रक्षणाच्या कामात दक्ष आहेत, वैश्य वाणिज्य व्यवसायात तत्पर असून, शूद्र सेवाकर्मात रस घेत आहेत. धनधान्य उत्पादन हे शूद्रांचे काम आहे. असे समाजाबद्दलचे आपले विचार रामदासांनी आपल्या वाङ्मयात अनेक ठिकाणी व्यक्त केलेले आहेत.

## स्वधर्माचे पालन आवश्यक

एका विशिष्ट वर्गानेच स्वधर्माचे आचरण केले पाहिजे, असे नसून ते सर्वांचे कर्तव्य आहे, असे त्यांनी वारंवार सूचित केले आहे. महंत, साधक, सिद्ध, सामान्य प्रापंचिक माणूस, बद्ध, मुमुक्षू, स्त्री-पुरुष, बाळ, युवक आणि वृद्ध या सर्वांनाच त्यांनी स्वधर्माच्या आचरणांचा उपदेश केला आहे. ब्राह्मण जसे बुद्धीपासून चेवले, आचारापासून भ्रष्टले, गुरुत्व सोडून झाले शिष्य शिष्यांचे, अशी तक्रार त्यांनी केली आहे. त्याचप्रमाणे शूद्र आचार बुडविती ब्राह्मणांचीही ही तक्रार, त्यांनी नोंदवून ठेवली आहे.

## सांस्कृतिक विचार

स्वकर्तव्याचा उपदेश देत असताना संस्कृतीविषयीही त्यांनी ओघाने सर्व सांगितले आहे. स्नान, संध्या, देवतार्चन, यज्ञ, याग यासंबंधी त्यांचे विचार परंपरागत आहेत. मंदिरांची स्थापना, जीर्णोद्धार ही कामेही त्यांनी महत्त्वाची मानली आहेत. स्वत: त्यांनी मंदिरांची स्थापना केली आहे आणि लोकांना योग्य मार्गाला लावले आहे. देवतांचे जन्मोत्सव, व्रते-वैकल्ये यांचे मर्यादित का असेना, पण त्यांनी महत्त्व मानले आहे. मर्यादित म्हणण्याचे कारण असे की व्रते-वैकल्यांहूनही आत्मनिवेदनात्मक भक्तीनेच देव पावतो, असे त्यांनी सांगितले आहे. तथापि सांस्कृतिकता टाकून द्यावी, असे त्यांनी कोठेच सांगितले नाही. मौजीबंधनाशिवाय ब्राह्मणाचा मुलगाही ब्राह्मण होत नाही इतके मौंजीबंधनाचे महत्त्व त्यांनी मानले आहे. विवाहाचे महत्त्व, पतिव्रता धर्माचे महत्त्व, हेही त्यांनी मधून मधून प्रसंगोपात प्रकट केले आहे. धार्मिक ग्रंथांचे वाचन, वेदपठण याचेही अनन्यसाधारण महत्त्व असल्याचे व दासबोध 'ग्रंथ सोडू नये काही केल्या' असे आवर्जून सांगितले आहे. मारुती व सूर्याचे दर्शन त्रिकाल घ्यावे व 'श्रीराम जय राम जय जय राम' हा मंत्र मलमूत्र विसर्जन करीत असताही सोडू नये, असे आग्रहाने प्रतिपादले आहे. गायत्री मंत्राचा जप करावा, अनुष्ठाने करावीत, नवस केल्यास चुकवू नये, देवाला सांकडीत घालू नये. सदासर्वदा शुचितेने असावे, निर्मळ जळे स्नान करावे. दिशेला सुद्धा दूर जावे– असे सांगितले आहे.

## राजकीय विचार

राजधर्म आणि क्षात्रधर्म या दोन प्रकरणांत त्यांनी राजकीय विचार प्रकट केले आहेत. दासबोधातही चातुर्य आणि राजकारण या नावाने राजकीय विचार मांडले आहेत. राजकारण हे ठाऊक असले पाहिजे.

*'नयेतां काहीं राजकारण । अपमान करून घेती प्राण ।'*[११] असे स्पष्ट विधान केले आहे.

*"मुख्य हरिकथा निरूपण । दुसरें तें राजकारण । तिसरें तें सावधपण । सर्व विषयीं ।।*[१२]*"*

यात राजकारण व सर्व विषयांत सावधपण (चातुर्य) यात भेद केलेला दिसतो. राजकारणाचे लक्षण संपूर्ण समासात सांगितलेले आहे. राजकारण करीत असता प्रपंचाकडे दुर्लक्ष होऊ नये, असा सावधगिरीचा इशारा दिला आहे.

शत्रू फार माजलेला आहे, देश भाषेने रोघ झाला आहे. फिरंगणात लोक आटून गेले आहेत, अशी राजकीय परिस्थिती वर्णन करून अवकाश नाही जेवायला, उदंड कामें । म्हणून राजकारण करण्यास प्रोत्साहन दिले आहे. येथे राजकारण याचा अर्थ केवळ चातुर्य घेणेच शक्य नाही.[१३] वा दशक समास २ हा या अर्थाने राजकारणासंबंधीच्या विचारांनाच वाहिलेला आहे. आदर्श रामराज्याची कल्पना, अस्मानीसुलतानी, आनंदवनभुवनी अशा अनेक प्रकरणांतून राजकारणाचे विचार प्रकट झाले आहेत.

चातुर्याने राजकारण करावे, प्रसंग ओळखावा, पडिला प्रसंग सावरावा, असाच उपदेश राजकारणाच्या संदर्भात समर्थांनी केला आहे.

## प्रपंच

प्रपंच या शब्दाचा अर्थ संसार असाच केलेला आहे. प्रपंच माणसाला सुटत नाही आणि

सुटत नाही तर तो नेटका तरी करावा, प्रपंचाची उपाधी टाकता आली तर ती समर्थांना हवी आहे. प्रपंच हा परमार्थाला बाधकच आहे. बद्ध हा प्रपंचामुळे बद्धच राहतो. प्रपंचात राहून परमार्थाचे साधन करावे. पण त्याला कौशल्य लागते. तरी पण प्रपंच सोडता येत नाही म्हणून खंत बाळगण्याचे कारण नाही म्हणून 'आधी प्रपंच करावा नेटका । मग घ्यावे परमार्थ विवेका' असे समर्थ सांगतात आणि प्रपंच सोडून परमार्थाच्या मागे लागल्यास होणाऱ्या परिणामाचे वर्णन ते करतात. मात्र प्रपंच नेटका करण्याचा प्रयत्न करीत असता त्यात गुरफटून जाऊ नये. किंवा प्रपंच फार चांगलाच होईल अशी आशाही धरू नये. कारण–

*"प्रपंच मुळीच नासका । विवेकें करावा नेटका । नेटका करिता फिका । होत जातो ।*[१४]
*प्रपंचीं पाहिजे सुवर्ण । परमार्थी पंचीकरण । प्रपंच करावा नेमका ।।*

## शिक्षण

तसे पाहिले तर रामदासांचे सारे ग्रंथ औपचारिक– अनौपचारिक शिक्षणच देतात. त्यातून काही विचार निवडायचे म्हटले तर कठीण आहे. त्यांनी श्रेष्ठांच्या मुलांना केलेला उपदेश– 'बरें सत्य बोला हा सर्व शिक्षण देणाराच आहे. नीतीविषयक, धर्मविषयक, भक्तिविषयक, उपासनेबद्दल ते सारखे शिक्षण देत असतात. अक्षर कसे असावे, लिहावे कसे, शाई कशी तयार करावी, ग्रंथ कसा लिहावा, कवित्व कसे करावे, खरे शिक्षण म्हणजे ब्रह्माचेच, पण त्याचबरोबर गायन, वादन या कलांचा अंतर्भाव ते शिक्षणातच करतात. नृत्याबद्दलही त्यांनी विचार प्रकट केले आहेत. नवीन राग व ताल निर्माण केले आहेत. अध्यात्मविद्येचे शिक्षण तर त्यांनी आपल्या ग्रंथाच्या प्रत्येक समासात दिले आहे असे म्हटले तर वावगे होईल असे वाटत नाही. शरीराबद्दल संवर्धन, प्रपंचविषयक शिक्षण, धर्मविषयक, उपासना, भक्ती इ. विषयी त्यांनी उपदेश केला आहे. हे सर्व त्यांचे शिक्षणविषयक विचार आहेत.

## जीवन

रामदास जीवनवादी संतकवी होते. प्रपंच करून परमार्थ करा असा त्यांनी उपदेश केला आहे. विवेकाने वागावे असे सांगताना त्यांनी एक दृष्टान्त दिला आहे.

*"पर्णाळी पाहोनी उचळे । जीव सृष्टी विवेके चाले । आणि पुरुष होवोनि भ्रमले । यासी काय म्हणावे? ।।*[१५]

या दृष्टान्तात जीवनात सुद्धा विवेकानेच पुढले पाऊल कसे टाकावे हे सांगितले आहे. केवळ निवृत्तीचा उपदेश न करता ऐहिक जीवनही यशस्वी केले पाहिजे आणि मग परमार्थही केला पाहिजे. ऐहिक जीवन सुखी करावयाचे असेल तर चातुर्य, राजकारण, धूर्तपणा, प्रयत्न, जशास तसे वागणे, लोकसंग्रह, प्रसंगी संयम तर प्रसंगी आपला मगज राखणे काही तरी, सर्वांचे सर्व सोसावे, पण ते सोसले तर आपले महत्त्व काहीच राहात नाही म्हणून युक्तीने वागावे. संयम व विवेक, न्याय व नीती, शक्ती आणि युक्ती, भक्ती आणि उपासना या योगाने ऐहिक यश, सुखसमृद्धी, परलोक, मोक्ष मिळवावा अशी ही व्यापक पण व्यवहारी दृष्टी आहे. रामदास समन्वयवादी असावेत असे वाटते ते यामुळे.

## विवेक

'विवेक' हा शब्द म्हणजे रामदासांचे अंतरंगच होय. ठिकठिकाणी विवेकाचा उच्चार करून

सारी साधना विवेकावर आधारलेली असल्याचे ते प्रतिपादितात. विवेक नसेल तर काहीच नाही. आणि विवेक असेल तर सर्व काही आहे असाच त्यांचा दावा आहे.

*संसार त्याग न करतां । प्रपंच उपाधी न सोडितां । जनामध्यें सार्थकता । विचारेंचि होये ।।*[१६]

सारासारविचाराने सार्थकता करावी. ह्याच जन्मात नव्हे, ह्याच क्षणाला विवेकाने मुक्ती प्राप्त करून घ्यावी असा उपदेश समर्थांनी केला आहे.

## काव्यविषयक सिद्धान्त

१) *कवित्व असावें निर्मळ । कवित्व असावें सरळ । कवित्व असावे प्रांजळ । अन्वयाचें ।। मृदुमंजुळ कोमल । भव्य अद्भूत विशाळ । गौल्य माधुर्य रसाळ । भक्तीरसें ।।*

म्हणजेच– कवित्व निर्मळ असावे, सरळ असावे, प्रांजळ अन्वयाचे असावे– म्हणजे कवीचे म्हणणे समजावयास काही एक आभास पडू नयेत. ते मृदु, मंजुळ आणि कोमल असावे, किंवा भव्यअद्भुत विशाल असावे. तसेच ते गौल्यामुळे माधुर्यामुळे रसाळ असावे.. अलंकार घालण्याच्या किंवा व्यंग्यार्थाला प्राधान्य देण्याच्या इच्छेने किंवा दुसऱ्या अनेक क्लृप्त्या लढवून कवीने आपला सरळपणा घालवू नये. कवितेला कृत्रिमपणा नसावा. त्यांनी पुढील सप्तसूत्री स्पष्ट केली आहे.

१) काव्य सरळ असावे । दुर्बोध नसावे ।

२) कवित्वाचे वाचकावर परिणाम जितके दृढ, दीर्घ किंवा
मोठ्या आवेगाचे होतील तितके ते काव्य चांगले.

३) काव्यामुळे वाचकांच्या मनावर परिणाम होण्यासाठी ते उत्पन्न करणाऱ्या कवीच्याच मनावर परिणाम झालेला पाहिजे.

४) घाट, पाठ आणि प्रासादिक हे कवित्वाचे तीन प्रकार आहेत.

५) भाव हाच ज्या अर्थी काव्याचा प्रधान गुण आहे त्या अर्थी
जो भाव जितका उच्च प्रकारचा तितकी त्या भावाशी संबद्ध
कविता चांगली. भाव ईश्वराविषयीच चांगला, त्याअर्थी.
भक्तिप्रधान व ईश्वरी प्रेरणा झालेली म्हणजे प्रासादिक कविता श्रेष्ठ होय.

६) जर कवीच्या कवित्वाचे महत्त्व भावनांच्या उत्पादनावर अवलंबून आहे आणि ज्या अर्थी भावनांचे उत्पादन मनुष्याच्या मनाच्या स्वाभाविक प्रवृत्तीवर अवलंबून आहे त्या अर्थी सत्त्व, रज, तम हे तीन मनुष्य प्रवृत्तीचे भेद आहेत. त्यांस अनुसरून कवितादी व्यापारांचे उच्चनीच ठरविणे योग्य आहे. ज्यास आपण संगीतादी गोष्टींची रसिकता म्हणतो ती आवड रजोगुणी आहे. सात्त्विक आवड निराळ्या प्रकारची आहे. यासाठी सात्त्विक आवडीची कविता श्रेष्ठ होय.

७) ईश्वरास स्वरूपत्व देणारी आणि शास्त्राच्या अधिकारास जगात मान्यता उत्पन्न करून देणारी कविता श्रेष्ठ होय.[१७]



# उपसंहार

रामदासांच्या काव्यसृष्टीचा समग्र अभ्यास आतापर्यंत मांडला. रामदास हे कवी नव्हते असे आक्षेप घेतले गेल्यामुळे या आक्षेपात कितपत तथ्य आहे हे तपासून पाहून कवी म्हणून रामदासांची योग्यता प्रस्थापित करणे हा या प्रबंधाचा उद्देश होता. म्हणून प्रकाशित व अप्रकाशित साहित्याचा पूर्णपणे अभ्यास करून निर्णयाचा आधार निर्माण करणे आवश्यक होते. समग्र साहित्याचा काव्य म्हणून अभ्यास केल्यानंतर असे आढळून आले की रामदास हे प्रभावी कवी होते आणि म्हणून ते कवी नाहीत असा आक्षेप घेणे योग्य नाही.

रामदासांच्या काव्यांच्या अभ्यासाचा इतिहास पाहून 'कवी रामदास' म्हणून रामदासांच्या समग्र ग्रंथाचे अध्ययन हे प्रथमच होत असल्याचे दाखवून दिले आहे. रामदासकालीन परिस्थितीचा आढावा घेऊन रामदासांची कविता त्यांच्या जीवनातून कशी निर्माण झाली आहे हे पाहिले आहे. पुढील प्रकरणात रामदासांच्या काव्यांचा तपशिलाने अभ्यास केला आहे. रामदासांचे व्यक्तिमत्त्व तुलनात्मक रूपाने पाहिले आहे. त्यांच्या विचारविश्वाचा परिचय करून घेतला आहे. रामदास हे उत्कृष्ट कवी, संत, राजकारणी, समाजकारणी, जगदोद्धार करावा या तळमळीने प्रयत्नांचा पाऊस पाडणारे एक लोकोत्तर संतकवी होते या निर्णयापर्यंत पोचलो आहे.

अजूनही रामदासांचे विपुल साहित्य अप्रकाशित राहिले आहे. ते प्रकाशात आणण्याची कामगिरी कोणीतरी केली पाहिजे. समर्थांच्या वेळचे ऐतिहासिक कागदपत्र पाहून त्यांच्या कार्यासंबंधी शिवाजीशी असलेल्या त्यांच्या संबंधाविषयी काही अधिक निर्णयात्मक माहिती मिळते काय याचा शोध घेतला गेला पाहिजे. त्यांच्या काही कूट पदांचा अर्थ लावून त्यांतून काही गोष्टींवर प्रकाश पडणे शक्य आहे असे वाटते. त्यांचा हिंदी कवितांचा सागर एकदा पालटून पाहिला पाहिजे आणि हे काम कमीत कमी एका संशोधकाला पुरण्यासारखे निश्चित आहे. प्रस्तुत लेखाकाची हे काम करण्याची इच्छा आहे. परंतु तोपर्यंत एवढेच म्हणणे बरें की.

*सामर्थ्य आहे चळवळीचे । जो जो करील तयाचें । परंतु तेथे भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥ मनी धरावें ते होते । विघ्न अवघेचि नासोनि जाते । कृपा केलिया रघुनाथे । प्रचीत येते ॥*



# प्रकरणशः संदर्भ

## प्रकरण पहिले : रामदास- काव्याभ्यासाचा संक्षिप्त आढावा

**मराठी**


१. कल्याणसेवक (महाराज), श्री समर्थांचा आत्माराम,
वि. श. वैद्य, सज्जनगड, प्रथमावृत्ती सन १९५२, शके १८७३.
२. कारखानीस काकासाहेब : श्री समर्थ रामदास : विचार आणि कार्य,
ना. ब. जोशी, ज्ञानेश्वर अभ्यास मंडळ, विजापूर
प्रथमावृत्ती, शके १८८६.
३. गोखले पुरुषोत्तम पांडुरंग : समर्थांचा विशद भक्तिमार्ग
पु. पां. गोखले, कराड, सन १९६२.
४. तुळपुळे (डॉ.) शं. गो. पाच संतकवी, व्हीनस प्रकाशन, पुणे
दुसरी आवृत्ती, १९६२.
५. दामले आ. वा., श्रीसमर्थांचे अवतारकार्य, सौ. सुधाबाई दामले,
बेळगाव, द्वितीयावृत्ती, १९६४
६. देव शंकर श्रीकृष्ण : श्री समर्थांचे चरणी वाहिलेला सुमनहार १ ते ११
श्री सांप्रदायिक विविध विषय, खंड १ ते ४
श्री सांप्रदायिक वृत्त, चर्चा, जीर्णोद्धार, खंड १ ते १२
श्री संप्रदायाची कागदपत्रे, खंड १ ते ३
देशमुख माधव गोपाळ, मराठीचे साहित्यशास्त्र, कॉन्टिनेंटल प्रकाशन
पुणे, तिसरी आवृत्ती, १९६७.
पांगारकर लक्ष्मण रामचंद्र, मराठी वाङ्मयाचा इतिहास,
तिसरा खंड (रामदास), केशव भिकाजी ढवळे, मुंबई, शके १८६१.
पांगारकर लक्ष्मण रामचंद्र, मनोबोध अथवा मनाचे श्लोक,
केशव भिकाजी ढवळे, मुंबई, १९५८.
प्राणी (डॉ. रा. द. तथा दादासाहेब, स्वाध्याय मनोबोध,
भाग १ व २, विद्वत सत्कार समिती, मिरज, १९६७
(व भाग २, गुरुपौर्णिमा, शके १८९२)
फाटक (प्रा.) नरहर रघुनाथ, रामदास : वाङ्मय आणि कार्य,
मौज प्रकाशन गृह, मुंबई, द्वितीयावृत्ती, १९७०.
भट भास्कर वामन, श्रीसमर्थ रामदास व श्री रामदासी संप्रदाय यांचे अभिनव दर्शन
राजवाडे संशोधक मंडळ, धुळे, प्रथमावृत्ती, शके १८७२ (सन १९५०)

